# सुलभ श्रीमद्भागवत

## भाग ५ वा

सुलभ श्रीमद्भागवत भाग १ ते ६ या ग्रंथास
**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांचेकडून**
अनुदान मिळाले आहे.
सदर ग्रंथाची किंमत त्यांनीच ठेविलेली आहे.

## स्कंध ११ व १२ वा

सन १९६५

किंमत १६ रुपये

# अनुक्रमणिका



| अध्याय | विषय | |
|---|---|---|
| १९ वा | — भीष्मांनीं धर्माला सांगितलेले मोक्षधर्म. मनच अर्थ व अनर्थ करणारें. शमदमादिकांचीं लक्षणें. ... | १२४ |
| २० वा | — गुण व दोष. कांडत्रयीचे वेगवेगळे अधिकारी. मन वश करण्याचा उपाय. निरिच्छपण ... | १२९ |
| २१ वा | — गुणदोषांची व्यवस्था, शुद्धि व अशुद्धि, धर्म व अधर्म. वेदांतील फलश्रुतीचें स्वरूप, कर्मठांचीं मनोराज्यें इ. | १३४ |
| २२ वा | — तत्त्वांच्या संख्या; ज्ञान; मतांचें पर्यवसान एकत्र, जन्म-मृत्यूचें लक्षण, देहाच्या अवस्था; आत्म्यावर आरोप | १३९ |
| २३ वा | — दुःशब्दरूप बाण दुःसह; भिक्षूची कथा; त्याचा परा-काष्ठेचा छळ; त्यानें शांतपणें गाइलेली गाथा. ... | १४४ |
| २४ वा | — सांख्यशास्त्र; सृष्टिक्रम; त्रैलोक्यरचना; कर्मांच्या उच्च-नीच गति, लयक्रम; सृष्टीस आधार ब्रह्म इ. | १५० |
| २५ वा | — तीन गुणांच्या वृत्ति; त्यांचें मिश्रण; त्यांच्या खुणा इ. | १५२ |
| २६ वा | — विषयासक्ति धरूं नये; ऐलाची कथा; ऐलगीता; साधूंची संगति धरावी; साधूच संसारतारक होत. | १५५ |
| २७ वा | — क्रियायोग ( पूजाविधि ); त्याचे तीन प्रकार; सात पूजास्थानें; आठ प्रकारच्या मूर्ति; उपचार इत्यादि ... | १५८ |
| २८ वा | — दुसऱ्याची निंदा किंवा स्तुति करूं नये. आत्म्याचे ठायीं संसार निर्मूळ होय. अहंकाराचा कारक ... | १६२ |
| २९ वा | — भागवत धर्म. सर्व भूतीं ईश्वरभावना. भक्तांचें सर्वस्व ईश्वर. भगवंतानें आज्ञा दिली असतां उद्धव बदरिका-श्रमीं जातो व भागवतधर्म आचारून मुक्ति पावतो ... | १६७ |
| ३० वा | — कृष्णाज्ञेवरून यादव प्रभासास जातात, तेथें मद्य पिऊन धुंद होतात व आपला कुलक्षय करितात राम-निर्याण, व्याधाचें सदेह स्वर्गी गमन ... | १७३ |
| ३१ वा | — देव अंतरिक्षीं पाहात असतां श्रीकृष्णाचा निजधामीं प्रवेश. वसुदेवादि प्रभासीं येऊन शोकानें देहत्याग करितात. अर्जुन इंद्रप्रस्थीं वज्रास राज्याभिषेक करितो; समुद्र द्वारका बुडवितो; पांडवांचें महाप्रस्थान व फलश्रुति | १७८ |
| | उपसंहार ... ... ... ... | १८[illegible] |

# सुलभ श्रीमद्भागवत

## एकादशस्कंध

---

## श्रीधरस्वामींची प्रस्तावना

श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णाय नमः । ॐ नमः । श्रीपरमहंसास्वादित-चरणकमलचिन्मकरन्दाय, भक्तजनमानसनिवासाय श्रीरामचन्द्राय ।

अर्थः– श्रीगणेशाय नमः, श्रीकृष्णाय नमः, ॐकारपूर्वक श्रीरामचंद्राला नमस्कार [illegible] महाभाग्यवंत अशा परमहंसांनीं आदरानें आस्वाद ( रुचि ) घेतला आहे [illegible] ज्ञानरूपी मकरंदाचा ( अमृतरसाचा ) अशा आणि भक्तलोकांच्या [illegible] विश्रांतिस्थान अशा श्रीदाशरथि रामचंद्राला नमस्कार असो.

विजयन्ते परानन्दकृष्णपादरजःस्रजः

या धृत्वा मूर्ध्नि जायन्ते महेन्द्रादि-महःस्रजः ॥ १ ॥

अर्थः [illegible] मूर्ति जो श्रीकृष्ण त्याच्या चरणधूलिरूपी माळांचा जय-[illegible] असो. [illegible] केल्या असतां महेंद्रादि देवाचीं तेजें अथवा [illegible] उत्पन्न होतात- सारांश. श्रीकृष्णाची चरणधूलि [illegible] करणारे भक्त इंद्रासारखे तेजस्वी होतात ॥ १ ॥

उक्तैकात्रिंशताऽध्यायैर्मुक्तिरेकादशे ततः ।
जायन्तेयेतिहासाद्यैः समासव्यासरूपतः ॥ २ ॥

अर्थः--- श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्कंधांतील एकतीस अध्यायांमध्यें जायंते-[illegible] ( जयंतीपुत्रांच्या ) इतिहासादिरूपानें **मुक्तीचें**–दुःखापासून मुक्त करणाऱ्या स्वरूपाचें [illegible] संक्षेपानें तर कोठें विस्तारानें वर्णन केलें आहे ॥ २ ॥

नारदो वसुदेवाय समासेन न्यवर्णयत् ।
भगवानुद्धवायाथ विस्तरेणोपपत्तिभिः ॥ ३ ॥

अर्थः–मुक्तीचें स्वरूप नारदऋषींनीं कृष्णपिता जो वसुदेव त्याला येथें संक्षेपतः [illegible] आहे आणि नंतर श्रीकृष्णानें तें आपला पट्टशिष्य आणि भक्त जो उद्धव त्याला [illegible], युक्तीचे व अनुभवाचे दाखले देऊन, तात्पर्य सर्व विषय उपपत्तींनीं सिद्ध करून [illegible] सांगितलें आहे ॥ ३ ॥

**तत्र तु प्रथमेऽध्याये यदुवंशस्य संक्षयः ।**
**उपाक्षिप्तो विरागाय मौसलस्यापदेशतः ॥ ४ ॥**

**अर्थ**:—या एकादश स्कंधांतील एकतीस अध्यायांपैकीं पहिल्या अध्यायांत मुसळाची उत्पत्ति व कार्य सांगण्याच्या मिषानें यदुवंशाच्या संहाराची आगाऊ सूचना दिली आहे. हेतु हा कीं, जीवांस संसारासंबंधानें वैराग्य उत्पन्न व्हावें ॥ ४ ॥

**प्रवृत्तितः परानन्दकृष्णक्रीडानुवर्णिता ॥**
**तन्निवृत्त्या परानन्दपदारोहोऽनुवर्ण्यते ॥ ५ ॥**

**अर्थः**—परमानंदाची मूर्ति जो श्रीकृष्णपरमात्मा त्याच्या लीलाविलासांचें वर्णन दहाव्या स्कंधांत केलें आहे आणि प्रवृत्तिमार्गामध्येंही ( संसारांत राहूनही ) सर्वज्ञ भगवान् आनंदस्वरूपांत अलिप्त वृत्तीनें राहतो हें व त्यापासून निःसीम भक्तांस होणारा आनंद दाखविला आहे. येथें एकादशस्कंधांत तर संसारापासून—प्रवृत्तिमार्गापासून—उपरत (पराङ्मुख ) होऊन हळूहळू ज्ञानयोगी भक्त, आनंदकंद जो श्रीकृष्ण त्याच्या धामाचा मार्ग आक्रमित असतां श्रेष्ठ, श्रेष्ठतर भूमिकांवर कसा चढत जातो व शेवटीं आनंदरूप कसा होतो हें श्रीपरमेश्वराच्या स्वपदारोहणाच्या रूपानें सांगितलें आहे. ॥ ५ ॥

**एवं तावत् दशमस्कन्धे भूभारावतारणाय निजविभूतिविभूषितयदुवंशस्य यदुवंशावतारितसकलसुरांशस्य भगवतः श्रीकृष्णस्य तदुचितप्रवृत्तिविडम्बनेन तच्छ्रवणस्मरणादिपराणां परेषां आनंदकारणं क्रीडा निरूपिता । अथ इदानीं अपरिमितयोगमायावैभवस्य भक्तानां आत्मतत्त्वोपदेशपूर्वकं क्रीडार्थं भूतले अवतारितानां च अधिकारिणां सुरांशानां मौसलापदेशन तत्तदधिकारपदप्रापणपूर्वकं च ब्रह्माद्यनुग्रहाय निजपदारोहः निरूप्यते । तत्र कुरुक्षेत्रयात्रायां अविरक्तस्य वसुदेवस्य ‘ कर्मणा कर्मनिर्हारः यथा स्यान्नस्तदुच्यताम् ’ इति एवं कर्मयोगं पृष्टवतः नारदादिभिः कर्मयोगः निरूपितः— “ कर्मणा कर्मनिर्हार एष साधु निरूपितः । यत् श्रद्धयाप्तवित्तेन शुक्लेनेज्येत पूरुषः ” इत्यादिना । तेन च विशुद्धसत्त्वस्य श्रीकृष्णरामौ परमेश्वरत्वेन ज्ञातवतः षड्गर्भानयनाध्याये श्रीकृष्णेन आत्मतत्त्वं उपदिष्टम्— “ वचो वः समवेतार्थं तातैतदुपमन्महे । यन्नः पुत्रान्समुद्दिश्य तत्त्वग्राम उदाहृतः ” इत्यादिना ।**

**अर्थः**—आतांच वर प्रस्तावनेच्या पांचव्या श्लोकांत जें संक्षेपानें सांगितलें त्याचा विस्तार असा आहे. भूमीचा भार नाहींसा करण्यासाठीं अवतार धारण केलेल्य श्रीकृष्णाची, आपल्या ऐश्वर्यानें अलंकृत केला होता यदुवंश ज्यानें, त्या श्रीकृष्णाची, ज्याच्या आज्ञेनें सर्व देव आपआपल्या अंशानें यदुकुलांत अवतीर्ण झाले त्या भगवान् श्रीकृष्णाची लीला दहाव्या स्कंधामध्यें निरूपण केली. ही लीला ( ही क्रीडा ) म्हणजे अनेक प्राम-

प्रसंगीं श्रीकृष्णाला उचित असणारी प्रवृत्ति, त्याचा व्यवहार होय; परंतु हाच व्यवहार श्रवणदर्शनस्मरणादिकांमध्यें निमग्न झालेल्या तत्पर अशा श्रेष्ठ श्रेष्ठ पुरुषांच्या परमानंदाला कारण होतो.

आतां दहाव्या स्कंधानंतर येणाऱ्या अकराव्या स्कंधांत भगवान् श्रीकृष्ण परमात्मा निजधामाला गेले, याचें वर्णन करावयाचें आहे.

जिचें केव्हांही कोणालाही मोजमाप करितां यावयाचें नाहीं अशा अनिर्वचनीय योगमायेच्या ऐश्वर्यवंत स्वामी श्रीकृष्ण होय. अशा षड्गुणैश्वर्य भगवंताचे जे भक्त त्यांस आत्मतत्त्वाचा ( **मोक्ष प्राप्त करुन देण्याचा, आत्मसिद्धांताचा** ) उपदेश करून भगवान् श्रीकृष्ण निजधामास गेला. तसेंच, लीला करण्यासाठीं भगवंताच्या आज्ञेवरून आपापल्या अंशानें अवतीर्ण झालेल्या अधिकारी देवांस ( **देवांशांस** ) मुसळाच्या निमित्तानें संहरून त्यांच्या त्यांच्या अधिकारपदाला पोहोंचविल्यानंतर भगवान् श्रीकृष्ण निजधामाला गेला. हें प्रयाण अर्थात् ब्रह्मादि देवांवर अनुग्रह ( **कृपा** ) करण्यासाठीं होतें. भूभारहरणासाठीं अवतरलेल्या परमेश्वरानें स्वभक्ताला आत्मतत्त्व सांगितलें. देवांस स्वस्थानीं पाठविलें आणि मग ब्रह्मादिकांवर कृपा म्हणून त्यांच्या विनंतीला मान देऊन भगवान् निजधामीं गेला.

" कर्म करूनच, प्रवृत्तिपर व्यवहार चालवूनच, कर्मांचा नाश ज्या पद्धतीनें होईल, ज्या पद्धतीनें कर्म बंधनकारक होणार नाहीं, ती पद्धति मला सांगा " असा **कर्मयोगाविषयींचा** प्रश्न कुरुक्षेत्रप्रसंगीं कर्मरत वसुदेवानें केला, व नारदादि महर्षींनीं श्रुतिप्रणीत कर्मयोग सांगितला; तो असा :—

' वेदविहित कर्म परमेश्वराला अर्पण करणें हाच मार्ग कर्मापासून होणाऱ्या बंधचा नाश करणारा आहे. श्रद्धा उत्तम प्रकारची ठेवून सन्मार्गानें प्राप्त झालेल्या धनानें ईश्वराची, पुरुषोत्तमाची यज्ञादि रूपानें पूजा करावी व तें कर्म ईश्वरार्पण करावें, इ. इ. हाच उपाय कर्मबंधाचा नाश करितो. ' हें ऐकून व पटवून घेतल्यामुळें वसुदेवाचें चित्त स्फटिकासारखें स्वच्छ व निर्मळ झालें आणि श्रीकृष्ण व बलराम हे प्रत्यक्ष परमेश्वरच होत असें त्याला कळलें. नंतर ' षड्गर्भानयन ' नामक ( ८५ व्या ) अध्यायांत २२ व्या श्लोकादिकांमध्यें श्रीकृष्णांनीं वसुदेवाला आत्मतत्त्वाचा उपदेश केला—

श्रीकृष्ण म्हणतात :—' आम्हां पुत्रांस उद्देशून आपण हे तात ! जो तत्त्वसमुदाय उद्धृत केला तें आपलें सर्व संभाषण सर्व वेदांताचें सार आहे,' असें आम्ही मानतों ' इत्यादि.

**तच्च विषयभोगातिशये पुनः तिरोहित आसीत्। तत एव इदानीं नारदमुखेन प्रथमं पंचाऽध्याय्या निरूप्यते। तत्र प्रथमे अध्याये वैराग्योत्पादनाय यदुकुलस्य ब्रह्मशापापदेशेन अत्युन्नतविषयसुखानां अपि अनित्यता प्रतिपाद्यते। ततः चतुर्भिः निमिजायंतेय--संवादेन सपरिकरं परमतत्वनिरूपणम्।**

**ततः षष्ठे भगवत्--उद्धव--संवाद--प्रस्तावः । ततः त्रयोविंशत्या उद्धवंप्रति भगवतस्तत्त्वानिरूपणम् । ततः द्वाभ्यां मौसलक्रीडा । इत्येवं एकात्रिंशताऽध्यायैः एकादशस्कंधस्य प्रवृत्तिः । तस्य च यथामति व्याख्यानं आरभ्यते ।**

**अर्थ**—परंतु विषभोपभोगांच्या अतिसेवनानें तो सर्व उपदेश वसुदेव विसरून गेला ! तो उपदेश प्रायः लुप्तच झाला ! तोच उपदेश या स्कंधांतील पांच अध्यायांमध्यें प्रथमतः नारदादिकांच्या मुखानें उद्धृत केला आहे. त्यांतही या स्कंधाच्या पहिल्या अध्यायांतच वैराग्याचा ( **संसारापासून परावृत्त होण्याचा** ) उद्भव व्हावा म्हणून यदुकुलाला शाप झाला, ही कथा सांगितली आहे; अत्यंत श्रेष्ठ अशाही विषयांपासून उत्पन्न होणारीं सुखें सुद्धां अनित्य, क्षणभंगुर, चंचल असतात, हें समजून स्पष्ट उमजावे म्हणून, ही यदुकुलाला ब्राह्मणाचा शाप झाल्याची कथा सांगितली आहे. नंतर पुढील चार अध्यांयात ' निमिजायंतेयां ' चा संवाद अवतारून श्रेष्ठ जें आत्मतत्त्व त्यांचा सांगोपांग उपदेश वसुदेवाला ऋषींनीं केला आहे. ही पहिल्या पांच अध्यायांची कामगिरी आहे. ही पंचाध्यायी आटपल्यानंतर सहाव्या अध्यायामध्यें श्रीभगवान् आणि उद्धव यांच्या संवादाची प्रस्तावना करून पुढील तेवीस अध्यायांत भगवंतांनीं मुख्य तत्त्वांचा उपदेश केला आहे; आणि शेवटच्या दोन अध्यायांत ' मौसलक्रीडा ' आली आहे. याप्रमाणें या स्कंधांतील एकतीस अध्यायांची हकीकत आहे. या ३१ अध्यायांत आलेल्या विषयांचें मी ( श्रीधरस्वामी ) यथामति व्याख्यान करण्याला आरंभ करितों.

**तत्र मौसलप्रसङ्गार्थं पूर्वस्कन्धार्थमनुवदति श्लोकद्वयेन--- ' कृत्वा इति ' ।**

येथील ' कृत्वा इति ' या पहिल्या दोन श्लोकांनीं झालेल्या कथार्थाचा अनुवाद करून श्रीशुकाचार्य ' मौसल ' प्रकरणाचा ( **मुसळाच्या उत्पत्त्यादि प्रसंगाचा** ) अवतार करीत आहेत.

येथें श्रीधरी प्रस्तावना संपली

---

# निवेदन

## द्वादशस्कंध

पूर्वसंकेतानुरूप श्रीमद्भागवताचा बारावा स्कंध आज प्रेमळ वाचकांच्या सेवेंत सादर करण्यांत येत आहे. ज्या सर्वशक्तिमान् प्रभूनें हें श्रीमद्भागवताचें महत्कार्य आम्हांस निमित्त-मात्र पुढें करून शेवटास नेलें, त्या जगच्चालक प्रभूचे आम्ही अनन्यभावें आभार मानतों. आज हा बारावा स्कंध पूर्ण झाल्यानें श्रीमद्भागवत–ग्रंथाचें काम पूर्ण झालें आहे. आतां यापुढें भागवतांतर्गत विशेषनामांचा कोश, सूचि व सुभाषितें असा एक स्वतंत्र भाग तयार करून भागवतभक्त वाचकांच्या सेवेंत सादर करण्याचें जें अभिवचन आम्हीं दिलें आहे, तें कार्य पुरें होणें बाकी आहे. सर्वांतर्यामीं वास करणारा तो प्रभु हें शेष कार्यही लवकरच पूर्ण करील असा भरंवसा आहे.

श्रीमद्भागवत-ग्रंथ-प्रकाशनाच्या कार्यास सुरुवात होऊन आज बरोबर ३॥ वर्षे झालीं. ह्या ४२ मासांच्या अवधींत अनेक आपत्ति कोसळल्या, अनेक अडचणी आल्या व हें काम मध्यावरच थांबतें कीं काय असें वाटूं लागलें; परंतु त्या दयाघन प्रभूनें अनेक रूपांनीं साहाय्य करून तें शेवटास नेलें, याबद्दल त्या परमेश्वराचे, तसेंच ज्या मित्रवर्गानें आरंभापासून उदार अंतःकरणानें अनेक प्रकारचें साहाय्य केलें त्या साहाय्यकर्त्या मित्र-वर्गाचे जितके आभार मानावे तितके थोडेच होणार आहेत.

ठरल्याप्रमाणें ह्या बाराव्या स्कंधाबरोबर सार्थ भागवत–माहात्म्य आणि बाराहि स्कंधांतील **संपूर्ण उपसंहार** स्वतंत्र दिला आहे. पूर्वीच्या प्रत्येक स्कंधास त्या त्या स्कंधापुरता विवेचनात्मक उपसंहार जोडला असल्यामुळें अर्थातच कांहीं ठिकाणीं मागील हवाले द्यावे लागले व कांहीं ठिकाणीं पुनरुक्ति करावी लागली, ही निरुपायाची गोष्ट होय. तथापि महत्त्वाचा मुद्दा न गाळतां होईल तितक्या समतोल व चिकित्सक दृष्टीनें श्रीमद्भागवतांतर्गत मुख्य मुख्य विषयांचा सांगोपांग विचार करण्याचा प्रयत्न या उपसंहारांत केला आहे. भागवतप्रेमी गुणज्ञ वाचक हंसक्षीरन्यायानें आमच्या ह्या एकंदर कार्याचा स्वीकार करतील असा आम्हांस भरंवसा आहे.

हें श्रीमद्भागवताचें कार्य शेवटास नेण्याचे कामीं ज्या प्रेमळ व हितचिंतक मित्रांनीं आम्हांस वेळोवेळीं साहाय्य केलें त्यांचा, त्याचप्रमाणें ज्यांनीं आगाऊ वर्गणी पाठवून साहाय्य दिलें त्यांचा, ह्या भागाचे शेवटीं नामनिर्देश करून आभार मानण्याचें आम्हीं ठरविलें होतें; परंतु आश्वासित अशा अनेक मित्रांकडील वर्गणीच्या वगैरे रकमा अद्याप हातीं आल्या नाहींत. शिवाय कित्येक मित्रांच्या सूचनेवरून आगाऊ ग्राहकांच्या पटांत नांव नोंदण्याची मुदत वाढविली आहे. त्यामुळें ह्या भागाच्या शेवटीं आश्रयदात्यांचीं नांवें छापण्याचा जो विचार आम्हीं पूर्वी केला होता तो लांबणीवर टाकणें भाग झालें आणि आतां कोश

सूचि व सुभाषितें असा जो स्वतंत्र व शेवटचा भाग म्हणून प्रसिद्ध व्हावयाचा आहे, त्या भागासच रिपोर्टरूपानें संपूर्ण हकीकतीसह सर्व आश्रयदात्यांची यादी जोडावी असें ठरविलें आहे.

श्रीमद्भागवत ग्रंथप्रकाशनाचें हें काम आम्हीं हातीं घेतलें त्या वेळीं त्याची जी मर्यादा आंखली होती ती कायम राहिली नाहीं. एक एक स्कंध तयार होऊन जसजसा वाचकांच्या हातीं पडूं लागला, तसतशी त्याची उपयुक्तता अधिक वाढूं लागली आणि वेगवेगळ्या सूचना येऊं लागल्या. उपयुक्ततेच्या दृष्टीनें त्या सर्वच चांगल्या होत्या; परंतु ग्रंथविस्ताराच्या भयास्तव त्या सगळ्याच जरी अंमलांत आणतां आल्या नाहींत, तथापि त्यांतील महत्त्वाच्या अशा बऱ्याच गोष्टी अंमलांत आणल्या आहेत; आणि त्यामुळेंच ग्रंथाची मर्यादा कल्पनेच्या बाहेर वाढली आहे. अर्थात् त्या मानानें मूळच्या किंमतींतहि बराच फरक झाला आहे; परंतु ही गोष्ट निरुपायाची आहे हें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आलें असेलच.

हें श्रीमद्भागवत-ग्रंथ-प्रकाशनाचें काम जितकें सुबक, निर्दोष व व्यापक व्हावयास पाहिजे होतें, तितकें सुबक, निर्दोष व व्यापक असें झालें नाहीं, हें आम्ही जाणून आहोंत आणि त्याबद्दल आम्हांस अत्यंत दिलगिरी वाटत आहे. परमेश्वरकृपेनें ग्रंथाची द्वितीयावृत्ति काढण्याचा प्रसंग आल्यास ह्या आवृत्तींत राहिलेल्या उणीवा भरून काढण्याची उमेद आहे. तथापि हें झालेलें बरें-वाईट कार्य गुणज्ञ व प्रेमळ वाचक गोड करून घेतील अशी आम्हांस आशा आहे.

यापुढें श्रीमन्महाभारतग्रंथाचें– ( मूळ व भाषांतराचें )–प्रकाशनाचें कार्य हातीं घ्यावें असें कांहीं विद्वान् व हितचिंतक मित्रांच्या विचारें ठरविलें आहे. हें महाभारत-प्रकाशनाचें काम कशा प्रकारें व्हावें, यासंबंधानें सल्लागारमंडळांत वाटाघाट होऊन असें ठरलें आहे कीं, एका पृष्ठावर महाभारत मूळ व नीलकंठी टीका आणि त्याचे समोरचे पानावर मराठी भाषांतर व टीपा अशा प्रकारें त्याची मांडणी करावी आणि ज्या टीपांचें विशेष स्पष्टीकरण करणें असेल तें प्रत्येक अध्यायाचे शेवटीं करावें. शिवाय भागवताप्रमाणें प्रत्येक पर्वास स्वतंत्र उपसंहार जोडावा. अशा प्रकारें तूर्त महाभारतग्रंथप्रकाशनाची दिशा ठरविली असून त्यासंबंधाचा एक नमुना अंक लवकरच तयार करण्याचें ठरविलें आहे. सर्वशक्तिमान् प्रभूच्या कृपेनें प्रकृतीस स्वास्थ्य मिळून हें कार्यहि तो शेवटास नेईल अशी उमेद ठेवीत आहों !

असो. शेवटीं ज्या परमेश्वराच्या कृपेनें व ज्या हितचिंतक मित्रांच्या प्रोत्साहनानें हें हातीं घेतलेलें श्रीमद्भागवत-ग्रंथप्रकाशनाचें कार्य येथपर्यंत शेवटास गेलें, त्यांचे अंतःकरणपूर्वक पुन्हा आभार मानून हे दोन शब्द येथें पुरे करतों.

मुंबई,
ज्येष्ठ शुक्र ११, शके १८५१

प्रकाशक

# बाराव्या स्कंधाची अनुक्रमणिका

## श्रीमद्भागवतमाहात्म्य

॥ श्री ॥

# सुलभ श्रीमद्भागवत

# एकादश स्कंध

## अध्याय १ ला

शुकाचार्य म्हणाले, ' हे परीक्षित् राजा, यादवांस बरोबर घेऊन श्रीकृष्णानें बलरामासह प्रथमतः अनेक राक्षसांचा संहार केला; नंतर कौरवपांडवांमध्येंच भांडण उपस्थित करून आणि यादवांमध्यें यादवी माजवून ( दहा वीर शिवाय करून कौरवपांडवांचा व यादवांचा ) सर्वस्वी संहार केला आणि याप्रमाणें पृथ्वीचा भार नाहींसा केला ॥ १ ॥ दुर्योधनादि भाऊबंदांनीं अनेक वेळां केलेल्या अनेक प्रकारच्या अपमानांमुळें क्रोधानें संतप्त झालेल्या पांडवांस निमित्तमात्र पुढें करून कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर बहुतेक सर्व राजांचा एकमेकांच्या हातून वध करवून श्रीकृष्णानें पृथ्वीचा भार हलका केला ॥ २ ॥ यद्यपि आपल्या बाहुबळानें संरक्षिलेल्या यादवांकडून पृथ्वीला भारभूत होणाऱ्या क्षत्रियांचा संहार करविला होता, तथापि अचिन्त्यस्वरूप श्रीकृष्णाला वाटलें कीं, जोंपर्यंत हे दुर्दांत यादव पृथ्वीवर आहेत, तोंपर्यंत वस्तुतः पृथ्वीचा भार नाहींसा झालाच नाहीं ॥ ३ ॥

---

टीप—भूमीला भारभूत झालेले दुसरे सर्व राजसैनिक अथवा राजे आणि सैनिक, यांचा नाश आपल्या ( कृष्णाच्या ) बाहूंनीं रक्षण केलेल्या यादवांकडून रुक्मिणी-विवाहासारख्या अनेक प्रसंगीं करविला. त्यायोगें भूभारहरणाचें बरेंच काम झालें.

बलादि संपत्तीच्या उत्कर्षानें मदोन्मत्त झालेल्या, माझ्या आश्रयाला असल्यामुळें अन्य कोणत्याहि उपायानें ( देवादिकांकडूनही ) परिभूत न होणाऱ्या, या यादवकुलाचाहि संहार करून पृथ्वीचा भार हलका करावयाचा आहे; म्हणून यादवकुलांतच कलहाचा अग्नि मला पेटविला पाहिजे. वेळूच्या बनांत परस्परांच्या संघर्षणानेंच विस्तव उत्पन्न झाल्यामुळें जसें तें बन पार नाहींसें होतें, त्याप्रमाणें यादवकुलाचा यादवांनींच नाश केला म्हणजे माझें अवतारकार्य संपेल व मी कृतार्थ होईन आणि मग माझें धाम जें वैकुंठ तेथें जाईन असा श्रीकृष्णानें विचार केला ॥ ४ ॥

---

श्रीकृष्णाला वस्तुतः ( प्रत्यक्ष ) चार हात होते, हें सुचविण्यासाठीं श्लोकामध्यें द्विवचन न घालतां अनेकवचनी प्रयोग केला आहे. ' भूभार हरण्यासाठीं श्रीकृष्ण जर यापुढें यादवांचाहि संहार करणार होता, तर त्याचें मनोगत जाणणाऱ्या यादवांनीं त्याचा द्वेष कसा केला नाहीं ? ' अशी शंका कोणी घेऊं नये, म्हणून श्लोकामध्यें ' अप्रमेय ' हें पद मुद्दाम योजिलें आहे. अप्रमेय म्हणजे ज्याचें व ज्याच्या अभिप्रायाचें स्वरूप कोणासहि कळत नाहीं किंवा कळणें शक्य नाहीं असा. त्याचें चिंतन कोणत्या स्वरूपाचें होतें, तें पाहा. यद्यपि लोकांच्या समजुतीप्रमाणें ( व्यवहारदृष्ट्या ) अवनीचा म्हणजे पृथ्वीचा भार नष्ट झाला, तथापि वस्तुदृष्टीनें मला ( श्रीकृष्णाला ) खरोखर असें वाटतें कीं, जोंपर्यंत हें आमचें दुःसह यादवकुल जिवंत आहे ( किंवा जोंपर्यंत यादव अजिंक्य आहेत ) तोंपर्यंत पृथ्वीचा भार हलका झालाच नाहीं. असो येथील 'यादवकुल' हें पद साभिप्राय आहे. आपण स्वतः यादवकुलांतच जन्म घेतला असल्यामुळें कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ हा न्याय होऊं नये, आपणच आपल्या कुलाचा वध करूं नये, असा वध करणें अयोग्य होईल, हा अर्थ सुचविण्यासाठीं ' यादवकुल ' हें पद घातलें आहे ॥ ३ ॥

**टीप—** तर मग यादवकुलाचाहि संहार ईश्वरानें दुसऱ्या कोणाकरवीं करावयाचा होता, असें म्हटल्यास त्याला उत्तर देतात. देवादिकांसुद्धां दुसऱ्या कोणाच्याहि हातून यादवांचा पराभव होणें शक्य नाहीं. कारण ते सर्व यादव माझा आश्रय करून वाढले आहेत, माझे आश्रित आहेत. आणखी हत्ती, घोडे इत्यादिकांनीं संपन्न झाल्यामुळें दुर्धर्ष होऊन अजिंक्य झाले आहेत. — मग अशा कुलाचा वध करण्याची इच्छा तरी का व्हावी ?— याला उत्तर म्हणून, 'विभवोन्नहनस्यहें' पद योजिलें आहे किंवा याचा दुसरा अर्थ असा करावा कीं, वैभवानें उन्मत्त व उच्छृंखल झाले म्हणून पृथ्वीला भारभूत होणार, अतएव त्याचा वध करणें इष्टच होतें. अतएव श्रीकृष्णानें बेत केला कीं, या यादवांमध्यें परस्पर कलह उत्पन्न करावा. ते आपसांत लढून मरतील असें करावें. हें झालें म्हणजे मला शांति मिळेल, माझें समाधान होईल आणि अवतारकार्य आटपेल. ' उपैमि ' हा वर्तमानकाळचा प्रयोग भविष्यकालसूचकच होय. तात्पर्य, ह्याप्रमाणें यादवांचा नाश झाला म्हणजे मी वैकुंठाला परत जाईन, असा भगवंतानें विचार केला ॥ ४ ॥

हे राजा, याप्रमाणें निश्चय करून सत्यसंकल्प व सर्व शक्तिमान् श्रीकृष्णानें ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध व तेजस्वी ब्राह्मणांच्या मुखांतून अमोघशापरूपी अस्त्र निर्माण केलें व त्याकरवीं मदोन्मत्त झालेल्या यादवकुलाचा नाश केला ॥ ५ ॥ आपल्या स्वतःच्या अनुपम सौंदर्यानें निसर्गांतील सर्व सौंदर्याचा त्याग करण्यास लावलेले भक्तांचे नेत्र आपल्या सर्वव्यापी मूर्तीमध्यें मात्र स्थिर करून, सर्व भक्तांचे चित्त आपल्या उपदेशामृताचें पान करण्यामध्यें मात्र निमग्न करून, त्याचप्रमाणें आपल्या भक्तांच्या सर्व क्रिया ( अखिल कर्मे ) आपलीं चरणकमळें पाहण्यामध्येंच संपूर्ण करून, तात्पर्य आपल्या भक्तांचीं सर्व इंद्रियें, मन आणि बुद्धि आपल्या ठिकाणीं स्थिर करून ठेवणारा श्रीकृष्ण परमात्मा, या आपल्या मानवी पृथ्वीवर म्हणजे कर्मभूमीवर आपली पुण्यश्लोक कीर्ति अखंड राहील असा तिचा प्रसार करिता झाला. हेतु हा कीं, या आपल्या यशोरूपी अमृताचें आकंठ पान करणाऱ्या ज्ञानी भक्तांचें सर्व अज्ञान नष्ट व्हावें आणि त्यांनीं हा संसारसागर लीलेनें उतरून जावा. सगुण परमेश्वराच्या ( माझ्या ) अनन्य भक्तीनें व त्याच्या सुयशोगानानें आपले भक्त हा संसार सहज तरतील, असा भगवंतास उत्कृष्ट भरवंसा होता. असो; याप्रमाणें पृथ्वीचा भार हलका झाला व अनन्य भक्तांस मुक्ति मिळविण्याचें साधनहि सुगम झालें. तात्पर्य, आपलें अवतारकृत्य समाप्त झालें, असें पाहून श्रीकृष्णपरमात्म्याची स्वारी निजधामाला गेली ॥ ६ ॥ ७ ॥

परीक्षित् राजा म्हणाला — ब्राह्मणांस मान देणारे, दानशूर, देव - द्विज - गुरु प्रभृतींचें दास्य करणारे श्रीकृष्णभक्त जे यादव, त्यांना विप्रशाप झाला, हें आश्चर्य आहे ! तेव्हां हा शाप किंनिमित्त झाला ? ॥ ८ ॥ हे मुनिश्रेष्ठ शुकमहाराज, यादवांना जो शाप झाला त्या शापाचें कारण काय, त्याचें स्वरूप काय आणि एकमतानें वागणाऱ्या यादवांमध्येंच हा परस्पर कलह कसा झाला, तें सर्व कृपा करून मला सांगा ॥ ९ ॥

---

**टीप—** याप्रमाणें आपलें तें सर्व अवतारकृत्य संपादून भगवान् श्रीकृष्ण निजधामास गेला हें दोन श्लोकांनीं सांगतात. स्वतःच्या अपूर्व सुंदर मूर्तीनें लोकांच्या लावण्याचा त्याग करविणाऱ्या, तात्पर्य, जिच्या अपेक्षेनें जगामध्यें दुसरें लावण्यच नाहीं असें झालें. ( तात्पर्य, सर्व लावण्याचा गर्व जिनें पराभूत केला ) त्या मूर्तीनें अथवा ज्या ईश्वरी मूर्तीनें लोकांना लावण्य दिलें, जिच्या संपर्कापासून मात्र जगांतील लावण्याला कांहींसें लावण्य प्राप्त झालें, त्या आपल्या सुंदर मूर्तीनें सर्व नरनारींचे नेत्र 'आच्छिद्य' म्हणजे आच्छादून, तात्पर्य, इतर वस्तूंकडे पाहाण्याकडे त्यांचीं अप्रवृत्ति करून ( आपल्या मूर्तीनेंच सर्वांचे नेत्र खिळून ) तसेंच, आपण वेळोवेळीं केलेला मोक्षद उपदेश व त्याचें सौभाग्य ध्यानांत ठेवणाऱ्यांचीं मनें आकर्षून घेऊन आणि आपण जेथें जेथें संचार केला तेथें तेथें उमटलेल्या पदांचें एकाग्र अवलोकन करणाऱ्या भक्तांच्या दुसरीकडे जाण्याच्या गतींचा निरोध करून, सारांश, श्रीकृष्णाच्या राजवटीमध्यें असणाऱ्या लोकांच्या सर्व मनःप्रवृत्ति व इंद्रियप्रवृत्ति ( सर्व व्यापार ) आपल्या ठायीं एकनिष्ठ

श्री शुकाचार्य म्हणतात—सकल सौंदर्यांचें अधिष्ठान, मंगलकर्मकारी पण स्वतः कृतार्थ, पुनः संसारामध्यें अनासक्तीनें राहून लोकांस कर्म कसें करावें हें स्वोदाहरणानें शिकविणारा, उदारकीर्ति असा हा भगवान् श्रीकृष्ण अवतारकृत्य पूर्ण न झाल्यामुळें स्वकुलनाशाला प्रवृत्त झाला ॥१०॥ द्वारकेमध्यें राहणाऱ्या कृष्णानें नित्यनैमित्तिकादि कर्में घडवून आणण्याकरितां कित्येक मुनि द्वारकेस बोलावले होते. त्यांच्या करवीं पुण्याची जोड करून देणारीं, आनंदावह असणारीं आणि कृताकृतामुळें उत्पन्न झालेलीं पापें धुऊन काढणारीं अनेक कर्में करवून त्या मुनिश्रेष्ठांस कालस्वरूपी श्रीकृष्णानें पिंडारक क्षेत्राला जाण्याची परवानगी दिली ॥ ११ ॥ श्रीकृष्णाची आज्ञा झाल्याप्रमाणें विश्वामित्र, असित,

---

करून सर्वांस अनन्य व्यपार करून आणि आपण निजधामाला गेल्यानंतर जन्माला येणाऱ्या लोकांस संसारसागर तरतां यावा म्हणून, या पृथ्वीमध्यें व्यासप्रभृति महाकवींनीं जिच्यावरून रमणीय काव्यें करून गावीं, अशी कीर्ति, असें यश, सर्वत्र पसरून भगवान् निजधामाला गेले. हेतु हा कीं, कवींनीं सुंदर काव्यें करून गाइल्यामुळें सर्वत्र प्रसिद्ध होणाऱ्या कीर्तीच्या प्रभावानें अज्ञानांधकार नाहींसा होऊन हा भवसागर कोणाहि भक्ताला सुखानें तरतां यावा. आपलें यश आपल्या भक्तांस सुखानें तारील, यांत भगवंताला संदेह नव्हता. असो; जड जीवांच्या उद्धारार्थ परमेश्वर आपलें यश सर्वत्र पसरवितो ॥ ६ ॥ ७॥

**टीप**–यादवकुलाच्या संहाराचें कारण 'परमेश्वराची इच्छा' हेंच होय. तें सांगण्यासाठीं पुढील श्लोकासह हा श्लोक आहे. अखिल सुंदर वस्तूंचा व्यवस्थाविशिष्ट संग्रह ज्या परमेश्वरी देहांत आहे, असें शरीर भगवंतानें धारण केलें होतें. तर मग श्रीकृष्ण अतिसुंदर असल्यामुळें विषयलोलुप झाला होता काय? होता असें कोणी म्हणेल तर तसें नव्हे; तो अत्यंत शुभावह कर्म करणारा होता, तर मग तो कोणत्या तरी वासनेनें प्रेरित होऊन काम करीत असेल! नाहीं, तसेंहि नाहीं. तो श्रीकृष्ण पूर्णकाम असल्यामुळें तसें संभवत नाहीं. असेंच जर असेल तर तो कर्म तरी कां करतो? तर द्वारकेंत राहून गृहस्थाश्रम स्वीकारल्यामुळें लोकांना गृहस्थधर्माचा उपदेश करण्यासाठीं विषयांचे ठिकाणीं आसक्ति न ठेवतां कर्म करितो. कोणी असें म्हणेल कीं, पूर्णकाम श्रीकृष्णानें तरी गृहकृत्यांत रममाण होऊन कृत्य कां करावें? तर श्रीकृष्ण उदारकीर्ति म्हणजे पुष्कळ मोठें फळ देणारी ज्याची कीर्ति आहे असा असल्यामुळें आपली कीर्ति सर्वत्र पसरविण्याकरितां कर्म करितो, हा त्याचा अर्थ होय. याप्रमाणें ऐश्वर्यसंपन्न असा श्रेष्ठ यादवकुलाचा नाश करण्याची इच्छा करिता झाला. ह्याचा हेतु हाच कीं, भूभारहरणरूपी अवतारकृत्य थोडेंहि शिल्लक राहूं नये, हाच श्रीकृष्णाचा मुख्य उद्देश होता ॥ १० ॥

**टीप**—परमेश्वराच्या इच्छेनें मात्र उद्भवलेल्या मुनिशापाचें निमित्त सांगण्यासाठीं या श्लोकाचा अवतार आहे. पुण्य कर्में करण्यासाठीं आमंत्रण दिलेल्या ब्राह्मणांकरवीं तीं तीं कर्में संपूर्ण करविल्यानंतर श्रीकृष्णानें निरोप देऊन रवाना केलेले मुनि पिंडारकक्षेत्राला

कण्व, दुर्वास, भृगु, अंगिरा, कश्यप, वामदेव, अत्रि, वसिष्ठ, आणि नारदप्रभृति ऋषि पिंडारकास गेले ॥ १२ ॥ बालिश क्रीडांमध्यें निमग्न असलेल्या कुमार यादवपुत्रांनीं श्रीकृष्णाच्या जांबवंती नामक पत्नीच्या सांबनामक पुत्राला स्त्रीचें सोंग दिलें आणि त्या ऋषिवर्यांकडे जाऊन व नम्रतेचें सोंग आणून ते त्यांच्या पायां पडले व म्हणाले—' हे मुनिश्रेष्ठ हो, ही हरिणाक्षी तरुणी आसन्नप्रसवा आहे. पुत्र व्हावा अशी हिला फार हौस आहे; पण स्वभावतः ही भारी लाजरी आहे, म्हणून तिच्या तर्फेनें आम्ही आपणांस, आपलें ज्ञान बिनचूक असल्यामुळें नम्रतेनें विचारतों कीं, हिच्या उदरीं कोण जन्माला येईल ? ' ॥ १३ ॥ ॥ १४ ॥ ॥ १५ ॥

शुकाचार्य म्हणाले—हे राजा, याप्रमाणें थट्टा करून विचारल्यामुळें शांत व दांत असे ते मुनीसुद्धां रागावले. ते म्हणाले, हे अप्रबुद्ध कुमार हो, तुमच्या यादवकुलाचा नाश करणारें मुसळ हिच्या उदरीं जन्मास येईल ! ॥ १६ ॥

तो ऋषींचा भयंकर शाप ऐकून अत्यंत भीतीनें त्रस्त झालेल्या कुमारांनीं सांबाच्या पोटावरील वस्त्रांच्या घड्या काढल्या, तेव्हां त्यांत त्यांना खरोखरच एक लोखंडाचें मुसळ दिसलें ! ॥ १७ ॥

---

गेले, अशा श्लोकांतील मुख्य पदाचा अन्वय आहे. ' **विसृष्ट** ' म्हणजे निरोप दिलेले. मागील श्लोकांत सांगितलेल्या परमेश्वराच्या उदारकीर्तित्वाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं मुनींच्या साहाय्यानें केलेल्या कर्मांची फोड व्हावी म्हणून **पुण्यनिवहानि, सुमंगलानि गायज्जत्कलिमलापहराणि** हीं तीन पदें योजिलीं आहेत. पाहा:—( १ ) अश्वमेध-प्रभृति कित्येक कर्मे पुण्य मात्र सुख उत्पन्न करणारीं असतात. ( २ ) पुत्रादिकांचें लालनपालनादि कर्म तात्कालिक मात्र सुख उत्पन्न करणारें असतें. आणि ( ३ ) प्रायश्चित्तादि कर्मे पापहरण करण्याच्या कामीं मात्र उपयोगीं पडतात. परंतु परमेश्वरानें मुनींकडून करवून घेतलेली कर्मे सर्वतोमुख होतीं; म्हणजे तीं कर्मे पुण्योत्पादक, अखंड-सुखदायक आणि पापहारक होतीं, हें सांगावयाचें आहे. ' **पुण्यनिवहानि** ' म्हणजे, त्या त्या कर्मांचें कीर्तन, श्रवण, आचरणादि केलें असतां तीं तीं कर्मे पुण्य प्राप्त करून देणारीं होतीं. ' **सुमंगलानि** ' म्हणजे तीं कर्मे निरतिशय ( अत्यंत ) व नित्य ( अखंड ) सुख उत्पन्न करणारीं होतीं आणि ' **गायज्जगत्कलिमलापहराणि** ' म्हणजे त्या कर्मांचें गायन करण्यांतच मग्न झालेल्या जगताचीं सर्व पापें, तामस वृत्तीमुळें उत्पन्न होणारीं पापें नाहींशीं करण्याचें सामर्थ्य त्या कर्मांमध्यें होतें. श्रीकृष्ण वसुदेवाच्या गृहामध्यें संहाररूपानें, स्वकुलाचा संहार करण्याची इच्छा धारण करून राहात असल्यामुळें, त्यानेंच त्या मुनींस जवळच असलेल्या पिंडारकक्षेत्रीं राहण्यास सांगितलें व ते तेथें जाऊन राहिले ॥ ११ ॥ १२ ॥

'आम्ही अभाग्यांनीं हा काय वेडेपणा केला, घरीं परत गेल्यावर आम्हांस वडील माणसें काय म्हणतील असें विव्हळ होऊन ते कुमार परस्परांस म्हणाले आणि तें मुसळ घेऊन द्वारकेस गेले ॥ १८ ॥ ज्यांचीं मुखें म्लान झालीं आहेत अशा त्या यदुकुमारांनीं तें मुसळ राजसभेंत नेलें व सर्व यादवांसमक्ष उग्रसेन राजाला सगळी कच्ची हकीकत सांगितली ॥ १९ ॥ तेव्हां तो भयंकर शाप ऐकून व तें मुसळ प्रत्यक्ष पाहून सर्व सभेला विस्मय वाटला आणि त्यांचीं मनें भीतीनें गांगरून गेलीं ॥ २० ॥

मग राजाज्ञेनें सेवकांनीं त्या मुसळाचें पीठ केलें; पण मुसळाच्या तोंडाशीं असणारें लोखंडाचें वेढें कांहीं कुटतां येईना. तेव्हां तें जसेंच्या तसें लोखंड आणि मुसळाचें पीठ त्यांनीं समुद्रांत फेकून दिलें ॥ २१ ॥ तें लोखंडाचें वेढें एका माशानें गिळलें आणि तें पीठ समुद्राच्या लाटांनीं किनाऱ्यावर आणून टाकलें. त्या पिठापासून अणकुचीदार गवत उगवलें ! ॥ २२ ॥ पुढें धीवरांनीं जाळीं टाकून मासे धरले, त्यांत ज्यानें लोखंड गिळंकृत केलें होतें तो मासाही होता. तो चिरला तेव्हां त्याच्या पोटांत तें लोखंड निघालें. तें एका पारध्यानें आपल्या बाणाच्या टोंकास लावलें ॥ २३ ॥

श्रीकृष्ण सर्वज्ञ प्रभु ! त्याला शापाची व मुसळ कुटल्याची सर्व हकीकत स्वभावतःच समजली. श्रीकृष्ण म्हणजे कर्तुंअकर्तुं समर्थ ! परंतु उन्मत्त यादवांस झालेला शाप अन्यथा करण्याची त्याची इच्छाच नव्हती. यादवकुलाचा नाश व्हावा म्हणूनच त्यानें हें सर्व घडवून आणिलें होतें ! अर्थात् त्यानें कालस्वरूप धारण करून शाप जशाचा तसाच फलद्रूप होऊं दिला ॥ २४ ॥

---

**टीप** — आहुक = उग्रसेन. त्यानें सुद्धां श्रीकृष्णाची सल्लामसलत न घेतांच तें मुसळाचें पीठ व पीठ न होणारें अवशिष्ट राहिलेलें लोखंड समुद्रांत फेकून दिलें ॥ २१ ॥ तरल = तरंग, लाटा ॥ २२ ॥ दुसऱ्या माशांबरोबर हा 'अन्य' चा अर्थ शल्य = बाणाचें अग्र, टोंक ॥ २३ ॥

## पहिला अध्याय समाप्त

# अध्याय २ रा

शुकाचार्य म्हणाले—श्रीकृष्णावर अत्यंत प्रेमपूर्वक भक्ति करणारे नारद ऋषि कृष्णाच्या बाहुबलामुळें निर्भय असणाऱ्या द्वारकेंत वरचेवर येऊन राहात असत. श्रेष्ठ श्रेष्ठ देव सुद्धां ज्याची उपासना अहर्निश करतात, अशा अभय देणाऱ्या श्रीकृष्णपदकमलाची उपासना, सर्वत्र भयानें व्याप्त झालेला असा कोणता जीव करणार नाहीं? ॥ १ ॥ २ ॥ एकदां अतिथिरूपानें नारद ऋषि वसुदेवगृहीं आले असतां, त्यांस सुखासनावर बसवून, पूजा झाल्यानंतर वसुदेवानें त्यांस नमस्कार केला व तो म्हणाला ॥ ३ ॥

---

**टीप** — नारदांस निरोप देऊन पाठविलें तरी ते पुनःपुनः—बहुतेक—सर्वदा द्वारकेंत येऊन राहात असत. आतां कोणी शंका घेईल कीं, नारदाल दक्षप्रजापतीचा शाप झाल्यामुळें त्यांना एका ठिकाणीं राहतां येत नसे, मग ते द्वारकेंतच एके ठिकाणीं कसे राहूं शकले? या शंकेला उत्तर 'गोविंदभुजगुप्तायां' या पदांत आहे. गोविंदभुजरक्षित द्वारकेमध्यें दक्षाच्या शापाचें सामर्थ्य चालण्यासारखें नव्हतें, असा भावार्थ. लालसा म्हणजे उत्कंठा. कृष्णाची भक्ति करण्यामध्येंच अतिशय उत्कंठित असे नारदमुनि होते ॥ १ ॥ ज्यांच्या भजनपूजनादिकांमध्यें नारदासारख्या मुक्तांस सुद्धां प्रचंड आवडी असते, त्या श्रीकृष्णाची कोण बरें भक्ति करणार नाहीं? सर्व जीव करतीलच, या आशयानें या श्लोकाचा अवतार आहे. इंद्रियवान् = इंद्रियें असणें, मनासह पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें असणें हेंच आहे, अधिकारीपणाचें विशेषण ज्याच्या ठिकाणीं तो पुरुष—इंद्रियें असल्यामुळें ज्याला विश्वाचें, सभोंवार असणाऱ्या जगताचें ज्ञान होत असतें तो मनुष्य होय. इंद्रियवान् या विशेषणानें विकसित झालीं आहेत इंद्रियें ज्यांचीं असे मनुष्यप्रभृति सर्व जीव घेणें येथें इष्ट आहे. सर्वतः मृत्यु हेंही विशेषण साभिप्राय आहे. या जगांतील सर्व भूतभौतिक वस्तु घ्या अथवा भूर्भुवादि सर्व भुवनें घ्या, प्रत्येक ठिकाणीं जीवाला नेत्रादि इंद्रियें जागृत ठेवणाऱ्या मनुष्यादि जीवाला, मृत्यूचें, आत्यंतिक नाशाचें, भय असतें. जिकडे तिकडे त्याला सर्वभक्षक मृत्यु दिसत असतो. असो. असा सर्वत्र निर्दय मृत्यूला पाहणारा प्रत्येक जाणता पुरुष, सर्वथा निर्भय असणारें जें श्रीकृष्णाचें चरणकमल त्याची उपासना करण्यास प्रवृत्त होईल यांत शंका नाहीं. शिवाय मुक्त झालेले नारदादि महर्षि सुद्धां ज्याची हौसेनें नितांत भक्ति सदैव करितात, त्या श्रीकृष्णाचें भजन-पूजन शहाणे संसारी जीव तर अवश्य करतीलच ॥ २ ॥

वसुदेव म्हणाले, हे ऋषिवर्य, आपलें परिभ्रमण सर्व जीवांच्या कल्याणार्थ असतें. आईबाप जशी मुलांच्या कल्याणाची काळजी अंतःकरणपूर्वक घेतात, तशीच दयाळु संत दीनांची काळजी घेऊन त्यांचे कल्याणार्थ झटत असतात ॥४॥ ब्रह्मदेवादि कीटकापर्यंतच्या संसारी जीवांचें आचरण प्रायः स्वेतरांस दुःख देण्यामध्येंच अवतीर्ण होतें. देवांचें कर्म सर्व जीवांस कधींमधीं क्षणभंगुर सुख देतें; परंतु शेवटीं त्याचा परिणाम स्वतःस व इतरांस दुःखावहच होतो; परंतु आपणांसारख्या सर्वत्र ईश्वर-विभूति पाहून ईश्वराचें निदिध्यासन करणाऱ्या साधूंचें वर्तन जीवांच्या केवळ शुद्ध सुखा-मध्यें मात्र परिणत होतें. ॥ ५ ॥ वसुदेव म्हणाले, हे महर्षि, देवांचें देणें भक्तांच्या सूक्तासूक्त कर्मानुसार मात्र असतें; परंतु साधूंचें तसें नाहीं. ते दीनांवर दयाच करितात. साधुसंत जीवांचें पापपुण्य कांहीं पाहात नाहींत ॥ ६ ॥ हे महर्षे ! आपण दीनवत्सल आहां, तेव्हां जो धर्म श्रद्धापूर्वक आचरिला असतां सर्व प्रकारच्या भयापासून ( मृत्यूपासूनही ) जीवांना मोक्ष मिळतो, अशा भागवत धर्माचें स्वरूप काय तें आम्हांला सांगा ! ॥ ७ ॥ पूर्वी मी मुक्ति देणाऱ्या परमेश्वराची पूजा केली खरी; पण मी ईशमायेनें मुग्ध झालों असल्यामुळें मोक्षद ईश्वरापाशीं संततीचीच प्रार्थना केली ! नारदा ! 'मोक्ष द्या !' असें मागण्याची मला मायामोहानें बुद्धिच झाली नाहीं ! ॥ ८ ॥ करितां भयानक संकटें उत्पन्न करणाऱ्या ह्या संसारसागरांतून लीलेनें प्रत्यक्ष तरून जातां येईल असा उपदेश आपण आम्हांला करा ! ॥ ९ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित राजा, याप्रमाणें बुद्धिमंत वासुदेवानें केलेला प्रश्न ऐकून व श्रीहरीच्या मोक्षद गुणांचें कल्याणप्रद स्मरण अर्थात् हरिस्मरण होत

---

**टीप**—देवांना सुद्धां साधूंची उपमा देणें, देवांची साधुसंतांशीं तुलना करणें अयोग्य ( अनुचित ) आहे, अशा अर्थानें वसुदेव म्हणतोः— अतिवृष्टि, अनावृष्टि, भूकंप इत्यादींमध्यें प्रकट होणारें देवांचें कर्म जीवांच्या दुःखासच कारण होत असतें. त्वादृश म्हणजे तुमच्यासारख्यांचें. अच्युतात्मनां म्हणजे अच्युतच, श्रीकृष्ण भगवानच ज्यांच्या अंतःकरणीं आत्मरूपानें वास्तव्य करितो ॥ ५ ॥

**टीप** — आणखी यद्यपि देव भक्तांस सुखकारक प्रसंग उत्पन्न करितात, तथापि ते प्रसंग व तज्जन्य सुख हीं भजनानुसारच ( कमीजास्ती नाहीं, भजनाच्या मगदुराप्रमाणें ) असतात. कर्म हेंच असतें साहाय्य ज्यांना त्यांना देव कर्मानुसार मात्र फल देतात ॥ ६ ॥ तें साधुकर्म असेंः—म्हणजे आमच्या येथें आपल्या येण्यानेंच आम्ही कृतार्थ झालों, असें आपलें दीनवात्सल्य आहे, तरीही आम्ही विचारतों कीं, ज्या तुम्ही आचरीत असलेल्या धर्मांनीं भगवंताची प्रसन्नता साध्य होते ( भगवान् प्रसन्न होतो ) ते धर्म आम्ही विचारतों हा अर्थ ॥ ७ ॥ 'वसुदेवा ! तुमच्यापेक्षां अन्य कोणता पुरुष भगवंताच्या प्रसादाला योग्य असा आहे ?' असें विचाराल तर मी सांगतों. वासुदेवाला याच वेळीं भगवंतांनीं प्रसूतिगृहांत जें काय भाषण केलें होतें, त्याची आठवण झाली ॥ ८ ॥

आहे हें अनुभवून, प्रेमभरानें आनंदित झालेले देवर्षि नारद वसुदेवाला उपदेश करण्याची प्रस्तावना करूं लागले ॥ १० ॥

नारद म्हणाले, हे यदुकुलश्रेष्ठा, विश्वकल्याणकारी, पवित्र व विश्वोद्धारक असा भागवतधर्मविषयक प्रश्न तूं विचारलास हें फार चांगलें झालें ॥ ११ ॥ ह्या भागवत-धर्माचें श्रवण, पठण, मनन, आदरानें केलें असतां देव-द्विज-गुरु यांचा व जगताचा द्वेष करणाऱ्या पतितांचा सुद्धां तत्काल उद्धार होतो ॥ १२ ॥ सर्व मंगलांचें माहेरघर असून ज्याचें भजन-पूजन-कीर्तनादि सर्व शुभावह होतें, त्या सर्वैश्वर्यसंपन्न नारायणाचें पुण्य-स्मरण तुझ्यामुळें मला झालें; म्हणून मी, तुझा ऋणी आहें ॥ १३ ॥ असो. याविषयीं प्राचीन काळचा ऋषभपुत्रांचा व जनकाचा जो धर्मसंवाद झाला त्याचा इतिहास तुला सांगतों ॥ १४ ॥ स्वायंभु मनूचा मुलगा प्रियव्रत, त्याचा अग्नीध्र, त्याचा मुलगा नाभि आणि त्याचा पुत्र ऋषभ होता ॥ १५ ॥ ऋषभाला वासुदेवाचा अंश म्हणत. कारण, मोक्षधर्माचें प्रवर्तक व्हावें अशी त्याची इच्छा होती. त्या ऋषभाला वेदपारंगत असे शंभर पुत्र झाले ॥ १६ ॥ त्यांतील भरत हा श्रेष्ठ होय. तो भरत ईश्वराचा मोठा भक्त असे. त्या नारायणभक्त भरत राजापासून भरतखंडाच्या नांवाची व्युत्पत्ति प्रसिद्ध आहे ॥ १७ ॥ संसारांतील सर्व भोग सुखांचा अनुभव घेतल्यानंतर तो भरतराजा परमेश्वराची उपासना करण्याकरितां

---

**टीप**— भागवतधर्म सांगावयाचा म्हणजे हरीचे गुण वर्णन करावयास हवेत. अर्थात् सहज हरीचेंच स्मरण ज्यांस झालें, ते नारद, असा अर्थ होय ॥ १० ॥ आपणांस आनंद झाला, याचें स्पष्टीकरण नारद, तीन श्लोकांनीं ( श्लोकांमध्यें ) करतात. प्रच्छ धातु परस्मैपदी आहे, म्हणून **पृच्छसि** असें रूप हवें. **विश्वभावनान्** = सर्वत्र पापांची शुद्धि करून कल्याणप्रद होणारे धर्म ॥ ११ ॥ आदृत म्हणजे आस्तिक्यभावानें, श्रद्धेनें ग्रहण केलेला. अनुमोदित म्हणजे दुसऱ्यांनीं आचरला असतां त्याला संमति देणें म्हणजे त्याची स्तुति करणें होय. सद्धर्म म्हणजे भागवत धर्म. मुळामध्यें असलेलें देव हें पद संबोधनार्थी घ्यावें अथवा **देवविश्वद्रुहः** असा समास समजून त्याचा अर्थ देवांचा व जगतांचा ( सर्व चराचर वस्तूंचा ) द्वेष करणारे पापी, नास्तिक असाही करावा. तात्पर्य, आस्तिकांसच मोक्ष देणारा हा धर्म आहे असें नाहीं, तर सर्वद्वेषी महापातक्यांनीं सुद्धां या धर्माचें श्रवणादि केलें असतां त्यांचा उद्धार होतो ॥ १२ ॥

**टीप** — त्या ऋषभपुत्रांत जे नऊ योगीश्वर झाले, त्यांचें चरित्र सांगण्यासाठीं इतर पुत्रांचें चरित्र वेगळें करून, त्या नवांपासून विभक्त करून, या पुढील श्लोकांत सांगतात — हें अजनाभ नामक वर्ष ( खंड ) ज्याच्या नांवानें ( **भरतखंड** या नांवानें ) अद्भुत प्रसिद्धीला आलें, तो महाभक्त भरत होय. या अजनाभ खंडाला आपलेंच नांव देण्याला समर्थ असणारा भरत फारच धर्मशील असला पाहिजे, असें आमच्या खंडास त्याचें नांव मिळालें यावरून ठरतें ॥ १७ ॥ हिला म्हणजे पृथ्वीला. निद्याला म्हणजे

सर्व संसाराचा व राज्याचा त्याग करून अरण्यांत गेला आणि तीन जन्मांनीं त्याला हरिपदाची प्राप्ति झाली ॥ १८ ॥ बाकीच्या नव्याण्णव ऋषभपुत्रांपैकीं नऊ पुत्र नऊ खंडांचे राजे झाले आणि एक्याऐशीं पुत्रांनीं कर्ममार्ग स्थापून तो चालविणारे ब्राह्मण झाले ॥ १९ ॥ बाकीचे नऊ ऋषभसुत महाज्ञानी, ब्रह्मवेत्ते, आत्म्याचें उद्घाटन करणारे, तपस्वी, अध्यात्मरत, दिगंबर आणि एकनिष्ठ असे होते ॥ २० ॥ कवि, हरि, अंतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, आविर्होत्र, द्रुमिल, चमस, करभाजन अशीं त्याचीं नांवें होतीं ॥ २१ ॥ हें सर्व नित्यानित्य ब्रह्मांड भगवद्रूपी असून तें आत्मस्वरूपाव्यतिरिक्त नाहीं, आत्मस्वरूपच आहे, असें परमार्थतः जाणणारे ते नऊ ब्रह्मवेत्ते, जगदोद्धारार्थ पृथ्वीवर हिंडत असत * ॥ २२ ॥ सुर, सिद्ध, साध्य, गंधर्व, यक्ष, मनुष्य, किन्नर, नागलोक, मुनिचारणादिकांचीं भुवनें यांत हे जीवन्मुक्तमुनि स्वेच्छेनें संचार करीत असत ॥ २३ ॥ या भारतवर्षांत निमि राजानें मोठ्या समारंभानें ऋषिसाहाय्यानें यज्ञसत्र चालविलें होतें, त्या ठिकाणीं हे नऊ जीवन्मुक्त अकस्मात्–स्वेच्छेनें–एकदां प्राप्त झाले ॥ २४ ॥ हे राजा, सूर्याप्रमाणें दैदीप्यमान असणारे ते महाभगवद्भक्त आलेले पाहून यजमान निमि-राजा, विप्र व अग्नि हे सर्व त्यांचें स्वागत करण्यासाठीं स्थानावरून उठले ॥ २५ ॥

ते नारायणस्वरूप आहेत असें जाणून संतुष्ट झालेल्या त्या विदेही निमि (जनक) राजानें त्यांस आसनावर बसवून त्यांची परम आदरानें पूजा केली ॥ २६ ॥ ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांप्रमाणें स्वयं तेजस्वी असणाऱ्या या मुनींस राजानें मोठ्या नम्रतेनें विचारिलें ॥ २७ ॥

राजा म्हणाला — लोकांस सतावणाऱ्या मधु राक्षसाला मारून जगतास सुख देणाऱ्या भगवानाचे आपण महाभागवत साक्षात् सहकारी आहांत, असें मला वाटतें, कारण विष्णुभक्तच नेहमीं जगदुद्धारासाठीं त्रैलोक्यांत हिंडत असतात ॥ २८ ॥ क्षणभंगुरच देह, तरी जीवाला मनुष्यदेह प्राप्त होणें अत्यंत दुर्लभ आहे. त्यांतही भगवंताला प्रिय असणाऱ्या भक्तोत्तमाचें प्रत्यक्ष दर्शन होणें अत्यंत दुर्लभ असतें ॥२९॥ मनुष्यांचा उत्त-मोत्तम ठेवा म्हणजे संतांचा समागम होय. हा समागम एक अर्धाक्षणपर्यंत मात्र जरी झाला तरी त्यांत जीवाच्या उद्धाराचें कार्य होतें असें आहे व हा दुर्लभ संतसमागम आम्हांस झाला आहे, म्हणून हे निष्पाप मुनि हो ! जेणेंकरून आम्हां जीवांचें जें आत्यंतिक कल्याण त्यासंबंधीं मी आपणास पृच्छा करतों ॥ ३० ॥ मुनींनो, भागवतधर्म ऐकण्याची योग्यता आम्हांस आहे, असें आपणांस वाटत असेल, तर ते भागवतधर्म आम्हांस कृपा करून सांगावे. सज्जन हो ! परमेश्वरास शरण गेलेल्या भक्तानें त्या भागवतधर्मांचे

---

त्यानें गृहत्याग केला. उपासना = सेवा. उपासीन = सेवा करणारा असा ॥ १८ ॥

---

* **एकनाथः**– त्यांसी जीवीं नाहीं विषयासक्ति । यालागीं खुंटेना त्यांची गति॥
इच्छामात्रें गमनशक्ति । सुखें विचरती निष्काम ॥ २३ ॥

अनुपालन केलें असतां अनादि श्रीभगवान् प्रसन्न होऊन आपलें स्वस्वरूप सुद्धां त्या भक्ताला देतो, असें म्हणतात ॥ ३१ ॥

नारद म्हणाले, हे वसुदेवा ! निमिराजानें याप्रमाणें त्या महंतांस भागवतधर्मविषयक प्रश्न विचारला. हा उत्तमोत्तम प्रश्न विचारला, हें पाहून त्या मुनींनीं राजाचें ऋत्विजांचें व सभासदांचें परमप्रीतीनें अभिनंदन केलें ॥ ३२ ॥

कवि म्हणालेः—राजा ! हा सर्व संसार असत् होय असें समजून ज्यानें विषयविरक्त होऊन अच्युताच्या चरणकमलाची ह्या लोकीं उपासना केली, त्याला मृत्युलोकींच्या भीतीचें कांहींच कारण उरत नाहीं. सर्व प्रकारच्या भीतीपासून मुक्त होण्याचें उत्कृष्ट साधन म्हणजे परमेश्वराची अखंड भक्ति होय ॥ ३३ ॥ अज्ञानी जीवाला सुलभतेनें मुक्त होतां यावें व आत्मस्वरूपाची प्राप्ति व्हावी म्हणून भगवंतानें जे उपाय सांगितले आहेत, तेच भागवतधर्म होत ॥ ३४ ॥ राजा ! या उपायांचा अवलंब भक्तिपूर्वक करणारा जीव केव्हांही मार्गभ्रष्ट होण्याची भीति नसते. तो धांवत असल किंवा डोळे मिटून चालत असला तरी तो ठेंचकळेल किंवा पडेल, अशी मुळींच भीति बाळगावयास नको ॥ ३५ ॥ राजा ! जीं जीं कर्में शरीर, वाणी, मन, इंद्रियें, बुद्धि व

---

**टीप**—यत्र म्हणजे संसारांत. असदात्मभावात् म्हणजे असत्-नाशवंत-म्हणून मिथ्या असणाऱ्या शरीरादि विषयांवरच आत्मभाव ठेवल्यामुळें, देहादि मीच आहें, विकारी मीच आहें, असा निश्चय झाल्यामुळें, सर्वदा खिन्नमनस्क असणाऱ्या जीवाची भीति सर्वथा नाहींशी होण्याचें उत्तमोत्तम साधन म्हणजे हरिचरणकमलाची एकनिष्ठ भक्ति होय. या भक्तीनें भीति सर्वथा नष्ट होते ॥ ३३ ॥

**टीप** —भागवतधर्म म्हणजे काय त्याचें उत्तर देण्यासाठीं कविमुनि भागवतधर्माचें लक्षण ‘ ये वै ’ या श्लोकांत सांगतात. **मन्वादिमुखेन वर्णाश्रमादिधर्मान् उक्त्वा अतिरहस्यत्वात् स्वमुखेन एव भगवता अविदुषां अपि पुंसां अंजः सुखेन एव आत्मलब्धये ये वै उपायाः प्रोक्तः तान् भागवतान् धर्मान् विद्धि** मन्वादि ऋषींनीं जो वर्णाश्रमधर्म—चार वर्ण व चार ब्रह्मचर्यादि आश्रमांसंबंधानें सांगितलेले अवघड मार्ग विहित केले आहेत, त्यांत गूढ गोष्टी फार म्हणून पुष्कळांस ते अनुपयोगी होतात. म्हणून अविद्वानांस—साध्याभोळ्या अडाण्यांसही—सुलभतेनेंच आत्मप्राप्ति होईल, अशीं साधनें भगवंतानीं प्रत्यक्ष स्वमुखानें सांगितलीं. तीं साधनेंच ते मोक्षप्रवण धर्म भागवत होत. भगवंतांनीं सांगितले म्हणून ते ‘ भागवत ’ आणि मुक्तीची सुलसोय करून देतात म्हणून श्रेष्ठ धर्म होत. भगवंतांनींच तरणोपाय सांगून मुक्तीचें रहस्य सर्वांस अवगत होईल असें केलें, असाही श्रीधराचा अभिप्राय असणें शक्य आहे ॥ ३४ ॥

**टीप**— या भागवतधर्माचा आश्रय केला म्हणजे सर्व विघ्नें पळून जातात. अर्थात् भक्त मार्ग चुकत नाहीं. विघ्नेंही येथें विघ्न करीत नाहींत; पण योगमार्गानें

अहंकार यांच्या द्वारा जीव जाणूनबुजून करतो किंवा प्रारब्धयोगानें जीं कर्मे त्याच्या हातून होतात, तीं सर्व कर्मे ( व त्यांचीं फळें ) परमेश्वर जो नारायण त्याला अर्पण करावीं, हा परम भागवतधर्म होय ॥ ३६ ॥ परमेश्वराला जो विन्मुख होतो, त्याला

---

जाणाऱ्याला वाटेंत विघ्नें फार असतात. फार काय? डोळे झांकून धांवणारा-अज्ञानी पुरुषही या भागवत धर्माचे ठिकाणीं अडखळत नाहीं. निमीलन म्हणजे अज्ञान होय. म्हटलें आहे:—श्रुति व व स्मृति हे विप्रांचे दोन डोळे होत असें म्हणतात. या श्रुतिस्मृतींतील एक नसलें-श्रुति नसली किंवा स्मृति नसली तर तो विप्र काणा-एकाक्ष होतो आणि दोन्ही नसलीं म्हणजे अंध होतो असें म्हणतात. अर्चन, पूजन, श्रवण, कीर्तन, आत्मनिवेदन, सख्य, दास्यप्रभृति जे अनेक भक्तिप्रकार आहेत, त्यांतील जें जें इष्ट वाटेल त्याचें अनुष्ठान लवकर लवकर संपवून इष्टतर प्रकाराकडे जाणें याचेंच नांव "**भक्तिमार्गांतील धावन**" होय. अशी धांवती पण एकनिष्ठ भक्ति करणारा जीव भ्रष्ट होत नाहीं, त्याला प्रत्यवायांची अडचण येत नाहीं. त्याचप्रमाणें तो पडत नाहीं म्हणजे त्याची फलच्युति होत नाहीं ॥ ३५ ॥

* **टीप** — आपण जें कर्म करितों त्याचें फल लागलींच तत्काल मिळतें असें नाहीं. कर्मफल उत्पन्न होण्याला केव्हां केव्हां कालावधि लागतो. म्हणून जीं कर्मे **फलोन्मुख** झालीं नसतात, त्यांस **संचित** म्हणतात आणि ज्या देहांत कर्मे केलीं त्याच देहांत कित्येक कर्मे फलोन्मुख होण्याची वेळ न आल्यामुळें जीवाला दुसरा जन्म, फल भोगण्यासाठीं घ्यावा लागतो. असो; या दुसऱ्या जन्माच्या आरंभाला कारण होऊन त्या जन्मामध्येंच फळ उत्पन्न होण्याला तयार झालेलीं जीं कर्मे त्या कर्मांस **प्रारब्ध** म्हणतात. या प्रारब्धाच्या सामर्थ्यानें जीवाचा **स्वभाव** बहुतेक ठरत असतो. बहुतेक म्हणण्याचें कारण जीवाला प्रारब्धघटित स्वभाव बदलण्याचें **सामर्थ्य** आहे. या उपकारक सामर्थ्यानें **क्रियमाण** होतें. असो. संचित, प्रारब्ध व क्रियमाण, यांपैकीं प्रारब्ध हेंच फलोन्मुख कर्मे ( कर्मफलें ) भोगावयास लावतें. हीं कर्मे बुद्धिपुरःसर होत नाहींत; प्रारब्धघटित स्वभावानुसार होतात. म्हणून या श्लोकांत 'अनुसृतस्वभावात्' असा प्रयोग आहे. कायादिकांकडून कर्मे करवून घेणारे आपण तीं तीं कर्मे बुद्धि-पूर्वक करितों आणि स्वभावघटित कर्मे आपोआप ( अबुद्धिपूर्वक ) होतात. तात्पर्य-**बुद्धिपूर्वक** ( vountary स्वेच्छाप्रेरित ) आणि **स्वभावप्राप्त** ( Involuntary ) अशीं दोन्हीं प्रकारचीं कर्मे ( अहंकार-वासनासहित सर्व **कर्मफलें** ) **परमेश्वराला अर्पण करावीं**— तो कर्ताकरविता, भोक्ताभोगविता आहे, असें समजून परमेश्वराला अर्पण करावीं-हा वैदिक उपदेश जनकाला कविमुनीनें केला आहे. अर्पण करण्याचा

---

**श्री एकनाथ**— अद्वैत भजनाचें वोजें। मी माझें तूं आणि तुझें ॥
ज्यासी नुरेचि सहजनिजें। तो भक्त मानिजे उत्तमत्वें ॥ ३५ ॥

त्याच परमेश्वराची माया स्वरूपाचें विस्मरण पाडते व त्याच्या मनांत भलतेच ग्रह उत्पन्न करते. अर्थात् तो अनात्म्याच्या भीतीनें ग्रस्त होतो. ही भीति व तिची उत्पादक माया यांचा नाश करण्यासाठीं शहाण्या मनुष्यानें गुरु हाच आपला देव, आपलें अत्यंत प्रीतीचें ठिकाण असें मानून तत्प्रणीत भगवद्भक्ति एकनिष्ठेनें करावी ॥ ३७ ॥

राजा ! हें विश्वप्रभृति द्वैत वस्तुतः नसून भासित होतें, याचें कारण जीवाचें मन होय. स्वप्नांतील विषय किंवा मनोराज्यांतील विषय जसें आपलें मन कल्पितें तद्वतच हे दृश्य विषय मनःकल्पित होत. म्हणून कर्माचें संकल्प-विकल्प करणारें मन ज्ञानी पुरुषानें आपल्या स्वाधीन ठेवावें. त्याला भटकूं देऊं नये. असें मन आवरलें म्हणजे जीवाला अभय प्राप्त झालेंच पाहिजे ॥ ३८ ॥ सुदर्शनचक्र हातांत धरणाऱ्या चक्रपाणीचीं सुमंगल कर्में व त्याचे कल्याणकारी अवतार जे झाले त्या लीलांच्या व अवतारांच्या गोड कथा मुमुक्षूनें ऐकाव्या. परमेश्वराचीं जीं सार्थ नामें भक्त गातात, तीं नामें आपण लाजलज्जा गुंडाळून ठेवून गावीं आणि या प्रकारें वैराग्यपूर्ण निःसंगवृत्तीनें जगांत वागावें ॥ ३९ ॥ आपल्याला अत्यंत प्रिय असणाऱ्या परमेश्वराचीं चरित्रें गाण्या - ऐकण्या-

---

हा दिसण्यांत सोपा असणारा अवघड मार्गही वैराग्यानें, अभ्यासानें, भक्तीनें आणि निष्ठेनें साध्य होतो. कारण सात्त्विक कर्मकर्त्याला परमेश्वराचें साहाय्य येथें मिळतें ॥ ३६ ॥

* **टीप**— ईश्वरपराङ्मुख जीव झाला म्हणजे तो मायावश होतो. ही माया त्या जीवाला परमेश्वरी स्वरूपाचें—आत्मस्वरूपाचें, मीच स्वरूपतः परमात्मा आहें, या स्वरूपाचें—विस्मरण पाडते, ' आपण आत्मस्वरूप आहों, परमेश्वर आहों ' असें स्फुरण होऊं देत नाहीं. असें विस्मरण झालें म्हणजे विपरीत ज्ञान, ' मी देहादिच आहें ' हें अयथार्थ ज्ञान [ अज्ञानच हें ] उत्पन्न होतें आणि ' मी निराळा, विश्व निराळें ' असा दृढ निश्चय होऊन हें विश्व मला नाहींसें करील, दुःख देईल ' अशी भीति या अज्ञानी जीवाला उत्पन्न होते. विस्मृति, विपरीत ज्ञान आणि विनाश भीति हीं सर्व **एका मायेचीं** लेंकरें, नातवंडें, पणतवंडें आहेत. परमेश्वराला शरण जाऊन त्याची अव्यभिचारिणी, अनन्य-भक्ति केली पाहिजे. जो जीव परमेश्वराची अशी नितांत भक्ति करण्यास सज्ज होतो, त्यानें आपल्यावर अनुग्रह करून आपल्यास सदुपदेश — ब्रह्मोपदेश — करणारा जो गुरु, तोच परमेश्वर आहे, तोच निजात्मा आहे. तोच सर्व प्रेमाचें अधिष्ठान आहे, असें समजून गुरुभक्ति, त्यानें विहित केलेली ईश्वरभक्ति, त्यानें ज्या ब्रह्मज्ञानाची वाट दाखविली. ती ज्ञानभक्ति आणि निजरूपाची भक्ति केली पाहिजे. समंजस भक्त हाच मार्ग आदरितो ॥ ३७ ॥

---

**श्री एकनाथ—** यापरी ज्याचे चित्ताचे ठायीं । भेदू निःशेष उरला नाहीं ॥
तेथ माझें हें कांहीं । तें निमालें पाहीं जेथींच्या तेथें ॥ ३६ ॥

**श्री एकनाथ—** डावे हातींचे पदार्था । उजवे हातीं स्वयें देतां ॥
येथें कोण देता कोण घेता । तेवीं एकात्मता सर्व मूर्तीं ॥ ३९ ॥

मध्येंच ज्यानें आपलें भक्तिपूर्वक कर्म परमेश्वरार्पण केलें, त्या एकनिष्ठ भक्ताच्या हृदयांतील प्रेमांकुर पराकाष्ठेचा जोरावतो, त्याचें मन आर्द्र होतें. अर्थात् परमेश्वरलीला आठविली म्हणजे तो मोठमोठ्यांदा रडतो काय, खदखद हंसतो काय, ओरडतो काय, गातो-नाचतो काय ! हें सर्व त्याचें बिलक्षण असतें. तो जगांतील संसारांत नसतोच मुळीं ! ॥ ४० ॥ काय सांगावें ? आकाश, वायु, तेज, जड, पृथ्वी, सूर्यचंद्रादि तेजोगोल, दशदिशा, वृक्षपाषाणादि, नद्या, समुद्र, फार काय, हें सर्व दृश्य विश्व हरीचें शरीर होय, अशी भावना करून तो या सर्वांस अनन्य भावानें प्रणाम करतो ॥ ४१ ॥ प्रत्येक घास घेऊन तो गिळीत असतां जसें जेवणाराला तोषण, पोषण आणि क्षुधाशोषण हीं प्रतिक्षणीं होतात, त्याप्रमाणेंच प्रत्येक भक्ताला परमेश्वराचें आराधन करतांना भक्तिसुखाचा, परमेश्वरसाक्षात्काराचा आणि विषयवैराग्याचा तात्पर्य, या तीन गोष्टींचा एककालींच अनुभव येतो ॥ ४२ ॥ अशा प्रकारच्या एकनिष्ठ सेवापरंपरेनें परमेश्वराच्या चरणांची उपासना करणाऱ्या भक्ताला, पराभक्ति, विषयवैराग्य आणि भगवत्साक्षात्कार प्राप्त होतात.

---

**टीप**— केव्हां केव्हां परमेश्वराला मीं भक्तीनें आपल्या स्वाधीन करून घेतला आहे; परमेश्वराचें स्वातंत्र्य हिरावून घेऊन त्याला मीं एकनिष्ठ भक्तीनें आपला दास केला आहे. हें ध्यानांत आलें म्हणजे हा भक्त मोठ्यांदा खदाखदां हांसतो, इतक्या वेळपर्यंत माझी उपेक्षा देवानें केली असें समजून तो केव्हां रडतो, केव्हां उत्सुकतेची परमावधि होऊन तो 'हे हरे मजवर, अनुग्रह कर !' असें म्हणून ओरडतोही ! आणि अति हर्षानें तो गातो, व 'जिंकलें, मी परमेश्वरांस जिंकलें, धन्य धन्य मी !' असें म्हणून तो नाचतोही ॥ ४० ॥ आकाशप्रभृति जो म्हणून स्थावरजंगम पदार्थ आहे तो हरिच आहे, असें समजून तो त्याला प्रणिपात करतो. '**प्रणमेत्**' हें शक्यार्थी रूप व्याकरणदृष्ट्या आहे खरें; पण होण्याच्या संभवालाहि संस्कृत वाङ्मयांत शक्यार्थ उपयोगितात ॥ ४१ ॥

**टीपः**—हरिभजनामध्यें दंग होणाऱ्या पुरुषाची प्रेमपूर्ण—प्रेम हेंच लक्षण, चिन्ह जिचें भक्ति, प्रेमाचें निधान असणाऱ्या भगवद्रूपाचा साक्षात्कार आणि या साक्षात्कारामुळें गेहकलत्रादि अन्य विषयांसंबंधानें प्राप्त होणारें वैराग्य ही त्रयी 'भक्ति, स्फूर्ति व विरक्ति' हें त्रिक भक्तांच्या भजनकालींच, एकसमयावच्छेदेंकरून प्रगट होतें ॥ ४२ ॥

---

**श्रीएकनाथ**—आपणा सकट सर्व देहीं । भक्तां भगवंतावांचूनि नाहीं ॥
यालागीं शांति त्याचे ठायीं । स्वानंद पाहीं निःशंक नांदे ॥ ४० ॥

ब्रह्मउन्मादपरमानंदें । जंव जंव पाहे स्वानंद बोधें
तंव तंव चराचर पूर्णानंदें । देखे स्वानंदकंदें दुमदुमित
पृथ्वी आप तेज वायु नभ । देखे हरिरूप स्वयंभ
भूत महाभूतांचें डिंभ । न देखे भिन्न कोंभ अभिन्नत्वें ॥ ४१ ॥

राजा ! नंतर त्या भगवंताला अखंड शांति मिळते आणि तो कृतार्थ म्हणजे मुक्त होतो ॥ ४३ ॥

राजा म्हणाला, महाराज ! " भागवत " कोणाला म्हणतात, तें मला सांगा तसेंच, तो कोणते धर्म पाळतो, त्याचा स्वभाव कसा असतो, तो वागतो कसा, बोलतो कसा, हेंही सांगा. सारांश, ज्या गुणकर्मांनीं तो भगवंताला प्रिय होता तें सर्व मल. सांगा ॥ ४४ ॥

हरि मुनि म्हणाले, यच्चयावत् भूतांमध्यें परमेश्वररूप आपलाच आत्मा आहे, असें जो पाहतो व आपल्या हरिस्वरूपी आत्म्यामध्यें सर्व भूतें आहेत असें जो पाहतो, तोच खरा भगवद्भक्त, तोच खरा भागवतोत्तम होय ॥ ४५ ॥

---

**टीप**– ' ज्याचा विस्तार अनंत आहे व जो प्रमाणपुरःसर ज्ञाता आहे, तो आत्मा वस्तुतः परमेश्वर हरिच होय ' असें तंत्र ग्रंथांत प्रमाणतः सांगितलें आहे, म्हणून आत्मा म्हणजे हरि होय. हा हरि ( आत्मा ) सर्व भूतांमध्यें, फार काय सांगावें आतिसूक्ष्म मशाकांमध्यें सुद्धां - शास्ता, कर्ता, करविता, या रूपानें विद्यमान आसतो. त्या आत्म्याचा म्हणजे **हरीचा** भगवद्भाव म्हणजे संपूर्ण—सर्व ऐश्वर्यांत अत्यंत श्रेष्ठ असणारें ऐश्वर्य सर्व भूतांमध्यें विद्यमान आहे. त्या ऐश्वर्यांत कोठेंही तरतमभाव ( कमीजास्तीपणा ) नाहीं. सर्वत्र निरतिशय ऐश्वर्य आहे. असें जो पाहतो, तसेंच आपल्या आत्म्यामध्यें म्हणजे **हरीमध्ये** सर्व भूतें आहेत असें जो पाहतो, तो भागवतोत्तम होय. हा भगवान् ( हरि म्हणजे आपला आत्मा ) कसा म्हणाल तर ऐका:— ज्या भगवानाच्या ऐश्वर्यादि रूपामध्यें बालाग्र सुद्धां कमीपणा नसतो, तो स्वरूपतः षड्गुणैश्वर्यसंपन्न असतो. या संपूर्ण ऐश्वर्यवंत भगवंतानें जड व मलिन भूतांस आश्रय दिला म्हणून अथवा जड व मलिन वस्तूंची संगति केली म्हणून त्या भगवंताच्या ऐश्वर्यादि गुणांमध्यें एक रेसभरही कमीपणा येत नाहीं, असें ज्याला निश्चित ज्ञान असतें, सारांश, ऐश्वर्यवंत **हरिच** आहे, दुसरें कांहीं नाहीं असें अनुभवपूर्व श्रद्धेनें—श्रद्धायुक्त अनुभवानें–जो पाहतो, तो भागवतोत्तम होय, हा तात्पर्यार्थ आहे. आत्मा या शब्दाचें निर्वचन केलें असतां ' विस्तीर्णता व ज्ञातृत्व ' हे अर्थ स्पष्ट होतात. असल्या परमोत्तम भक्तीनेंच भक्त मोक्षाचा अधिकारी होतो. तो भागवतोत्तम होय. ' **यस्मिन्सर्वाणि भूतानि** ' हा ' ईशावास्योक्त ' मंत्र सहज आठवेलच ॥ ४५ ॥

---

**एकनाथ**— जैसी कीजे भगवद्भक्ती । जैसीच होय विषयविरक्ती ॥
तदनुसारें अनुभवस्थिती । ती भक्त पावती तेचि क्षणीं ॥
जेवीं कां भुकेलियापाशीं । ताट वाढिलें षड्रसीं ॥
तो पुष्टि तुष्टि क्षुधानाशासी । जेवीं ग्रासोग्रासीं स्वयेंचि पावे ॥
जितुका जितुका घेइजे ग्रास । तितुका तितुका क्षुधेचा नाश ॥
तितुकाचि पुष्टिविन्यास । सुखोल्हास तितुकाची ॥ ४२ ॥

परमेश्वरावर प्रेम, तद्भक्तांशीं मैत्री, बालिशांवर कृपा करणारा व शत्रूंची उपेक्षा करणारा जो भक्त तो मध्यम कोटीचा होय ॥ ४६ ॥ आणि पूजेच्या मूर्तींत मात्र हरि आहे असें समजून जो तिची श्रद्धेनें पूजा करतो; पण हरिभक्तांत व इतर लोकांत हरीचें वस्तव्य नाहीं, असें समजून जो त्यांच्यावर प्रेम करीत नाहीं, तो प्राकृत ( कनिष्ठ प्रतीचा ) भक्त समजावा ॥ ४७ ॥ हें विश्व म्हणजे परमेश्वरी माया आहे असें ज्ञान झाल्यामुळें त्याचीं इंद्रियें विषयांचें ग्रहण करीत असतांही त्याला त्या विषयसेवनापासून हर्षविषाद होत नाहीं. हाच खरा उत्तम भागवत होय ॥ ४८ ॥ देह, इंद्रियें, प्राण, मन व बुद्धि यांचे विशिष्ट धर्म जे जन्म-मृत्यु, क्षुधा-तृष्णा, भय, भोगेच्छा व कर्म, ते संसारांत प्रतिक्षणीं उत्पन्न होत असतांही ज्या हरिभक्ताच्या हरिस्मरणामुळें ते धर्म बाधक होत नाहींत, तो प्रधान ( उत्तम ) भागवत होय ॥ ४९ ॥ वासुदेव हेंच ज्याच्या निष्ठेचें निर्भय स्थान असल्यामुळें ज्या भक्ताच्या अंतःकरणांत वासनेचा व कर्माचा अंकुर फुटण्याचा संभवच नसतो, तो भागवतोत्तम होय ॥ ५० ॥ आपला जन्म, आपलें कर्म, आपला वर्ण, आपला आश्रम किंवा आपली जाति यांमुळें ज्याची देहाचे ठिकाणीं अहंबुद्धि ( देहच मी अशी बुद्धि ) उत्पन्नच होत नाहीं, तात्पर्य जो देहासक्त होत नाहीं तोच भक्त हरीला प्रिय होतो ॥ ५१ ॥ ही गृहादि संपत्ति माझी, ही दुसऱ्याची, हा देह माझा, तो दुसऱ्याचा, अशी भेदबुद्धि मावळून जो सर्वांशीं समत्वबुद्धीनें वागतो व जो सर्वदा शांत असतो, तो खरा भागवतोत्तम होय. ॥ ५२ ॥ त्रिभुवनांचें राज्य मिळत असलें तरी तिकडे लक्ष न जातां ज्याचें प्रभुस्मरण अखंड असतें आणि प्रत्यक्ष भोगलोलुप इंद्रादि ऐश्वर्यवंतांसही जें भगवत्पदकमल शोधण्याचे श्रम करावे लागतात, त्या भगवंताच्या चरणारविंदापासून जो एक क्षणार्धहि दूर होत नाहीं, तो पहिल्या प्रतीचा विष्णुभक्त होय ॥ ५३ ॥ रात्रीं शीतल व

**टीप**— येथें ‘ अजितात्मसुरादिभिः ’ या पदाचा अर्थ श्रीधरस्वामींनीं व श्रीनाथमहाराजांनीं एकाच पद्धतीनें केला आहे. **अजित** म्हणजे हरि असा अर्थ करून या उभयतांही आत्मज्ञ विद्वानांनीं संगति लावली आहे. अजित म्हणजे हरि, परमात्मा हा अर्थही शास्त्रोक्तच आहे; परंतु हरीच्या मात्र ठिकाणीं आत्मा ठेवणाऱ्या देवांस हरिपद शोधण्याचा प्रसंग कां यावा ? ते अजितात्मे हरिभक्त नसतात असेंही म्हणतां येत नाहीं आणि भक्तांवर हरि प्रसन्न होतो व दर्शन देतो, ही गोष्टही सर्वमान्य आहे. अर्थात् हरिभक्त देवांना हरिपदशोधनाचें कार्य कां करावें लागतें, याचा उलगडा होत नाहीं, म्हणून

**एकनाथ**—हृदयीं चिंतितां आत्माराम ॥ तद्रूप जाहला हृदयींचा काम
त्यासी सर्व कर्मीं पुरुषोत्तम । देवदेवोत्तम तुष्टोनि प्रगटे ॥

तेथें ज्याच्या वासना हृदयवासी । त्याही पडल्या हरिसुखासी ॥
एवं वासना जडल्या हरिरूपाशीं । हरि आश्रयो त्यासी दृढ जाहला ॥ ५० ॥

रम्य चंद्रप्रकाश असतांना सूर्याच्या प्रखर तापाचा संभव असतो काय? नाहीं. त्याप्रमाणें महापराक्रमी त्रिविक्रमाच्या चरणाग्रीं विलसत असणाऱ्या बोटांच्या देदीप्यमान नखचंद्रिकेनें त्या हरिभक्ताचे मनस्ताप नाहींसे केले असतात. मग ते ताप पुनः उद्भवणार काय? नाहीं, मुळींच नाहीं. ।। ५४ ।। एखादे वेळीं चुकून जरी हरिनाम तोंडीं आलें तरी जो हरि सकल पातक भस्म करतो, त्या हरीला जो प्रेमळ भक्त आपल्या एकनिष्ठ भक्तीनें आपल्या हृदयांत प्रेमशृंखलेनें बांधून ठेवतो म्हणून ज्याचे हृदयांतून हरि केव्हांही बाहेर जात नाहीं, तोच खरा भागवतप्रधान असें म्हणावें व म्हणतातही ।। ५५ ।।

---

'अजितात्मा' म्हणजे ज्यानें आपल्या अहंवृत्तीला जिंकलें नाहीं, ज्याची अहंवृत्ति हरीच्या आत्म्यांत समन्वित न झाल्यामुळे जो अजितात्माच राहिला आहे. सारांश, अजितात्मसुर याचा अर्थ अहंवृत्ति निरसित न केलेले देव असाच करावा ।। ५३ ।।

## दुसरा अध्याय समाप्त

# अध्याय ३ रा

राजा म्हणालाः– हे भगवंतांनो ! मोठमोठया शक्तिवंत विद्वानांसही मोह घालणारी जी परमेश्वर विष्णूची माया तिचें स्वरूप आम्हांस कळावें, अशी इच्छा आहे. कृपा करून तें स्वरूप आम्हांस सांगा ॥ १ ॥ महाराज ! संसाराच्या तापानें होरपळून निवालेला मी मर्त्य प्राणी आहें. त्या माझ्या त्रिविध तापांवर हरिकथारूपी अमृत हें रामबाण औषध आहे. हरिकथासंकीर्तन करणारें आपलें भाषण कितीहि ऐकलें, तरी माझी तृप्ति होत नाहीं, म्हणून आपलें अमृतरूपी भाषण चालू द्यावें अशी प्रार्थना आहे. ॥ २ ॥

अंतरिक्ष म्हणाले:—आजानुबाहु राजा ! स्वनिर्मित पृथ्वीप्रभृति जीं पंचमहाभूतें आहेत, त्यांच्या द्वारा जीं सर्व श्रेष्ठकनिष्ठ चराचर भूतें ( पदार्थ ) जन्मतात, त्या सर्वांचें आदिकारण जो परमेश्वर त्यानें आत्मस्वरूपीं जीवांच्या उपभोगासाठीं व आत्मकल्याणासाठीं हीं भूतें उत्पन्न केलीं आहेत ॥ ३ ॥ याप्रमाणें आपणच उत्पन्न केलेल्या पंचमहाभूतांच्या साहाय्यानें हीं सर्व भूतें उत्पन्न करून तो परमेश्वर त्या सर्व भूतांमध्यें मनोरूपानें व दशेंद्रियस्वरूपानें प्रवेश करिता झाला. सर्व भूतांच्या गुणांचा उपभोग जीवरूपानें घ्यावा, हा परमेश्वरी प्रवेशाचा हेतु आहे ॥ ४ ॥

पण अंतर्यामीं प्रभूनें प्रकट केलेल्या इंद्रियांच्या द्वारें तो जीव अनेक विषयांचा उपभोग घेतो आणि 'हें उत्पन्न झालेलें शरीरच मी आहें' असें मानून त्या शरिराचे ठिकाणीं आसक्त होतो ! ॥ ५ ॥

---

**टीपः**—देह उत्पन्न करून त्यांत प्रविष्ट झालेला प्रभु म्हणजेच जीव होय. या जीवाच्या अंतर्यामीं ( अंतर्भागीं किंवा आंत राहून ) नियमन करणारा जो शुद्ध व चिद्रूप आत्मा त्याच्या ज्ञानरूपी तेजानें प्रकाशित झालेलीं, विषयग्रहणाला समर्थ झालेलीं मन, बुद्धि, इंद्रियें विषय घेतात. म्हणजे दृश्य पदार्थांचें शब्द-स्पर्शविषयरूपादि गुण होत. जीवाच्या ज्ञानेंद्रियादि गुणांनीं बाह्य दृश्यांचे शब्दस्पर्शादि गुण मात्र ग्रहण करितां व उपभोगितां येतात. या विषयगुणांपासून सुखादि उत्पन्न होऊन तीं जीवाला कळूं लागतात, तेव्हां जीवाला वाटतें कीं देहाला होणारीं सुखदुःखें मला होतात. त्या अर्थीं मीच देह आहें ! असें विपरीत ज्ञान झालेला जीव देहादिकांवर अहं-ममता ठेवून त्यांत आसक्त होतो व संसार पावतो यांत काय आश्चर्य नाहीं ? सच्चिदानंदरूप आत्मा स्वरूप विसरतो आणि देहादि आगंतुकांस 'आपण व आपलीं' असें भलतेंच ज्ञान करून घेतो हें आश्चर्य नव्हे काय ? पण हेंहि आश्चर्य परमेश्वरी माया घडवून आणते, आणि मायेनें उत्पन्न केलेल्या मोहानें जीव देहादिकांवर आसक्त होतो. गीताभक्तांस "**गुणाः गुणेषु वर्तंते इति मत्वा न सज्जते**" या सूक्तीची आठवण होईल, यांत नवल काय ? ॥ ५ ॥

आपल्या श्रोत्रनेत्रादि व हस्तपादादि इंद्रियांचें साहाय्य घेऊन हा विषयासक्त जीव सकाम कर्मे करतो; अर्थात् त्या कर्माचें फल त्याला भोगावें लागतें आणि तो आपलें सुखस्वरूप सोडून 'सुखी दुःखी' प्राणी होऊन भवसागरांतच भ्रमण करीत राहतो ॥६॥ याप्रमाणें दुःखमूलक अनंत कर्मफलांचा उपभोग ह्या बिचाऱ्या दुर्दैवी जन्ममरणशील जीवाला प्रलयकालपर्यंत घ्यावा लागतो ॥ ७ ॥ शेवटीं पंचमहाभूतांचा नाश होण्याचा समय प्राप्त झाला म्हणजे द्रव्यगुणात्मक जे व्याकृत म्हणजे दृश्य पदार्थ असतात, ते अनादि व अनंत कालाच्या प्रभावामुळें अव्यक्त म्हणजे अदृश्य होऊं लागतात ॥ ८ ॥

---

**टीपः—** 'विषयभोग करणाऱ्या जीवाला भोगसमाप्तीनंतर मुक्ति व्हावी, असें असतां तो जीव संसार कसा पावतो ?' अशी कोणी शंका घेईल यासाठीं तिचें निरसन 'कर्माणि' या सहाव्या श्लोकांत केलें आहे. कर्मांच्या म्हणजे कर्मेंद्रियांच्या द्वारें सनिमित्तिक म्हणजे विषयवासनासहित कर्मे करणारा व पूर्वी केलेल्या अनेक कर्मांपासून उत्पन्न होणारें फल भोगणारा हा देहधारी जीव संसारचक्रांत सांपडून जन्ममरणरूपी फिरती करीत राहतो. तो मुक्त होणें शक्यच नाहीं. तेव्हां हा जीव दुःखांतच असतो. म्हणजे कर्म करणें हें दुःखात्मक आणि त्यापासून प्राप्त होणारें फळहि सुखेतर म्हणजे दुःखात्मकच ! ॥६॥

---

**टीपः—**पंचमहाभूतांचा नाश होण्याचें कारण आसन्न ( प्राप्त ) झालें म्हणजे स्थूल असणारें द्रव्य आणि सूक्ष्म असणारे गुण तात्पर्य स्थूलसूक्ष्मरूपी असणारें कार्य हें स्थूलसूक्ष्मरूपी व्यक्त कार्य अव्यक्ताकडे, कारणरूपाकडे नेण्यासाठीं सर्वकारण व अजरामर काल कार्याला आकर्षितो. हा काल सर्व कार्यरूपाला अव्यक्ताकडे ओढून नेतो ॥ ८ ॥

**एकनाथ—** म्हणे हे विषय कैसे गोड । माझ्या देहाचें पुरे कोड ॥
तंव इंद्रियांची खवळे वाड । विषय वाड भोगावया ॥
इंद्रियां विषयांचे आसक्ती । देहाभिमानें बाढे वृत्ति ॥
मावळोनि मुळींची स्फूर्ती । मोहममता स्थिती दृढ वाडे ॥
मग मी म्हणे देहातें । देहसंबंधी तें आप्तें ॥
विषयांचिये लोलुप्तें । उसंतु चित्तें असेना ॥
प्रकृति स्वभावें कर्म । जालें तें तें म्हणे म्यां केलें ॥
देह अहंतेचेनि आथिलें । काविरें चढलें अनिवार ॥
देह अहंता अतिउद्भट । तेथें मोहममता अतिदुर्घट ॥
तेणें जन्ममरणांची वाट । घडघडाट प्रवाहे ॥ ( ५ )

**एकनाथ—** एवं पावल्या प्रळयवेळू । खवळे अनादिनिधन काळू
तो महाभूतेंसीं भूगोळू । नाशार्थ प्रवळू प्रताप मांडी ॥ ( ८ )

पृथ्वीवर या प्रलयकालाच्या वेळीं अवर्षणाचीं शंभर वर्षें अवतार घेतील आणि त्या वेळीं म्हणजे पर्जन्याचा सर्वस्वीं अभाव होणार त्या वेळीं अत्यंत उष्णता प्रकट करणारा सूर्य आपल्या कढत किरणांनीं तिन्ही लोकांस ताप देईल ॥ ९ ॥ याच वेळीं संकर्षणाच्या म्हणजे पातळांतील शेषाच्या मुखांतून बाहेर पडणारा तापद अग्नि पृथ्वी-प्रमुख लोकांस जाळूं लागेल. येथील वायुहि अग्नीला साहाय्यक होईल आणि सर्वत्र या ऊर्ध्वमुख अग्नीच्या ज्वाळा भडकूं लागतील ॥ १० ॥ प्रलयकालीन सांवर्तक मेघ शंभर वर्षें पाण्याचा वर्षाव करतील. हत्तींच्या सोंडांसारख्या मुसळधारा या पर्जन्याच्या असतील. सर्व विश्व जलमय होईल. प्रत्यक्ष विराट्ही विरून जाईल ॥ ११ ॥ नंतर हा विरलेला विराट् आपल्या अव्यक्त म्हणजे कारणस्वरूपांत * शिरेल. हेंच हिरण्यगर्भ म्हणजे सूक्ष्म स्वरूप होय. इंधन असलेला अग्नि कारणस्वरूपांत शिरतो, तसा विराट् हिरण्यगर्भ-स्वरूपांत शिरेल ॥ १२ ॥

* आतां वायूनें जिचा गंधगुण हिरावून घेतला, ती पृथ्वी जलरूप होते आणि त्या जलांतील रस वायूनें हरण केला म्हणजे तें जल तेजोरूप होतें ॥ १३ ॥ या तेजाचें तेज तमानें नाहींसें केलें म्हणजे तें तेज वायुरूपी होतें. वायूचा गुण जो स्पर्श तो आकाशानें नष्ट केला म्हणजे वायु आकाशांत लीन होतो ॥ १४ ॥ आकाशाचा गुण जो शब्द तो काळानें नष्ट केला म्हणजे तें आकाश प्रथमतः तामसी अहंकारांत, मग राजसी अहंकारांत व शेवटीं सात्त्विक अहंकारांत लीन होतें तो गुणशून्य अहंकार महत् द्रव्यामध्यें व तें द्रव्य प्रकृतीमध्यें लीन होतें. हीच माया ! ॥ १५ ॥ राजा, उत्पत्ति, स्थिति, प्रलय करणारी ही भगवंताची त्रिगुणात्मक माया व तिची कर्तबगारी यांचें हें वर्णन झालें. आतां यापुढें तुला आणखी काय ऐकण्याची इच्छा आहे ? ॥ १६ ॥

---

* कोणत्याही प्रमाणाला गोचर नसणारें, प्रमाणानें व्यक्त ( स्पष्ट ) न होणारें जें सर्व प्रमाणातीत—**अव्यक्त** म्हणजे ब्रह्म असाही श्लोकांतील अव्यक्त शब्दाचा अर्थ करतां येतो. त्या ब्रह्मामध्यें ( अव्यक्तामध्यें ) प्रवेश होऊन वैराज पुरुषाला मोक्ष मिळतो, असा श्लोकाचा अभिप्राय आहे, असें समजावें. मात्र दुसरा अर्थ करतांना हरिभक्तीचें वैराजामध्यें वास्तव्य आहे आणि या दुसऱ्या अर्थाच्या प्रसंगीं ' मायाकार्य येथें असतें ' हें श्रुद नाहीं असें ध्यानांत ठेवावें ॥ १२ ॥

***टीप**—सांख्यप्रक्रियेप्रमाणें २५ तत्त्वें आहेत. १ पुरुष, १ प्रकृति; नंतर १ महत्तत्त्व, १ अहंकार आणि ५ तन्मात्रा; १ मन, ५ ज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रियें, ५ पंच-महाभूतें मिळून २५ होतात. पुरुषाशिवाय बाकी २४ तत्त्वें राहिलीं; त्यांत **प्रकृति** ही सर्वकारण आहे. पुढील **महत्तत्त्वादि सात हीं प्रकृति-विकृत्यात्मक** आहेत. म्हणजे

---

**एकनाथ**—यालागीं ज्यांसी ब्रह्मलोकपदप्राप्ती । येथेंही करिती भगवद्भक्ती ॥
त्यांसीच प्रळयाच्या अंतीं । परममुक्ति नृपवर्या ॥ ( १२ )

राजा म्हणाला, भगवंत हो ! ज्यांनीं आपलें मन वश करून घेतलें नाहीं, त्यांस न आवरणारी ही परमेश्वरी माया त्या जडबुद्धीच्या लोकांस सुखानें तरतां येईल असा कांहीं उपाय, हे महर्षे, आम्हांस कृपा करून सांगा ॥ १७ ॥

---

महत्तत्त्व मूळ प्रकृतीचें कार्य ( विकृति ) आणि अहंकाराची प्रकृति ( कारण ) होय. तसेंच ५ तन्मात्रा ( पृथ्वीत्यादि पंचमहाभूतांचीं घटक द्रव्यें ) Electrons ह्या अहंकाराच्या विकृति आणि पंचमहाभूतांच्या प्रकृति होत. याप्रमाणें, मूळप्रकृति आणि सात प्रकृति-विकृति मिळून ८ तत्त्वें झालीं. पुढील १६ सर्व विकृति म्हणजे कार्यें आहेत. त्यांत मन ( मन, बुद्धि, चित्त, अहंकार या चतुष्टयाचा गट ) व ५ कर्णादि ज्ञानेंद्रियें हीं सात्त्विक अहंकाराचीं कार्यें, प्राणांसह ५ कर्मेंद्रियें हीं राजस अहंकाराचीं कार्यें आणि ५ पृथ्वीत्यादि महाभूतें मिळून १६ विकृति होत. असो. सांख्यप्रक्रियेचा येथें विचार करण्याचें कारण नाहीं. तथापि, उपनिषत्प्रणीत अद्वैतदर्शनामध्यें सांख्यप्रक्रियेचा स्वीकार केल्याचा भास होतो, म्हणून मूळप्रकृतिपासूनच महत्तत्त्वादिकांची विसृष्टि–प्रक्रिया ( उत्क्रांति evolution ) सांगितली, आतां श्रीमद्भागवताच्या एकादशस्कंधांतील तिसऱ्या अध्यायांत प्रलयकालीं सर्व कार्यांचा ( विसृष्ट evolved पदार्थांचा ) कारणांत लय होतो, हें प्रकरणही अंशतः सांख्यक्रियेनुसारच आहे, हें समजून घेणें इष्ट आहे, श्रीमद्भागवत सांगतें—अनावृष्टि, सूर्यप्रताप, अतिवृष्टि यांमुळें सर्व सृष्ट्युपाधि विरून गेल्या म्हणजे विराट पुरुष वैराजरूप होऊन अव्यक्तांत लीन होतो. आणि सांवर्तक वायूच्या पराक्रमानें पृथ्वीत्यादि कार्यांचा लय कारणांत होतो, म्हणजे पृथ्वी ( कार्य ) जलरूप ( कारणरूप ) जल ( कार्य ) तेजोरूप ( कारणरूप ) याप्रमाणेंच तेज वायूंत, वायु आकाशांत, आकाश अहंकारांत ( याचप्रमाणें इंद्रियादि, स्वकार्यांसह अहंकारांत ) प्रविष्ट होतात. पुढें अहंकार महत्तत्त्वांत आणि हें तत्त्व प्रकृतींत ( मूळ कारणांत ) लीन होतें. प्रकृति मात्र कशाचें कार्य नाहीं, अशा व्याव-हारिकाची व्यवस्था लावणाऱ्या वेदांताचा ( Philosophy ) सिद्धांत आहे. ही प्रकृति म्हणजे अव्यक्त आणि व्यक्त अव्यक्तांत लीन होणें, कार्य कारणरूप होणें, याला प्रतिलोम-प्रक्रिया म्हणतात. कारणापासून कार्य होणें हा **अनुलोम** आणि कार्य कारणांत लीन होणें हा **प्रतिलोम** होय. अर्थात् प्रलय होणें म्हणजे सर्व दृश्य-अदृश्य ( अव्यक्त ) होणें होय. हें **अव्यक्त**हि ( Phenomenal ) व्यवहारात्मक आहे, ब्रह्म नव्हे. कारण हें अव्यक्त ( ही प्रकृति Homogeneous subtle matter ) **विकार्य** आहे. ब्रह्म विकार्य नाहीं म्हणजे तें **अक्षर** ( अविकार्य ) अव्यक्त आहे. विकार्य अव्यक्ताचा साक्षी हिरण्यगर्भ अथवा त्याच्याही पुढें **ईश्वर** आहे. हाच भक्तांचा परमेश्वर, हरि होय.

---

**एकनाथ**—माया दुस्तर शास्त्रप्रसिद्धी । तेथ बाळेभोळे स्थूळबुद्धी ॥
सुखें तरती कोणें विधी । तो सांग त्रिशुद्धी उपावो ॥ १७ ॥

प्रबुद्ध म्हणालाः—राजा, दुःखाचा नाश व्हावा व सुख प्राप्त व्हावें म्हणून संसारी लोक कर्म करतात; पण त्या कर्माचें फल मात्र सुखनाश आणि दुःखोत्पत्ति करणारें होतें नव्हे ? ॥ १८ ॥ नित्य दुःख देणारी, दुर्लभ आणि जीवाला मृत्यु आणणारी ही संपत्ति किंवा अनित्य असणारीं गृह, दारा, सुत, आप्त, पशु हीं प्राप्त झालीं तरी तीं सर्व अनित्यच असणार. म्हणून संपत्ति अथवा देहगेहादि यांपासून काय सुख होणार बरें ? ॥ १९ ॥

याप्रमाणें इहलोकचें सुख नश्वरच असतें. हाच प्रकार यज्ञादि कर्मांनीं प्राप्त झालेल्या स्वर्गलोकांत असतो. तेथेंही बरोबरीच्यांशीं स्पर्धा, श्रेष्ठ असणाऱ्या संबंधानें असूया-(मत्सर) आणि भीति या मनोविकारांचें वास्तव्य असतेंच. येथें मांडलिकाच्या अंतःकरणांत स्पर्धा, असूया, भीति असतात, तशाच तेथेंही असतात ॥ २० ॥ म्हणून आपलें परमकल्याण व्हावें अशी सोय जाणण्याची इच्छा करणाऱ्यानें वेदांतज्ञ साक्षात्कारी आणि शांतीचें निधान असणाऱ्या सद्गुरूला शरण जावें ॥ २१ ॥

तो सद्गुरु हाच आपला आत्मा व आपलें इष्ट दैवत असें एकनिष्ठेनें मानणाऱ्या शिष्यानें गुरुमुखानें भागवत धर्माचें श्रवण करून तें अंतःकरणपूर्वक अभ्यासून आचरावें. अशी सेवा मुमुक्षूनें भक्तिपूर्वक केली असतां आत्मस्वरूपाचा दाता श्रीहरि प्रसन्न होतो ॥ २२ ॥

भागवत धर्माचें अनुष्ठान करणाऱ्यानें विषयवैराग्य, संतसमागम आणि अनाथांवर दया, बरोबरीच्यांशीं मैत्री आणि श्रेष्ठ पुरुषांसंबंधीं पूज्यबुद्धि यांचा स्वीकार केला पाहिजे ॥ २३ ॥

शौच, तप, सहनशीलता, मितभाषण, स्वाध्याय, सरळपणा, ब्रह्मचर्य, अहिंसा, सुख-दुःखांत समबुध्दी ॥२४॥ सर्व ठिकाणीं आपण व ईश्वर ओतप्रोत भरलेलें पाहणें, एकांतसेवन, गेहादिकांविषयीं अनासक्ति, कौपीनधारण, मिळेल त्यांत संतोष ॥२५॥ भागवत शास्त्राचे ठिकाणीं श्रद्धा, दुसऱ्या शास्त्राविषयीं आदर, मन-वाणी-चिकीर्षा यांचें नियमन, सत्य, शम, दम यांचा स्वीकार ॥ २६ ॥ अघटित लीला करणाऱ्या श्रीहरीच्या लीलांचें श्रवण, कीर्तन व ध्यान, त्याचे अवतार, अवतारांतील कार्यें, त्यानें केलेल्या भक्तरक्षण-दुष्ट-विनाशन-धर्मस्थापना इत्यादिकांचें श्रवणादिक आणि हरिप्रीत्यर्थ मात्र कर्म करून तें त्याला अर्पण करणें म्हणजे इष्टापूर्तीचीं कर्में, तप, जप, सदाचार, आपल्याला आवडणारे गंधरसादि उपभोग, दारा, सुत, गृहें, प्राण, उपासना हीं देवदेवेश्वराला समर्पण करणें, हे गुण व हीं कर्में भक्तानें गुरु-आज्ञेनें आचरावीं ॥ २७ ॥ २८ ॥

---

**एकनाथ**—हरीशीं जाहले जे अनन्य शरण। ते हरीचे लडिवाळ पूर्ण॥
त्यांचे हरि करी प्रतिपाळण। जेवीं जननी जाण तानुलेया ॥ (२८)

याचप्रमाणें कृष्णभक्तांशीं मैत्री, स्थिरचराची *— विशेषतः मनुष्यें, साधु, महासंत यांची—सेवा करावी ।। २९ ।। अंतःकरण शुद्ध करणाऱ्या भगवद्यशाविषयीं परस्परांमध्यें भक्तिपूर्वक संभाषण, अन्योन्यप्रेम, संतोष आणि परस्पर दुःखांची निवृत्ति हे गुणही स्वीकारावे ।। ३० ।।

अशा प्रकारें परस्परांनीं परस्परांस पापविनाशक हरीचें स्मरण देणें, आपण स्मरण करणें, या साधनभक्तीनें हरिविषयक सप्रेम भक्ती उत्पन्न होते. शरीर भक्तीभावानें रोमांचित होतें ।। ३१ ।। मग अच्युताची भेट केव्हां होईल या चिंतेनें कोणी रडतात. हरिस्मरण झालें म्हणून कोणी हंसतात, आनंदतात, अलौकिक लीलांचें गायन करतात, कोणी नाचतात कोणी गातात, कोणी हरिलीलांचें अनुकरण करतात आणि कोणी अत्यंत समाधानवृत्तीनें मौन स्वीकारतात ।। ३२ ।।

राजा ! एवं भागवतधर्माचा अभ्यास केला असतां पराभक्तीचा उदय होतो आणि तिची परमावधि झाली म्हणजे नारायणनिष्ठ भक्ताला नारायणाची माया नाहींशी करतां येते ।। ३३ ।।

---

* **टीप**—उभय ठिकाणीं म्हणजे स्थावर – जंगम वस्तूंचे ठिकाणीं जी परिचर्या ती विशेषेंकरून ही सेवावृत्ति नरासंबंधें, त्यांतही धर्मशील साधूंचे ठिकाणी आणि या साधूंतही जे भागवत म्हणजे एकनिष्ठ भगवद्भक्त असतात त्यांचे ठिकाणी असावी. तात्पर्य, भक्तानें चराचरांची सेवा करावी. विशेषतः मनुष्यांची, त्यांतही वर्णाश्रमधर्म पाळणाऱ्यांची आणि या धर्मशीलांतील एकनिष्ठ भागवतांची सेवा तर विशेषतः एकनिष्ठेनें करावी ।। २९ ।।

**टीप**— निष्ठा म्हणजे स्वरूप. श्लोकाचा भावार्थ असा आहे कीं—वेदांतामध्यें जें अद्वितीय ब्रह्म म्हणून सांगितलें आहे, त्यालाच नारायण म्हणतात; भगवान् या नांवानें आळवितात; परमात्मा असेंही नांव सांगतात. म्हटलें आहे:— " तत्त्ववेत्ते जें सांगत असतात, तें तूंच आहेस. तुझें स्वरूप म्हणजे अद्वय ज्ञान हेंच होय. ज्ञानाव्यतिरिक्त कांहीं नाही, असें रहस्यज्ञ तत्त्ववेत्ते म्हणतात, तें तुझेंच स्वरूप आहे. त्या ज्ञानालाच— ज्ञानस्वरूपालाच 'ब्रह्म' 'परमात्मा' 'भगवान्' अशीं नांवें देऊन त्या नांवांनीं ओळखतात. त्याचप्रमाणें " **नारायणे भगवति तादिदं विश्वमाहितम्** ।

---

**एकनाथ**—एवं दारा गेह संपदा । आत्मार्पणें शुद्ध श्रद्धा ।।
भजले सर्वकाळीं सर्वदा । ते भक्त गोविंदा पढियंते।।
जो सर्वभूतीं हृदयस्थू । परमात्मा श्रीकृष्णनाथू ।।
त्याचे ठायीं जो भक्तू । साधावया निजस्वार्थू सर्वस्वें भजे ।। २९ ।।

**एकनाथ** — हरिनामभजनकल्लोळें । माया जीवित्व घेऊन पळे ।।
भक्त तरती बाळेभोळे । हरिभजनबळें महामाया ।। ३३ ।।

राजा म्हणालाः – अहो ब्रह्मज्ञ मुनि हो ! परमात्मा जें ब्रह्म व ज्याचें नांव नारायण आहे, त्याचें स्वरूप आम्हांस सांगावें. तें सांगण्याला आपणासारख्या ब्रह्मवेत्त्यांस मात्र अधिकार असतो ॥ ३४ ॥

पिप्पलायन म्हणाले—नरेंद्रा ! जो या ब्रह्मांडांची उत्पत्ति, स्थिति व संहार यांचा कारक असून जो स्वतः कारकशून्य आहे, जो जागृति, स्वप्न आणि निद्रा यांमध्यें अनुस्यूत असून समाधीमध्येंही साक्षात् असतो, ज्याच्या मात्र आधारानें, देह, इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि, आदि जिवंत राहून स्वव्यापार करतात, तोच नारायण नामक परमेश्वर होय, तेंच परब्रह्म होय असें जाण ॥ ३५ ॥

राजा ! या परब्रह्मस्वरूपापर्यंत मनाची, वाणीची, नेत्राची, बुद्धीची, प्राणांची किंवा इंद्रियांची, तात्पर्य कोणत्याही ज्ञानकर्मेंद्रियांची मजल जात नाहीं. अग्नीच्या ठिणग्या अग्नीला प्रकाशित वा जाळीत नाहींत. त्याप्रमाणें हीं जीवाचीं ज्ञानकर्मेंद्रियें परमात्मस्वरूपावर प्रकाश पाडीत नाहींत, किंवा त्यांत बिघाडही करूं शकत नाहींत. मात्र शब्द (श्रुतिवाक्य) आत्मस्वरूप प्रमाणतः सांगूं शकतो; परंतु तें कसें ? साक्षात् नाहीं, अप्रत्यक्ष रीतीनें. 'आत्मा असा असा आहे' असें श्रुतीलाहि सांगता येत नाहीं; तर 'आत्मा अमुक अमुक प्रकारचा नाहीं' इतकेंच काय तें श्रुतीला सांगतां येतें आणि या 'तसें नाहीं, नाहीं' म्हणणाऱ्या निषेधाची अवधि (सीमा) म्हणजेच आत्मस्वरूपाची सिद्धी होय ॥ ३६ ॥

---

**गृहीतमायोरुगुणः सर्गादावगुणः स्वतः** " " त्या भगवान् नारायणस्वरूपी परमात्म्यामध्येंच हें विश्व स्थापित झालें आहे — किंवा भक्तांनीं सगुण ब्रह्मविद्येनें स्थापित केलें आहे. कारण तो गृहीतमाय म्हणजे ग्रहण केली आहे, स्वाधीन करून घेतली आहे स्वतः माया ज्यानें असा व ज्याचे स्वतांचे गुण अनंत आहेत असा आहे " इत्यादि शास्त्रवचनादिमध्यें सांगितलें आहे. त्या त्या वचनांच्याद्वारानें जो एक निर्विशेष म्हणजे निर्गुणविशेष नसणारी —वस्तु आहे. तीच या 'नारायणादि' शब्दांनीं वाच्यार्थ आहे किंवा कांहीं विशेष अंश आहे —कांहीं विशेष गुण त्या वस्तूचे आहेत, हें नीट समजून सांगावें, या अर्थी राजा जनकाची पृच्छा आहे. हा श्लोकाचा, राजप्रश्नाचा भावार्थ आहे ॥ ३४ ॥

**टीप**—तत्त्वज्ञानामध्यें—आत्मसंबंधानें शब्द म्हणजे श्रुती प्रमाण आहे, हें खरें; आत्मस्वरूपाची चर्चा चालली असतां श्रुति बलवत्तम प्रमाण होय, हें कोणालाही असंमत नाहीं तथापि तसें असूनही श्रुति " आत्मा 'असा, असा आहे, " असें साक्षात् स्पष्ट शब्दांनीं न सांगतां व्यंजनावृत्तीनें, ध्वनीनें किंवा अर्थापत्तीच्या वाटेनें सांगत असते. 'पीनः देवदत्तः दिवा न भुंक्ते' —" लठ्ठ धष्टपुष्ट देवदत्त नामक पुरुष दिवसा जेवत नाहीं " असें म्हणणाऱ्याचा भाव अर्थानें असें सुचविण्याचा असतो कीं तो रात्रीं जेवत असला पाहिजे. कारण खाल्ल्या-प्याल्याशिवाय माणूस लठ्ठ असावयाचाच नाहीं; परंतु 'रात्रीं जेवतो' असें स्पष्ट शब्दांनीं न

राजा ! स्थूलाच्या व सूक्ष्माच्या पलीकडे असून त्या सर्वांचें कराण व प्रकाशक असणारें जें महाशक्तिवंत परब्रह्म तत्त्व तें अनेक प्रकारें प्रगट होतें. प्रथमतः एकच असून तें त्रिगुणात्मक मायारूप होतें; पुढें तेंच क्रियात्मक सूत्रात्मा होतें; ज्ञानशक्तीनें तें महत्तत्त्व होतें व तेंच जीवाचा अहंकार होतें ! आणि यामुळेंच तें सूर्यादि देवता, दर्शनादि क्रिया, रूपादि विषय व सुखादि संवेदना या या स्वरूपांनीं प्रगट होतें ॥ ३७ ॥

शरिराची वृद्धि अथवा क्षय होत असतां जीवनशक्ति जशी निर्विकार राहते, त्याप्रमाणें बाल्य-तारुण्यादि अवस्थांस सत्ता देऊन त्यांचा द्रष्टा असणारा आत्मा जन्मत नाहीं, वाढत नाहीं किंवा मरत नाहीं. तो सर्वदा सर्वत्र एकरूप, अक्षर असून ज्ञानरूप मात्र असतो. विशेष ज्ञान इंद्रियांचें; पण आत्मा केवळ ज्ञानरूप आहे ॥ ३८ ॥

---

सांगतां 'तो लठ्ठभारती दिवसा जेवत नाहीं' असें सांगणें हीच अर्थापत्ति होय. त्याप्रमाणें श्रुतिहि अर्थापत्तीचा अवलंब करून सांगत असते ॥ ३६ ॥

**टीप**—आदौ म्हणजे आदिकालीं अथवा विचाराच्या आरंभीं एकच अद्वितीय ब्रह्म होतें व असतें. त्यालाच पुढें सत्त्व-रज-तम या तीन गुणांनीं लक्षित असणारे त्रिगुणात्मक **प्रधान** म्हणतात. या प्रधानालाच गुणवैषम्यानें क्रियाशक्ति—उत्पत्तिस्थिति प्रभृति करण्याची शक्ति प्राप्त झाली म्हणजे 'सूत्र'—हिरण्यगर्भ संज्ञा प्राप्त होते. रजोगुण वाढला म्हणजे सूत्र आणि सत्त्वगुणच वाढला तर '**महान्**' असें त्या प्रधानाला किंवा ब्रह्माला म्हणतात. नंतर ब्रह्माला जीव ही अविद्येची उपाधि प्राप्त झाली म्हणजे 'अहं' म्हणतात किंवा **अहंकार** म्हणतात. अनेक नामें अनेक गुणांवरून प्राप्त होतात असें सांगितलें आतां बहुभवन म्हणजे बहुप्रकाशन स्पष्ट करतात. ज्ञानक्रियार्थफलरूपतया हे श्लोकांतील पद घेऊन त्याचें व्याख्यान पाहा—**ज्ञान** शब्दानें देवता म्हणजे सूर्यचंद्रादि देवता इंद्रियांवर सत्ता ठेवून त्यांस ज्ञानप्रवण किंवा क्रियाप्रवण करणाऱ्या देवता—अभिप्रेत आहेत. **क्रिया** शब्दानें सर्व ज्ञानकर्मेंद्रियें, **अर्थ** शब्दानें त्या त्या इंद्रियांचे विषय आणि फल शब्दानें प्रकाशरूपी ज्ञान अथवा भावनारूपी सुखदुःखादि अभिप्रेत आहे असें समजावें असो. या देवता, इंद्रियें, अर्थ व फल या विविध रूपांनीं एकच ब्रह्म अवभासित होतें. एवंच, हें सर्व ब्रह्म असून सर्वत्र स्वयंप्रकाशी ब्रह्म आहे, हें ठरलें. म्हणून अनंत रूपें घेणाऱ्या स्वयंभु प्रकाशवंत ब्रह्माची सिद्धि करण्याला कोणत्याही प्रत्यक्ष अनुमानादि प्रमाणांची अपेक्षा नाहीं हें ठरलें. 'मी आहें' असें म्हणणाऱ्याला 'मी आहें कशावरून ?' असा प्रश्नच उद्भवत नाहीं. प्रश्नांतच 'मी' चा उल्लेख होतो. येथें प्रमाणाची अपेक्षा नसते. तसाच ब्रह्मप्रकार होय. शिवाय कोणत्याहि प्रमाणाची येथें साक्षात् मात्रा नाहीं, हें सांगितलेंच आहे ॥ ३७ ॥

---

**एकनाथ**—मुळीं मुख्य ब्रह्म 'ओंकार'। तें एकचि झालें त्रिप्रकार ॥
अकार उकार मकार। सत्त्वादि विकार गुणत्रयात्मक ॥ ३७ ॥

जरायुज, उद्भिज्ज, अंडज आणि स्वेदज भूतांच्या ठिकाणीं त्याचें वास्तव्य असतेंच असतें. तसेंच निद्रासमयीं सर्व इंद्रियें अहंकारलीन झालीं तरी त्या निद्रास्थितीचा साक्षी जो कूटस्थ त्याचें स्मरण प्रत्येकाला जागृतीनें होतें. ' मी सुखरूप होतों ' असें प्रत्येक जण सांगतो नव्हे ? यावरूनही निद्रासमयीं आत्म्याची अस्तित्व-सिद्धि होते ॥ ३९ ॥

निर्मळ दृष्टीच्या पुरुषाला ज्याप्रमाणें सूर्याचा प्रकाश स्पष्ट दिसतो; पण कोणाला हरिचरणाचा समागम व्हावा अशी उत्कट इच्छा झाल्यामुळें पराभक्ति उत्पन्न होते व त्या भक्तीमुळे गुणकर्मांनीं उत्पन्न केलेले मलविक्षेप नष्ट झाल्यानंतर त्या भक्ताच्या शुद्ध चित्तांत आत्मस्वरूपाचा साक्षात् उदय होतो; म्हणजे मलविहीन चित्तांत ब्रह्मतत्त्व प्रगटतें ॥४०॥*

---

**टीप**—तो आत्मा म्हणजे ब्रह्म. त्या आत्म्याला जन्मभावच असल्यामुळें तो कधीं जन्मला [ जन्मत ] नाहीं. जन्मानंतर लागलीच येणारीं असणेंपणाप्रभृति लक्षणें आहेत ज्यांचीं, ते विकारहि त्याला नसतात. तो वयानें किंवा इतर कारणांनीं वाढत नाहीं. कारण आत्म्याच्या ठिकाणीं वृद्धीचा अभावच असतो. नंतर देहाला विपरिणाम म्हणजे उलट परिणामाचा विकार होतो, तो आत्म्याला होत नाहीं हें ओघप्राप्तच झालें.कारण बाल्यावस्था-तारुण्यावस्थाप्रभृति अवस्थांतरें प्राप्त होणाऱ्या देहाला जन्ममरणादि विकार होतात. पण तीं अवस्थांतरें व त्यांचे काल पाहणारा द्रष्टा आत्मा एकरसच असतो. अर्थात् अवस्थांतरें प्राप्त करून घेणारा व कोणत्या तरी अवस्थेंत राहणारा जो देह—व सर्व दृश्य—त्या देहादिकांच्या द्रष्ट्याला देहादिकांची अवस्था प्राप्त होणें शक्यच नाहीं. द्रष्टा हा दृश्य होणें शक्यच नाहीं. द्रष्टा म्हणजे ज्ञाता ( subject) आणि दृश्य म्हणजे ज्ञेय ( object ) होत. तेव्हां नित्य द्रष्टा मात्र असणारा आत्मा केव्हांही दृश्य होण्याचा संभवच नाहीं. म्हणून त्याला अवस्थांतरें नाहींत. सर्व ठिकाणीं व सर्वदा—सर्व काळीं—अनपायि म्हणजे अविनाशी व अनुवर्तमान असणारें हें ज्ञान म्हणजे आत्मा आहे. आतां ' मला निळें—नीलरूपी ज्ञान या वेळीं येथें होत आहे, निळें आतांच दिसूं लागलें, निळें ज्ञान जन्मलें, पिंवळें नष्ट झालें याप्रमाणें ज्ञानालाही जन्ममरण असतें, असा रोज अनुभव येत असल्यामुळें ज्ञान म्हणजे आत्मा हा **अनपायी** नाहीं म्हणजे त्याला उत्पत्ति–लय नाहीं असें नाहीं हें ठरलें; हा पक्ष शेवटच्या श्लोकभागांत निरस्त केला आहे. मूळ ज्ञान ' सत् ' असतां इंद्रियादि उपाधींच्या बलानें निरनिराळ्या रूपांत **कल्पित** होतें. निळें, पीत वगैरे केवळ ज्ञानरूप नसतांनाही इंद्रियांच्या उपाधिदोषांमुळें निळें, पिंवळें अशा रूपांच्या तेथें तेथें वृत्ति उत्पन्न होतात व जातात. इंद्रिय-मनादि नसतींच तर रूपरसादि विविध गुण प्रत्ययालाच येते ना. असो येथें ज्ञानाच्या इंद्रियजन्य वृत्तींचें रूपांतर होतें; ज्ञानाचें होत नाहीं. मातीच्या घटाचा परळ केला किंवा पणती केली म्हणून घटरूपी मातीच्या **आकाराला** परळाचा आकार आला, मातीला नाहीं. याप्रमाणें इंद्रियजन्य वृत्तीचें ज्ञान म्हणजे विशेष ज्ञान उत्पन्न व नष्ट होतें; मूळ ज्ञान-स्वरूपाला विकार होणें शक्य नाहीं. जसें इंद्रियादिकांचें बल वाढतें,कमी होतें; पण प्राणस्वरूप जसेंच्या तसेंच निर्विकार असतें, तसाच हा प्रकार समजावा ॥ ३८ ॥

राजा म्हणाला— ज्या कर्मयोगानें संस्कार केले तरच कर्मांचा नाश होऊन नैष्कर्म्य प्राप्त होतें, तो कर्मयोग मला सांगावा ॥ ४१ ॥ वडिलांसंनिध बसलों असतां मीं हाच प्रश्न ब्रह्मपुत्रांस विचारला होता; परंतु त्यांनीं मला उत्तरच दिलें नाहीं. असें कां झालें, तेंही मला समजून द्यावें ॥ ४२ ॥

आविर्होत्र म्हणाले:—विहित, निषिद्ध आणि विकर्म ( विहित न करणें ) हें कर्मांचें वर्गीकरण श्रुतीनें केलें आहे. कर्मांचें वर्गीकरण करणें हा मनुष्यांचा भाग नव्हे. वेदानें तरी हें कार्य केलें तें केवळ ते वेद म्हणजे ईश्वरात्मकच होत म्हणून होय. मोठमोठ्या विद्वान् देवांसही हें कर्मकर्मांचें कोडें सुटत नाहीं. अर्थात् जें पंडितांना अगम्य तें तुला बाळपणीं समजलेंच नसतें म्हणून ब्रह्मपुत्र त्या वेळीं स्तब्ध राहिले ॥ ४३ ॥ वेद परोक्षवादी आहे. मुलांस ' औषध घेतलें तर खाऊ मिळेल, शिकलें तर बक्षीस मिळेल ' असें सांगतात. ' बरा होशील ' 'पंडित होशील ' असें सांगत नाहींत, हा परोक्षवाद होय. कर्मचक्रांतून सुटण्या-साठीं वेद कर्म करावयास लावतो; परंतु सांगतो मात्र कीं कर्म केल्यास सुख मिळेल ! ' सुखाचें आमिष हा परोक्षवाद होय ॥ ४४ ॥

आपण स्वतः अज्ञ व इंद्रियवश असणारा जो नर वेदोक्त कर्म करीत नाहीं, निषिद्धाचरण करतो, तो जन्ममृत्यूच्या चक्रांत अनंत वर्षें भ्रमण करीत राहतो ॥ ४५ ॥

* **टीपः**— धनेच्छाप्रभृति सर्व इच्छांचा त्याग करून केवळ पद्मनाभाच्या चर-णाची मात्र इच्छा राहिली आहे ज्या भक्तींत, त्या दृढभक्तीनें जीवानें आपल्या अंतःकर-णाचे मल धुऊन काढावे. वासना व अहंकार हे दोन राक्षस मनोमंदिरांतून हाकून लावले म्हणजे हरिभक्तीनें अंतःकरणशुद्धि होते. निर्मळ आरशाप्रमाणें तें स्वच्छ होतें. याप्रमाणें चेतस् म्हणजे अंतःकरण शुद्ध झालें असतां अव्यवधानानें म्हणजे आत्मस्वरूप आणि आत्मा यांत कोणताही पडदा न राहतां, तात्पर्य साक्षात् आत्मतत्त्वाची प्राप्ति स्वच्छ झालेल्या निरूपाधिक आत्म्याला होते. डोळे निर्मळ असतील तरच पूर्वसिद्ध सूर्यप्रकाश प्रत्यक्ष उपलब्ध होतो. आत्मा नित्यच सिद्ध आहे. त्याला पाहूं जाणारें—त्याचें स्वरूप समजून घेणारें—चित्त जोंपर्यंत वासना व अभिमान या द्वयीनें मळीन केलेलें असेल, तोंपर्यंत अंतर्बाह्य सर्वत्र पसरलेला नित्य आत्मा त्या मलीन चित्ताला दिसत नाहीं; पण ईश-भक्तीनें चित्तमल नष्ट झाले म्हणजे उन्हांत ठेवलेल्या स्वच्छ आरशाप्रमाणें तें चित्त आत्म-प्रकाशमय होतें; तें चित् म्हणजे आत्मरूप होतें. तात्पर्य, ज्ञाता व ज्ञेय यांमध्यें कसलाही इंद्रियादिकांचा पडदा असत नाहीं ॥ ४० ॥

**टीपः**—इंद्रियांवर जय मिळविला नाहीं, इंद्रियवश आहे म्हणून जो अज्ञ स्वतः वेदोक्त कर्म आचरणार नाहीं, कर्तव्याचें अनाचरण हें ज्याचें लक्षण, त्या पुरुषाच्या त्या अधर्मामुळें मृत्यूनंतर मृत्यूच त्याला प्राप्त होतो. याबद्दल श्रुति— ' **मृत्वा पुनः मृत्युं आपद्यंते आद्यमानाः स्वकर्मभिः** ' **इति** " आपल्या विकर्मांनीं छळले गेलेले म्हणजे

आणि वेदविहित कर्मे करून ते ईश्वरार्पण करितो व स्वतः जो अनासक्त असतो, त्याला नैष्कर्म्याची सिद्धि प्राप्त होते. वेदोक्त कर्मे केलें तर स्वर्गादि मिळतात ' इत्यादि श्रुतिवाक्यें केवळ रोचक व कर्मप्रेरक मात्र होत ॥ ४६ ॥

आतां ज्यास लवकर अंतःकरणांतील अहंकारग्रंथि तोडावयाची आहे, त्यांनीं परमेश्वराची तंत्रविधिपूर्वक उपासना करावी. वेदमंत्र व आगमोक्त तंत्र या मंत्रतंत्रांचा विनियोग केशवपूजेंत करावा ॥ ४७ ॥ आचार्यांनीं अनुग्रहपूर्वक आज्ञापिल्यावर व पूजाविधीचा मार्ग दाखविल्यावर शिष्यानें आपल्यास आवडत असणाऱ्या मूर्तीच्या रूपानें परमेश्वराची पूजा करावी ॥ ४८ ॥

शुचिर्भूत होऊन त्यानें प्राणायामपूर्वक देवमूर्तिसन्मुख बसावें. शुद्धीसाठीं देह प्रोक्षून शास्त्रोक्त न्यास करावे आणि मग हरिपूजेस आरंभ करावा ॥ ४९ ॥ गंधाक्षत-फल-पुष्पादि जीं उपचारद्रव्यें यथाकाल मिळालीं असतील तीं व भूमि, आसन, स्वदेह आणि पुजामूर्ति हीं निर्मळ करून मग हरिमूर्तीची व स्वहृदयांतील हरीची यथासांग पूजा करावी ॥ ५० ॥ पाद्य, अर्घ्य इत्यादि पूजापात्रें सन्निध ठेवून निर्विकार होत्साता न्यास केलेल्या पूजकानें मूलमंत्रांचा उच्चार करून पूजा करावी ॥ ५१ ॥

हृदयादि अंग व सुदर्शनादि उपांगें आणि गरुडादि पार्षद यांच्या सह हरिपूजन स्वशाखेंतील मंत्रांनीं करावें. म्हणजे पाद्य, अर्घ्य, आचमनादि व स्नान, वस्त्रें, भूषणादि उपचार स्वशाखा मंत्रांनीं करावे ॥ ५२ ॥ गंध, फुलें, अक्षता, माळा, धूप, दीप, नैवेद्य इत्यादि उपचार समर्पून षोडशोपचार पूजा विधियुक्त असावी. आरती, स्तोत्रें म्हणून हरीला साष्टांग नमन करावें ॥ ५३ ॥

---

दुःखांत सांपडलेले मरणानंतर मृत्यूलाच प्राप्त होतात. मरणानंतर त्यांना मोक्ष मिळत नाहीं, तर मृत्यु ( जन्ममरण ) मिळतो. असा या श्रुतीचा अर्थ आहे ॥ ४५ ॥

---

**एकनाथ**—विध्युक्त करितां संध्यास्नान । तेथचि आहे ब्रह्मज्ञान ॥
आचमनी होय हरिरूप आपण । हें नेणोनि अज्ञान आगमीं भरती ॥
केशवादि नामीं जाण । अंगप्रत्यंगीं न्यासितां पूर्ण ॥
तेव्हां हरिरूप होय आपण । हें नेणोनि अज्ञान आगमी भरती ॥ ४९ ॥

**एकनाथ**—द्रव्यशुद्धि मुख्यशोधन । भूमिशुद्धि संमार्जन ॥
आत्मशुद्धि सावधान । काढिल्या अनुलेपन मूर्तिशुद्धि ॥
पूजासंभार शुद्ध करून । समस्त शंखतोयें प्रोक्षून ।
निजासनीं सावधान । एकाग्र जाण बैसावें ॥ ५० ॥
सकळ पूजासंभार । निकट ठेवूनि उपचार ॥
मग मूर्तीसी न्यासप्रकार । उक्तशास्त्र करावे ॥

हरीची मूर्ति पूजित असतां आपण हरिमय आहोंत असें अखंड ध्यान असावें; पूजा झाल्यानंतर निर्माल्य मस्तकीं धारण करून देवाला स्वहृदयांत व मूर्तीला आदरपूर्वक डब्यांत ठेवावें. हा पूजाविधि झाला ॥ ५४ ॥ अग्नि, सूर्य, नदी इत्यादिक व अतिथि व स्वहृदय यांमध्यें नित्य असणाऱ्या हरीचें जो वर सांगितल्यप्रमाणें यजन करतो, तो लवकरच मुक्त होतो ॥ ५५ ॥

## तिसरा अध्याय समाप्त

---

जैसोंचे न्यास आपणांस । तैसिचि करावे मूर्तीस ॥
हा आगमोक्त गुरुसौरस । मूळमंत्रें न्यास मूर्तीसी ॥ ५१ ॥

**एकनाथ—**द्वैतभावें भजनविधी । ते जाणावी स्थूल बुद्धी ॥
भजनाची भजनसिद्धी । जाण त्रिशुद्धी तन्मय होणें ॥
मूर्तिध्यानें तन्मय स्थिती । ऐक्यत्वें राहे निश्चळ वृत्ती ॥
याचि नांव मुख्य भक्ती । उठलिया पुढती नमावें हरी ॥ ५४ ॥
हे पूजा नव्हे एकदेशी । बहुत स्थानें ये पूजेसी ॥
त्यांत शीघ्रतर जें प्राप्तीसी । तें मी तुजपाशीं सांगेन राया ॥
अग्नीच्या ठायीं होय दीप्ती । पूजा कीजे कमळापती ॥
अवघ्यापरीस शीघ्रप्राप्ती । पूजावा अतिथी भगवद्भावें ॥
आलिया वैश्वदेवाचे अंतीं । तो भलता हो भलते याती ॥
त्यासी जे भगवद्भावें पूजिती । त्यांचे घरा पूर्ण प्राप्ति वोरसोनि ये ॥ ५५ ॥

# अध्याय ४ था

राजा विचारतोः—स्वेच्छामात्रेंकरून जे अवतार श्रीहरि घेतो, त्या अवतारांच्या द्वारें जीं जीं कर्में त्या परमेश्वरानें केलीं, जीं करतो व जीं तो करील तीं सर्व भूत-भविष्य-वर्तमान हरिकर्में कृपा करून आम्हांस सांगावीं ॥ १ ॥

द्रुमिल म्हणाले–राजा ! अनंत जो श्रीभगवान् त्याचीं अगण्य कर्में सांगण्याचे साहसाला प्रवृत्त होण्याची जो इच्छा करतो तो महामूर्ख असला पाहिजे. या पृथ्वीवर ( विश्वांत ) रजःकण किती आहेत यांची संख्या कांहीं तरी सहस्र वर्षांनीं करतां येईल कदाचित्; पण सर्व शक्तींचें माहेरघर जो तेजस्वी परमात्मा त्याचे सर्व गुण व सर्व कर्में केव्हांही कोणासही सांगतां यावयाचीं नाहींत ॥ २ ॥

राजा ! आपणच निर्मिलेल्या पंचभूतांच्या साहाय्यानें ब्रह्मांडरूपी नगर जेव्हां हरीनें तयार केलें, तेव्हां त्या पुरामध्यें श्रीहरि स्वतःच्या एका अंशानें प्रवेश करता झाला. त्या नारायण आदिदेवाच्या अंशाला पुरुष असें नांव प्राप्त झालें ॥ ३ ॥

ज्या परमेश्वराच्या शरिरामध्येंच व शरीरद्वारा त्रिभुवनांची सुंदर मांडणी झाली, ज्याच्या ज्ञानेंद्रियांनीं व कर्मेंद्रियांनींच सर्व त्रैलोक्यांतील देहधाऱ्यांस ज्ञान-कर्मेंद्रियें देऊन तीं स्वव्यापारवंत केलीं, ज्याचें स्वयंभू ज्ञानस्वरूप सर्वांच्या ज्ञानाचें कारक होतें आणि ज्या ब्रह्मांडनायकाचीच प्राणशक्ति जीवांस शारीरिक बल, इंद्रियांची तेजस्विता आणि कर्मशक्ति प्राप्त करून देते आणि जो सत्त्वादि त्रिगुणांनी या ब्रह्मांडाचा कर्ता, पालक व संहारक होतो, तो हा आदिदेव होय असें जाण * ॥ ४ ॥

विश्वोत्पत्तीकरितां प्रथम त्या आदिदेवाच्या रजोगुणानें ब्रह्मदेव उत्पन्न झाला व त्यानें हें ब्रह्मांड निर्मिलें. त्याच्या सत्त्वगुणानें विष्णु झाला. विष्णूकडे विश्वसंरक्षणाचें, कर्म-फलें देण्याचें आणि ब्राह्मणादि द्विजांच्या वेदविहित कर्माला आश्रय देऊन तत्पालन करण्याचें कार्य आहे. आदिदेवाच्या तमोगुणानें रुद्र झाला. ह्याकडे विश्वसंहाराचें काम आहे. याप्रमाणें तो आदिदेव या ब्रह्मांडाच्या व तत्रस्थ जीवांच्या उत्पत्ति–स्थिति–संहाराचा मुख्य कारक आहे × ॥ ५ ॥

* परमेश्वर हा जगदात्मा The Soul of Souls नेत्रादिकांच्या व हस्तादिकांच्या नेत्रादि आणि हस्तादि The eye and the eyes and the Hand and foot of Hands & feet &c, तो सर्वज्ञ The intellect of intellects तो प्राणांचा प्राण, The life of lives आणि विश्वकर्ता, विश्वभर्ता आणि विश्वहर्ता The creator, the upholder and the Destroyer of all the worlds सारांश हा पुरुषावतार सर्व चालक आहे.

दक्ष प्रजापतीची कन्या मूर्ति या नांवाची होती व तिचें व धर्माचें लग्न झालें. तिच्या उदरीं ' नारायण व नर ' या नांवाचें जुळें झालें. हें नरनारायण नामक जुळें अत्यंत श्रेष्ठ व अत्यंत शांत ऋषि झाले. या जुळ्या ऋषींनीं नैष्कर्म्याची ( कर्मानेंच कर्माला निष्फलत्व देण्याची ) सरणी जीवांस उपदेशिली व अद्यापिही हे ऋषि नैष्कर्म्याचरण * करीतच आहेत. अर्थात् मोठेमोठे ऋषीही या नरनारायणांच्या चरणकमलाची एकनिष्ठ उपासना नित्य करतात ॥ ६ ॥

त्या नरनारायण ऋषिद्वयाची ती कडकडीत तपश्चर्या पाहून देवेंद्राला शंका आली कीं, ' हे ऋषि तपस्या करून माझें पद बळकावणार ! ' म्हणून इंद्रानें ' काम ' नामक सेवकाला आज्ञा केली कीं, ' तूं सपरिवार जा आणि या ऋषींच्या तपांत विघ्न करून त्यांच्या तपाचा भंग कर. ' वसंत-अप्सराप्रभृति आपले सहकारी मित्र घेऊन तो काम बद्रिकाश्रमीं आला आणि नारायणाचें सामर्थ्य ठाऊक नसलेल्या त्या कामानें वसंताच्या शीतल व सुगंधी वाऱ्यांनीं आणि अप्सरांच्या कामोद्दीपक नेत्रकटाक्षबाणांनीं नारायणाचें मन चंचल करण्याचा दीर्घ प्रयत्न केला ॥ ७ ॥

इंद्राचें हें कपट आदिदेवाला समजलें. तथापि निरहंकाराची प्रत्यक्ष मूर्तिच असणाऱ्या नारायणांनीं तो इंद्राचा अपराध गिळून टाकला व ते प्रशांत ऋषि इंद्राची व त्याच्या सेवकाची कींव करून हंसले आणि स्वप्रभावानें व निश्चल शांततेमुळें भिऊन गेलेल्या मदन, मारुत व अप्सरांस हाका मारून म्हणाले:—बाप हो ! भिऊं नका ! आंत या आणि आम्ही करतों, तो पाहुणचार स्वीकारा ! ' ॥ ८ ॥

---

× ज्याच्या रजोगुणापासून ब्रह्मदेव निर्माण झाला जगताच्या स्थितीसाठीं विष्णु झाला ( अर्थात् हा विष्णु ज्याच्या सत्त्वगुणाचें कार्य होय, असें समजावें. त्याचप्रमाणें विष्णु हा कर्मफलदाता असून उपनयनसंस्कारानें ज्यांस दुसरा जन्म याच देहांत प्राप्त होतो त्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांचें व त्यांच्या धर्माचें पालन करणारा हा विष्णु असतो. ) आणि ज्याच्या तमोगुणापासून जगत्संहारासाठीं रुद्राची उत्पत्ति झाली, याप्रमाणें या निमित्तमात्र झालेल्या ब्रह्मादिकांमुळें चराचर सृष्टीमध्यें उत्पतिस्थितिलयांचीं कार्यें अखंड चालतात. ब्रह्मादि ज्याच्या सत्तेनें निमित्तमात्र होतात, तो पुरुष आद्यप्रथमचा सर्वकारण होय. शिखंडीला निमित्ताला पुढें करून ज्याप्रमाणें अर्जुनानें भीष्मवध केला, त्याप्रमाणें ब्रह्मादिकांस पुढें करून हा आदिपुरुष विश्वाची उभारणीप्रभृति कार्यें व जीवांचीं जन्मप्रभृति कार्यें अखंड करितो ॥ ५ ॥

**टीप**—'मला कांहीं तरी फल मिळावें ' ही वासना कर्मकर्त्याला नसणें ' मीं कर्म करणारा ' असा अभिमान नसणें. तात्पर्य कर्तव्यदृष्टीनें कर्म करून मी निमित्तमात्र आहें, कर्ता व करविता निराळाच - परमेश्वर - आहे, अशी अखंड वृत्ति ठेवली म्हणजे चित्तशुद्धि होते, संसारबंधन ढिलें होतें आणि श्रुतिश्रवणादिकांनीं नैष्कर्म्यरूपी आत्मा प्रकट होतो, असा

राजा ! अभय देणारें हें प्रभूचें वाक्य ऐकून ते मदनादि देवगण लाजले, थिजले, त्यांनीं आपलीं मस्तकें वांकविलीं आणि मोठ्या आर्तस्वरानें ते बोलूं लागले. 'हे प्रभो, आपण परात्पर, अविकारी आहांत. विद्वान्, धीर आणि आत्मज्ञ पुरुषसहस्रांचीं मस्तकें नित्य आपल्या चरणकमलीं रुळत असतात ! अशा शांत व निजानंदी पुरुषोत्तमाचें मन आम्ही सर्वमोहक देव चंचल करूं शकलों नाहीं, यांत आश्चर्यच नाहीं ! ॥ ९ ॥

स्वर्गसुखाचा मोह टाकून देऊन जे मुमुक्षु आपल्या चरणांची सेवा करून आपल्या स्वरूपीं मिळण्याची तपस्या करतात, त्यांच्या तपस्येंत हविर्भागलोलुप इंद्रादि देव अनेक विघ्नें उत्पन्न करतात. मात्र यज्ञयाग करून देवांस हविर्भाग देणाऱ्या याज्ञिकांच्या तपस्येंत मात्र देव विघ्नें आणीत नाहींत; परंतु आपण आपल्या भक्तांचे साहाय्यकारी असल्यामुळें आपण या विघ्नांचीं मस्तकें पायांखालीं तुडवून दडपून नाहींशीं करतां. तेव्हां स्वभक्तांचा विघ्नहारक स्वतःच विघ्नांस वश होईल ही गोष्टच लटकी ! ॥ १० ॥

परंतु क्षुधा, तृषा, शीत, उष्ण, पर्जन्य, वारा सहन करून व जिह्वासुख, रतिसुख इत्यदि मोहक सुखांचा सागरहि ओलांडून जे तपस्वी अनर्थकारी क्रोधाला वश होतात, ते बिचारे गाईच्या पावलानें झालेल्या डबक्यांतील पाण्यांतच बुडतात आणि आपल्या तपस्वीपणाला व्यर्थ मुकतात ! हा क्रोधाचा परिणाम ! ह्या क्रोधाला आपण हद्दपारच केलें आहे ? ॥ ११ ॥

द्रुमिल म्हणतातः राजा ! याप्रमाणें ते मदनादि आदिदेवाचें स्तवन करीत असतांच त्यांच्या दृष्टीपुढें आदिदेवानें अनेक अपूर्व लावण्यसुंदरी उभ्या केल्या. त्या सर्वालंकारमंडित ललना आदिदेवाची सेवा करीत होत्या ॥ १२ ॥

लक्ष्मीप्रमाणें अतिसुंदर असणाऱ्या त्या स्त्रिया पाहून व त्यांच्या शरिरांपासून उत्पन्न होणाऱ्या सुगंधानें मोहित होऊन ते मदनादि इंद्रसेवक अत्यंत लाजले आणि त्या स्त्रियांचें रूप, त्यांची तेजस्विता व त्यांची अलंकारसंपत्ति पाहून त्या सेवकांचा उन्मत्तपणा, ऐट वगैरे सर्व नष्ट झालीं ॥ १३ ॥ त्या नम्र झालेल्या देवांस तो देवदेवेश्वर नारायण किंचित् हंसतच म्हणालाः—" हे देव हो ! यांतून तुम्हांस योग्य अशी कोणतीही तुम्हांस आवडेल ती स्त्री तुम्ही खुशाल घेऊन जा ! ती स्त्री स्वर्गाला भूषणच होईल !" ॥ १४ ॥

---

सिद्धांत आहे. तात्पर्य, कर्तव्य म्हणून निरभिमानानें कर्म करणें हें नैष्कर्म्याकडे, आत्मस्वरूपाकडे नेणारें आहे म्हणून श्रीधरांनीं टीकेमध्यें 'लक्ष्यते' असें पद उपयोजिलें आहे. कर्म करून कर्मशून्य होणें हें नैष्कर्म्यलक्षण होय.

**एकनाथः—**अल्प अपमानाहातीं । जे क्रोधासी वश होती ॥
ते शाप देऊनि तपसंपत्ति । व्यर्थ नागविती निजनिष्ठा ॥ ( ११ )

नारायणाच्या आज्ञेला वंदन करून त्या इंद्रसेवकांनीं उर्वशीनामक श्रेष्ठ अप्सरा पसंत केली आणि नारायणास साष्टांग नमस्कार करून ते इंद्रलोकीं त्या अप्सरेला घेऊन गेले ॥ १५ ॥ इंद्रास वंदन करून मदनादिकांनीं इंद्रसभेंतील देवांसमक्ष इंद्रास श्रीनारायणाचें ऐश्वर्य, प्रभाव इत्यादिकांचें कथन केलें. इंद्राला तें सर्व ऐकून विस्मय वाटला व तो थोडासा रागावलाही ! ॥ १६ ॥

हे राजा,—हंस, दत्त, सनकादि, ऋषभ इत्यादि आणखी कित्येक अवतार धारण करून अच्युतानें आत्मयोग सांगितला. ऋषभ ऋषि तर आमचे वडीलच. जगताचें कल्याण करण्यासाठीं श्रीविष्णु एका अंशानें ऋषभ झाले. मधुराक्षसहंत्या आदिपरमेश्वरानें हयग्रीव अवतार घेऊन मधुराक्षसानें पळविलेले वेद जगताला उपलब्ध करून दिले ॥ १७ ॥

मत्स्यावतारीं मनु, पृथ्वी व औषधी यांचें संरक्षण केलें. वराहावतारीं उदकांत बुडणाऱ्या पृथ्वीचा उद्धार केला व हिरण्याक्षास मारलें. कूर्मावतारीं समुद्रमंथनप्रसंगीं आपल्या पाठीचा आश्रय मंदरपर्वताला दिला आणि हरिअवतारीं दुःखार्त गजेंद्राची नक्रापासून मुक्तता केली ॥ १८ ॥

समुद्रांत ( हा समुद्र गोष्पदाइतका खोल होता ) बुडणाऱ्या वालखिल्य ऋषींची स्तुतिपूर्वक आर्तस्वरयुक्त प्रार्थना ऐकून श्रीविष्णूनें त्यांचा उद्धार केला व वृत्रवधामुळें ब्रह्महत्येचें पातक इंद्राला लागलें होतें, त्यापासून इंद्राची मुक्तता विष्णूनेंच केली. त्यानेंच राक्षसांच्या बंदिवासांत पडलेल्या अनाथ स्त्रियांस मोकळें केलें आणि नृसिहावतार घेऊन साधुसंरक्षणाप्रीत्यर्थ हिरण्यकशिपूचा वध केला ॥ १९ ॥

---

**एकनाथ**—ऐकोनि नारायणवचन । मस्तकांबुजीं करूनियां नमन ॥
उर्वशी पुढासून । कामादिगण निघाले वेगीं ॥
नारायणाचे उरूस्पर्शीं । उभी होती नारायणापाशीं ॥
तेंचि नांव झालें तिसी । म्हणती उर्वशी स्वर्गांगना ॥
ते देवांचे देवदूत । स्वर्गा पातले समस्त ॥
मग शक्राचे सभेआंत । सांगती अद्भुत नारायणशक्ती ॥
तिहीं नारायणाचें चरित्र । सांगीतलें अति पवित्र ॥
तेणें अवघेचि सुरवर । झाले थोर विस्मित पैं ॥
इंद्रें देखोनि उर्वशी । तिसी भुलला अहर्निशीं ॥
बाहेर यावें सभेसी । हें वर्षानुवर्षीं नाठवे ॥ ( १५, १६ )

**एकनाथ**—तेणेंचि मत्स्यावतारें । प्रलयकालांबुमहाभारें ॥
मनुसकट रक्षिलें धरे । निजनिर्धारें औषधींसीं ॥ ( १८ )

तसेंच देवदानवांच्या युद्धांत विष्णूनें अनेक अवतार घेऊन दैत्य मारले आहेत आणि जगताचें पालन केलें आहे. आणखी, वामनावतार घेऊन त्रिभुवनाधिप बलीपाशीं त्रिपाद भूमीची याच्ञा करून तद्द्वारा सर्व भुवनांचें हरण केलें व देवांस तीं दिलीं ॥ २० ॥

हैहयादि उन्मत्त क्षत्रियांचा नाश करण्यासाठीं भृगुकुलांत ' परशुराम ' अवतार घेऊन २१ वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली. वर्तमानकालींही श्रीरामावतार घेऊन त्यानें समुद्रावर सेतु बांधला आणि लंकास्थ सर्व अनुयायांसह रावणाचा वध त्या पापहारक सीतापति रामचंद्रानें केला आहे ॥ २१ ॥

आतां पुढील द्वापार युगांत अनाद्यनंत श्रीविष्णु ' कृष्णावतार ' धारण करील, पृथ्वीचा भार हरण करील आणि देवांसही अशक्य अशीं अनेक कर्में करील. पुढें, बुद्धावतारीं यज्ञयागांसंबंधीं शंका उत्पन्न करून सामान्य लोकांस यज्ञापासून पराङ्मुख करील आणि कलियुगाच्या अखेरीला कलंकी अवतार घेऊन शूद्र राजांचा विनाश करील ॥ २२ ॥

याप्रमाणें जगत्पति जो आदिदेव त्याचे अनंत जन्म व कर्में ( लीला ) आहेत. त्यांतील मी कांहीं गोष्टी मात्र तुला सांगितल्या. विश्वव्यापी यशें ज्याचीं, त्या भगवंताच्या अनंत लीलांचें वर्णन कोणास करितां येणार आहे ? ॥ २३ ॥

---

**एकनाथ**—जें ब्रह्मादिक देवां नव्हे । तें बाळलीला स्वभावें ॥
करूनि दाविलें आघवें । देवाधिदेवें श्रीकृष्णें ॥ ( २२ )

## अध्याय चौथा समाप्त

# अध्याय ५ वा

जनक राजा म्हणालाः— हे आत्मज्ञानसंपन्न ऋषींनो ! जे पुष्कळसे लोक भगवान् हरीचें भजन-पूजन करीत नाहींत, त्या इंद्रिय-मन-बुद्धीला मात्र वश असणाऱ्या आणि म्हणून वासना मुळींच तृप्त झाली नसणाऱ्या, अशा अशांत लोकांची गति तरी काय होते, तें आम्हांस सांगावें ॥ १ ॥

चमस मुनि म्हणालेः—विराट् पुरुषाच्या मुखापासून ब्राह्मण, बाहूपासून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य व पायांपासून शूद्र असे चार वर्ण उत्पन्न झाले. ही निरनिराळ्या स्वरूपाची उत्पत्ति जीवांच्या सत्त्व, रज व तम या गुणकर्मानुरूप होती. वर्ण उत्पन्न झाले, तेव्हांच गुणानुरूप ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे चार आश्रमही निर्माण झाले ॥ २ ॥ आतां, जीवांच्या अधिकारानुरूप त्यांचा आत्माच असणारा अथवा त्या त्या आत्म्याचें नियमन करणारा जो भगवान्, त्याची या वर्णाश्रमांत असणाऱ्या लोकांपैकीं जे अज्ञानी लोक भक्ति करीत नाहींत आणि जे ज्ञानी म्हणविणारे लोक परमेश्वराची अवज्ञा करतात, ते लोक अधोगतीला जातात ॥ ३ ॥

ज्या लोकांस हरिकथामृताचें सेवनरूपी श्रवण करण्याचें सामर्थ्य नसतें, तसेंच ज्यांस हरिगुणांचें कीर्तन करितां येत नाहीं, त्या अज्ञानी लोकांवर व स्त्रिया व शूद्र यांवर दया करणें, त्यांस हरिगुणश्रवणकीर्तनांचा लाभ सुगम करणें, हें तुमच्यासारख्यांचें कर्तव्य आहे, हे अज्ञानी लोक दयेला पात्रच असतात ॥ ४ ॥

परंतु विप्रकुलांत, क्षत्रियकुलांत अथवा वैश्यकुलांत जन्म झाल्यामुळें उपनयनादि ( मौंजीबंधनप्रभृति ) संस्कार होऊन ज्यांस दुसरा जन्म प्राप्त होतो, जे द्विज * होतात,

* **टीपः**—ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य यांस वेदाध्ययन करण्याचा अधिकार प्राप्त होतो, तो उपनयनाचे, मुंजीचे द्वारा होय. उपनयन होणें म्हणजेच दुसरा जन्म प्राप्त करून घेणें होय. या सर्वांस ‘ द्विज ’ ही संज्ञा येते, ती उपनयनामुळें. मातापितरांच्या उदरीं राहून ९।१० महिन्यांनी जो जन्म होतो, तो आधिभौतिक जन्म आणि उपनयनाच्या संस्कारानें जो जन्म होतो, तो आध्यात्मिक जन्म होय. या तिन्ही वर्णांस वेदाध्ययनाचा, यज्ञयाग करण्याचा व दान देण्याचा अधिकार असतो.

**एकनाथ**—मुखीं वेदविद ब्राह्मण । बाहू जन्मले राजन्य ॥
ऊरू जन्मले वैश्य वर्ण । चरणीं जन्मस्थान शूद्रवर्णा ॥ ( २ )

**एकनाथ**—यालागीं जे अज्ञान जन । ज्यासी नाहीं ज्ञानाभिमान ॥
तेही विश्वासल्या संपूर्ण । साधु सज्जनो अनुग्रहो करिती ॥ ( ४ )

ते वैदिक संस्कारांनीं व अध्ययनामुळें अधिकार प्राप्त झालेले असतात म्हणून परमेश्वर-पदाला नेणाऱ्या भक्तीला सहज वश करून घेणें त्यांस सुलभ असतें; पण ते लोक वेदाच्या परोक्षवादामध्यें निमग्न होतात, त्यामुळें भक्तीला आंचवतात व मार्गभ्रष्ट होतात. ॥ ५ ॥

कर्ममार्गाचें खरें रहस्य न समजल्यामुळें ते वेदोक्त कर्म मात्र करणारे लोक उर्मट, मूर्ख, आपणांस शहाणे समजणारे असतात. वेदमंत्रांचा अभिप्राय न समजतां वेदाची ती उत्तान ( बरवरची ) भाषा ऐकून ते विषयोन्मुख होतात आणि ' स्वर्गांतील अप्सरांशीं आम्हीं असा प्रणयकलह करूं, असें त्यांस वश करूं ' असें बडबडतात व परस्परांस तसे आशीर्वाद देतात ! यालाच मोहाची बाधा म्हणावें ॥ ६ ॥ रजोगुण हा कामाचा व क्रोधाचा जनक - पिता होय. हा रजोगुण या मूढ लोकांच्या मनांत घोर कल्पना उत्पन्न करतो. हे लोक कामी होतात, सर्पनागांप्रमाणें क्रोधवश होतात. आपण वैदिक असें लोकांस दाखविण्यासाठीं यांस दांभिक आचरण करावें लागतें. यांस स्वाभिमान मोठा. तात्पर्य, हे सर्वथा पापाचरण करणारे असतात आणि पुनः हरिभक्तांची थट्टा करण्यास, दांत विचकण्यास एका पायावर तयारच ! ॥ ७ ॥

यांची उपासना म्हणजे स्त्रीची ! हे स्त्रीदास असतात. यांना संवाद म्हणजे मैथुन-विषयक सुखाचा ऊहापोह ! या लोकांच्या भविष्यकालीन भावनासुद्धां विषयात्मक असतात. विषयसुखाव्यतिरिक्त यांना दुसरा विषयच सुचत नाहीं. हे दांभिक लोक केव्हां केव्हां यज्ञ करतात; परंतु यज्ञांत जें अन्नसंतर्पण अवश्य असतें, जे विधि असतात, जी द्रव्यदक्षिणा द्यावी लागते, तिचें नांव सुद्धां या त्यांच्या यज्ञांत नसतें आणि पशुयज्ञाचें

---

+ **टीप**—फल सांगणाऱ्या वाक्यांस अर्थवाद म्हणतात ' औषध घेतलेंस तर गूळ मिळेल ' ह्या वाक्यांत गूळ मिळणें हें फल केवळ बालकाला औषध घेण्याची प्रेरणा व्हावी, रुचि उत्पन्न व्हावी एतदर्थ आहे. ' गूळ मिळणें ' हें फल सांगण्याचा आईचा अभिप्राय नसतो. मुलानें बरें, व्हावें हा मुख्यार्थ असतो; पण ' कडू औषध घेतलें तरच प्रकृति बरी होते ' हें समजत नाहीं, म्हणून आई ' गूळ देईन ' म्हणून सांगते व देते. " देईन म्हणणें, देणें, गुळाची प्राप्ति होणें " ही सर्व रोचनार्थक वाक्यें होत. या असल्या वाक्यांस ' अर्थवाद ' म्हणतात. या अर्थवादाला भुलणें व तोच मुख्यार्थ मानणें हा मोह आणि हा मोह कर्मफलासक्ति उत्पन्न करतो. परोक्षवादामध्येंही असाच प्रकार असतो, हे मागें सांगितलें आहे.

---

**एकनाथ**—स्त्रीसुख परम मानून । स्वयें सदा होती स्त्रैण ॥
मग जागृती सुषुप्ति स्वप्न । स्त्रियेचें ध्यान अहर्निशीं ॥
ते स्त्रीभोग भोगावयासी । धनार्जन अर्जावयासी ॥
यागु आरंभी जीविकेसी । केवळ दंभेंसी उदरार्थ ॥ ( ८ )

रहस्य काय आहे, हें न जाणतां केवळ पोटाची खळगी भरून काढण्यासाठीं मात्र पशूंचा वध करतात ! ॥ ८ ॥

या लोकांस आपल्या श्रीमंतीचा व आपल्या ऐश्वर्याचा अभिमान असतो. आपलें कुल मोठें, आपली विद्या दांडगी, आपली दानशूरता कर्णासारखी; अशी प्रौढे मिरविण्यांत यांना भूषण वाटतें. आपलें रूप मदनासारखें, आपण शक्तीनें प्रत्यक्ष बलभीम, मोठमोठीं कर्में करण्याची आपली अक्रमशक्ति रावणासारखी, असा डौल हे लोक मारतात. तात्पर्य, क्षणभंगुर विषयसंपत्तीच्या अभिमानामुळें यांची तारतम्यशक्ति आंधळी होते, मग अंतर्बाह्य राक्षसी अभिमान धरणारे हे दुष्ट लोक, ईश्वराची व ईश्वराला प्रिय असणाऱ्या भक्तांची अवहेलना करतात, यांत काय नवल ? ॥ ९ ॥

आकाश जसें सर्वत्र विद्यमान असतें, त्याप्रमाणें सर्व चराचर वस्तूंना आत्मा व नियंता असणारा ईश्वर सर्व वस्तूंमध्यें ओतप्रोत भरला आहे. वेदसिद्धांतांतही असेंच सांगितलें आहे. तसेंच आत्मस्वरूपप्राप्ति हाच जीवाचा अतिश्रेष्ठ पुरुषार्थ होय. हा आत्माच अत्यंत सुखाची प्राप्ति करून देणारा आहे, असेंही सांगितलें आहे; परंतु हे सर्व ह्या विषयमूढांस ऐकायला कसें यावें व समजावें तरी कसें ? तेव्हां हे विषयमुमुक्षु वेडगळ लोक वेदांचा अर्थ विपरीत करून ' विषयप्राप्तीसाठीं मात्र वेदानें कर्म विहित केलें आहे ' असें बडबडतात ॥ १० ॥

मैथुनाची मांसाशनाची व मदिरापानाची इच्छा जीवाला आपोआप स्वभावतःच होते. येथें ' मांस खा,' किंवा ' दारू प्या ' असे हुकूम सोडावे लागत नाहींत. तथापि या इच्छांस आळा पडावा, व्यवस्था लागावी, म्हणून श्रुतिस्मृतींनीं लग्नविधि, यज्ञकर्म आणि सौत्रामणि असे आचार सांगितले आहेत. वस्तुतः श्रुतीला मैथुनादिकांपासून निवृत्तिच इष्ट आहे; परंतु ही निवृत्ति शक्य नाहीं म्हणून ही अशी व्यवस्था सांगितली ॥ ११ ॥

वास्तविक म्हटलें म्हणजे धनाचा मुख्य उपयोग धर्मसाधन, धर्मसंपादन करण्याकडेच असावा. कारण धर्मामुळेंच ज्ञानविज्ञान ( परोक्ष ज्ञान आणि प्रत्यक्ष ज्ञान ) मिळून उत्कृष्ट शांति मिळते; परंतु हे वेदबाह्य रत झालेले लोक घरच्या कारभारांत तें धन वेंचतात ! परंतु त्या मूर्खांस समजत नाहीं कीं, अजिंक्य मृत्यु या कलेवराला ग्रासून टाकणार आहे. जें नाहींसें होणार त्याच्यासाठीं पैसा खर्चण्यांत तात्पर्य काय ? ॥ १२ ॥

---

**एकनाथ**—हें विषयाचें त्रिविध विधान । मैथुन मांसभक्षण सुरापान ॥
यदर्थीं निवृत्तीचो प्रमाण । हें पूर्ण मनोगत वेदाचें ॥ ( ११ )

**एकनाथ**—धर्म तेथ शुद्ध ज्ञान । ज्ञान तेथ विज्ञान ॥
विज्ञान तेथ समाधान । शांति संपूर्ण नांदे तेथ ॥ ( १२ )

सौत्रामणि विधीमध्यें 'सुरा हुंगावी, तिचा वास मात्र घ्यावा' असें सांगितलें आहे. 'यज्ञपशूला केवळ स्पर्श मात्र करावा' असें वेदरहस्य आहे. वेदाला पशुहिंसा अभिप्रेत नाहीं. संतति होऊन वंश अविच्छिन्न राहावा म्हणून मात्र स्त्रीसंग सांगितला आहे, कामयुद्ध करण्यासाठीं नाहीं, अशा प्रकारचा सर्वशुद्ध स्वधर्म हाच काय तो वेदानें विहित केला आहे हे त्यांस समजत नाहीं ॥ १३ ॥

ज्यांस हें कळत नाहीं, जे व्यसनी, हट्टी व दांभिक मात्र असतात, जे निःशंकपणें (वेदाच्या शब्दार्थावरच श्रद्धा ठेवून) पशुद्वेष करून हिंसा करतात, त्यांचें मांस तेच म्हणजे त्यांनीं मारलेले पशुच यमलोकीं खातात ! ॥ १४ ॥

हरि जो सर्वांचा आत्मा व ईश्वर, त्याचाच द्वेष हे लोक करतात. पशूंचा द्वेष म्हणजे पशुदेहांत राहणाऱ्या ईश्वराचा द्वेष होतो आणि हे लोक प्रेम करतात कोणावर ? तर पुत्र, मित्र, कलत्र, देह, गेह यांवर म्हणजे मर्त्य देहांवर ! हे मर्त्यांशीं स्नेहभावानें बद्ध होतात आणि अधोलोकीं जातात ॥ १५ ॥

या लोकांस मोक्षस्वरूपाचें ज्ञानविज्ञान नसून जीवन्मुक्ति संपादण्याचें ज्ञान नसतें; पण मूर्खत्वाच्या पलीकडे असणारी कांहीं ज्ञानसंपत्ति यांजवळ असते ! या अर्धवट ज्ञानसंपन्नतेमुळें त्यांस धर्म, अर्थ आणि काम हेच नित्य टिकणारे पुरुषार्थ होत असें वाटतें. हा शुद्ध भ्रम आहे. यानेंच आत्मघात होतो ॥ १६ ॥

हे आत्मघातकी, अस्वस्थ असणारे, अज्ञानालाच ज्ञान मानणारे, अकृतार्थ लोक मनोरथभग्न होत्साते नष्ट होतात ॥ १७ ॥ मोठ्या प्रयासांनीं बांधलेलें घर, प्राप्त झालेलीं मुलेंबाळें, मिळविलेले स्नेही आणि संपादन केलेली संपत्ति या सर्वांस सोडून जाणें भाग पडलेल्या वासुदेवविन्मुख संसारी लोकांस शेवटीं स्वेच्छेविरुद्ध तमामध्यें, नरकामध्यें वास्तव्य करावें लागतें ॥ १८ ॥

जनक राजानें विचारलें, 'भगवंतांनो ! श्रेष्ठ मुनींनो ! कृपा करून मी विचारतों त्या प्रश्नांचें उत्तर मला सांगा. या भगवंताचें यजन, पूजन निरनिराळ्या युगांत करावयाचें असतें. तर प्रत्येक युग, त्या युगांतील परमेश्वराचा आकार, त्याचा वर्ण त्याचें नांव इत्यादि सांगून त्या त्या युगांत कोणत्या विधीनें परमेश्वर-पूजा करावी तें सांगा ॥ १९ ॥

करभाजन ऋषि म्हणाले, कृत, त्रेता, द्वापर व कलि अशीं चार युगें आहेत. त्यांतील प्रत्येक युगांत परमेश्वराचा वर्ण, त्याचें नांव, त्याचें स्वरूपहीं भिन्न असतात. प्रत्येक युगांत परमेश्वराचा वर्ण विशिष्ट, नांव विशिष्ट व स्वरूप विशिष्ट असतें. त्याच्या पूजनाचे प्रकारही विशिष्ट असतात ॥ २० ॥

कृतयुगीं तो शुभ्र असून त्याला चार हात असतात. तो जटाधारी असून वल्कलें परिधान करतो. मृगचर्म, यज्ञोपवीत, रुद्राक्षमाला, दंड व कमंडलु हे त्याचे अलंकार होत ॥ २१ ॥

कृतयुगांतील लोक सत्त्वगुणी, शत्रुत्वभाव नसून सर्वांची मैत्री करणारे, सर्वच एका योग्यतेचे होत असें समजणारे * असे असतात. परमेश्वराचें यजन, तप, शम, दम यांच्या साहाय्यानें करतात ॥ २२ ॥ या युगामध्यें परमेश्वराला हंस, सुपर्ण, वैकुंठ, धर्म, योगेश्वर, मनु, ईश्वर, पुरुषोत्तम, अव्यक्ताक्षर, परमात्मा या नांवांनीं आळवितात. याप्रमाणें कृतयुगांत परमेश्वराचा वर्ण कसा, रूप कसें, पूजाविधान कसें व नांवें कोणतीं हें सर्व सांगितलें ॥ २३ ॥

त्रेतायुगांत तो ताम्रवर्ण, चतुर्बाहु, तीन रज्जु एकत्र करून तयार केलेली मेखला धारण करणारा, पिंगट केसांचा, वेदत्रयीचा प्राण असून आहुतिदानाचीं पात्रें हातांत धारण करतो. हें यज्ञस्वरूप होय ॥ २४ ॥ या युगांतील धार्मिक ब्रह्मवेत्तेहि सर्वदेवदेवेश्वर हरीचें भजनपूजन वेदोक्त यज्ञविधीनें करतात ॥ २५ ॥ त्रेतायुगांतील परमेश्वराची "विष्णु, यज्ञ, पृश्निगर्भ *, सर्व देवदेवतांचा देव, सउरुक्रम–महापराक्रमी–वृषाकपि ×, जयंत–सर्वदा विजयी सर्वगामी अथवा सर्वस्तुत" हीं नांवें होत. या नांवानीं याज्ञिक लोक ह्या देवदेवाला आळवितात ॥ २६ ॥

द्वापारयुगांत भगवंताचा वर्ण श्याम असतो. तो पीतवस्त्र–पीतांबर परिधान करतो शंख, चक्र, गदा, पद्म हीं त्याचीं स्वाभाविक आयुधें होत. श्रीवत्सप्रभृति त्याची सहज हस्तपादावरील चिन्हें व कौस्तुभादि बाह्य अलंकार यांनीं तो विशिष्ट असतो * ॥२७॥

द्वापर युगांतील जिज्ञासु भक्त वेदमंत्रांनी व आगमोक्त तंत्रांनीं मिळून छत्रचामरादि सार्वभौम महाराजांच्या चिन्हांनीं अलंकृत झालेल्या त्या ह्या परम पुरुषाचें यजन करतात ॥ २८ ॥ वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न अनिरुद्ध हीं द्वापारयुगांतील ईश्वराचीं नांवें

* **टीप** — 'श्यामः' म्हणजे अतसीच्या फुलासारखा आहे वर्ण ज्याचा. शंख, चक्र, गदा, पद्म हीं ज्या कृष्णाचीं आयुधें असतात, ज्याच्या छातीच्या उजव्या भागावर रोमांचा दक्षिणमुख असणारा भोवरा असतो, त्याला श्रीवत्स म्हणतात. हस्तपादादि अवयवांचे ठायीं कमलादि आकारांचीं चिन्हें असतात त्यांचा श्रीवत्स हा आदि आहे.
परमेश्वराचीं अंगभूत चिन्हें होत. कौस्तुभप्रभृति चिन्हें बाह्य होत. हीं द्वापारांतील परमेश्वराचीं अंगभूत व कृत्रिम चिन्हें होत. ॥ २७ ॥

* 'पृश्नि' ही प्रजापतीची पत्नी. × 'वृषाकपि' हें वैदिक नांव होय.

**एकनाथ**— द्वापरीं घनश्यामवर्ण । अतसीपुष्पप्रभासमान ॥
पीतांबरपरिधान । श्रीवत्स चिन्ह अंकित ॥
शंख चक्र पद्म गदा । चारी भुजा सायुधा ॥
इहीं लक्षणीं गोविंदा । लक्षिती सदा विष्णुभक्त ॥ ( २७ )

होत, हीं नांवें उच्चारून भक्त त्याला प्रणाम करतात × ॥ २९ ॥ द्वापारांत नारायण, ऋषि, पुरुष, महात्मा, विश्वेश्वर, विश्व, सर्वभूतात्मा हीं नावें घेऊन त्याला त्याचे भक्त वंदन करतात ॥ ३० ॥

राजा ! याप्रमाणें द्वापरयुगांतील परमेश्वराचें स्तोत्रविधान आहे. आतां कलियुगांतील तंत्रविधि अनेक आहेत ते सांगतों ऐक ॥३१॥

कलियुगांत परमेश्वर काळा * असतो, तथापि त्याचें तेज उज्ज्वल असतें. विवेकी भक्त, त्याची अंगपूजा, उपांगपूजा, त्याच्या शस्त्रास्त्रांची व त्याच्या अनुचरांची पूजा करतात; तात्पर्य सांगोपांग पूजा करतात. हा जो पूजायज्ञ आहे त्यांत परमेश्वराच्या लीलांचें, पराक्रमाचें स्तुतिपूर्वक कीर्तन असून परमेश्वराच्या नांवांचें उच्चारण प्रधानतः होतें ॥ ३२ ॥

कलियुगांतील भगवत्प्रार्थनाः- ' हे परमेश्वरा ! तुझ्या चरणकमलाला मी नमस्कार करतों. हें चरणकमल सदैव निदिध्यास करण्याला योग्य आहे. तें भक्तांवर येणारीं सर्व प्रकारची विघ्नें नष्ट करून त्यांचे इष्ट मनोरथ पूर्ण करतें. तें तीर्थाचें तीर्थ आहे. शंकर-ब्रह्माप्रभृति सर्व देव त्याचें स्तवन करतात. तें शरण जाण्याला अत्यंत योग्य स्थान आहे. दासांचीं संकटें नष्ट करण्याला हेंच एक समर्थ आहे आणि या संसारसागरांतून पलीकडे जाण्याला उत्तमोत्तम नौका म्हणजे आपलें हें पदकमल होय. हे पुरुषोत्तमा, आपल्या या मोक्षदायी चरणारविंदाला मी शिरसाष्टांग नमस्कार करतों ॥ ३३ ॥

" सनातन वैदिक धर्माचें एकनिष्ठेनें अनुपालन करणाऱ्या श्रीरामचंद्रा ! दशरथ-पित्यानें, 'राज्य सोडून वनवासाला जा !' अशी आज्ञा करितांक्षणीं आपण दुर्लभ व देवादिकांसही दुष्प्राप्य अशा राज्यश्रीचा सर्वथा त्याग करून वनवासाला गेला ! ' मातृदेवो भव । पितृदेवो भव ' या श्रुतीच्या आज्ञा वंद्य मानून आपण तदनुसार आचरण करण्यासाठीं पित्याची आज्ञा पाळिली. हेंच धर्माचें उत्कृष्ट आचरण होय. त्याप्रमाणें आपली प्रियतम दयिता सीतादेवी, हिचें कोड पुरविण्यासाठीं आपण कांचनमृगापाठीमागें धावून गेलां ! ' हा मायावी ( कपटाचरणी ) मृग आहे, हा राक्षस आहे' असें ठाऊक असूनहि दीनवत्सलत्वाच्या आवेगानें त्या खोट्या हरणाच्या पाठीमागें लागलां ! हेंच दीनदयालुत्व होय ' दीनावर दया करावी' ' पत्नीचे लाड पुरवावे' हा जो सात्त्विक शिष्टा-

---

× टीप —वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हे चार व्यूह भागवत-संप्रदायांत मानले आहेत. हे चार व्यूह परमेश्वरी स्वरूपेंच होत. ॥ २९ ॥

टीप —' त्विषा ' म्हणजे कांतीनें. अकृष्णं म्हणजे इंद्रनील मण्यासारखा उज्ज्वल तेजस्वी, देदीप्यमान. या विशेषणानें कृष्ण म्हणजे काळा या रंगाची रुक्षता नाहींशी केली आहे, किंवा कृष्ण म्हणजे कृष्णावतार असाही अर्थ करून त्विषा कांतीनें असा अर्थ करावा. कृष्णावतारांतील कृष्णाची कांति असा अर्थ घेतला अथवा कृष्णाची उज्ज्वल कांति असाही अर्थ केला तरी कलियुगांत कृष्णावताराचें महत्त्वदर्शक प्राधान्य स्पष्ट होतें.

चार तो आपण पाळला ! हेंच आपलें धर्मिष्ठत्व होय. हे रामचंद्रजी ! मी आपलें चरण-कमल शिरसा वंदितों " ॥ ३४ ॥

याप्रमाणें त्या त्या युगांत राहणारे भक्त त्या त्या युगालाच योग्य असणारीं नाम-रूपें आदरून तद्द्वारां श्रेयःस्वामी जो भगवान् हरि त्याचें पूजन, भजन व संकीर्तन करतात प्रत्येक युगाला विशिष्ट असणारा जो यज्ञ तद्द्वारा त्या युगांतील भक्त परमेश्वराची आराधना करतात ॥ ३५ ॥

हरीच्या नामस्मरणानेंच मात्र ज्या कलियुगांत जीवाचे सर्व पुरुषार्थ साध्य होतात, त्या कलियुगाचें स्वरूप समजून घेऊन त्याच्या कल्याणकारी गुणांचा मात्र स्वीकार विवेकतः करणारे श्रेष्ठ श्रेष्ठ लोक कलियुगाचा पूज्यबुद्धिपूर्वक जयजयकार करतात ॥ ३६ ॥

ज्या कलियुगाच्या मोक्षदायी आश्रयाची प्राप्ति झाली असतां उत्कृष्ट शांति मिळते व जन्ममरणात्मक संसारदुःख नष्ट होतें. त्या कलियुगाचा लाभ संसारात सांपड-लेल्या जीवास झाला, तर खरोखर या लाभापेक्षां दुसरा कोणताही लाभ श्रेष्ठ नाहीं ॥ ३७ ॥ राजा ! कलियुगामध्यें आपला जन्म व्हावा असें इतर लोकांस वाटते व तशी ते इच्छा करतात, कारण नारायणाचे एकनिष्ठ भक्त या कलियुगामध्यें ठायीं ठायीं अवतार घेतात. अर्थात् अशा नारायणभक्तांचा चिरंतन समागम झाला कीं मोक्ष हातीं येतो ! ॥ ३८ ॥

परंतु ताम्रपर्णी, कृतमाला, पयस्विनी, कावेरी व प्रतीची या पांच पवित्र नद्या ज्या द्रविड देशांतून लोकोद्धारार्थ वाहतात त्या द्रविड देशांत मात्र पुष्कळच शुद्धचित्त नारायणभक्त अवतीर्ण होतात ॥ ३९ ॥ या पवित्र नद्यांचें शुद्धिकर उदक जे लोक पितात, त्यांचें अंतःकरण निर्मळ झाल्यामुळें ते नारायणाचें भजन एकनिष्ठेनें करतात. द्रविडांत पुष्कळ भक्त होण्याचें हें मुख्य कारण होय ॥ ४० ॥

राजा ! संसाराच्या गर्तेत पाडणाऱ्या मायेचा निरास करून जो सर्वांशानीं मुकुंदाला, भक्तवत्सल असून शरणागतांचें रक्षण करणाऱ्या मुकुंदाला, जो भक्त अनन्य भावानें शरण जातो, तो देवांचा किंवा ऋषींचा, भूतांचा किंवा आप्तांचा, समाजाचा किंवा पितरांचा दास होणें किंवा त्याचा ऋणको होणें अशक्य होतें. संसारी लोक देवादिकांचे दास असतात. प्रत्येक संसाऱ्याला देवऋणादि पांच महाऋणें फेडावींच लागतात; परंतु भगवद्भक्तांच्या मागें मात्र हें लिगाड लागत नाहीं ॥ ४१ ॥

---

**एकनाथ**—कलियुगीं दोष बहुत । केवीं कर्तें होय स्वार्थ ॥
तेथें दोषत्यागें जे गुण घेत । ते नित्यमुक्त हरिकीर्तनीं ॥
कलियुगीं हेंचि सार । नाम स्मरावें निरंतर ॥
करिती नामाचा निज गजर । ते मुक्त नर नृपनाथा ॥ ( ३६ )

कारण, अनन्य भावानें जो हरिभक्त हरिचरणकमलांचें ध्यानभजन अहर्निश करतो त्याच्या हातून चुकून कांहीं एखादें निषिद्ध आचरण झालेंच, तर तो सर्वांच्या हृदयांत राहणारा श्रीभगवान् हरि तें विकर्म, तें निषिद्ध आचरण समूळ नाहींसें करतो. सर्व कर्ता-करविता हरि आपल्या प्रिय भक्तानें केलेलें अपराधी वर्तन साफ धुऊन नाहींसें करतो ॥ ४२ ॥

नारद म्हणतात, वसुदेवजी ! मिथिलाधिपति जनकराजानें मुनींनीं केलेलें भागवत धर्माचें प्रवचन सांगोपांग ऐकलें आणि नंतर त्यानें त्यांची पूजा केली. राजाबरोबर राजोपाध्यायानेंही त्यांची पूजा केली. अर्थात् यज्ञयागादि कर्म चालविणाऱ्या उपाध्यायालाही हरिभक्तिच श्रेष्ठ आहे असें ज्ञान झालें. जनक राजालाही भक्तिमार्गच मोक्षसाधक आहे असें कळलें ॥ ४३ ॥

पूजाविधि आटोपल्यानंतर ते सर्व सिद्ध, लोक पाहात असतानाच तेथल्या तेथें अदृश्य झाले ! नंतर जनकराजाही सर्व संग टाकून देऊन भागवत धर्माचें अनुष्ठान करून हरि-सेवा करिता झाला. शेवटीं तो शुद्धचित्त होऊन आत्मज्ञानविज्ञानानें मोक्षाला गेला ॥४४॥

राजा ! भाग्यशाली वसुदेवा ! हें जें भागवत धर्माचें श्रवण तुला झालें आहे, या श्रवणानुरूप भागवतधर्माचें व्रत पूर्णश्रद्धेनें स्वीकारशील, तर तूंही मोहांतून पार पडून स्वच्छ व निर्लेप होशील, संसारविरक्त होशील आणि मोक्षाचा अतिश्रेष्ठ ठेवा प्राप्त करून घेशील ! ॥ ४५ ॥

वसुदेवा ! प्रत्यक्ष षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् श्रीहरिच तुमचा पुत्र झाला आहे, म्हणून महाभाग्यशाली जे पतिपत्नी तुम्ही त्या तुमची कीर्ति त्रैलोक्यांत ओतप्रोत भरलीच आहे ॥ ४६ ॥ शिवाय पुत्रभावानें श्रीकृष्णावर अलोट प्रेम करणाऱ्या तुम्हांला, श्रीकृष्णाचें दर्शन, त्याला प्रेमानें दिलेलें आलिंगन, त्याचें कौतुकानें ऐकलेलें भाषण या पवित्र गोष्टींनींच तुमचे नेत्र, तुमचें शरीर व तुमचे श्रवण हीं पवित्र झालीं अहेत. त्याला थोपटून निजविणें, त्याला झोपाळ्यावर ठेवून झोंके देणें त्याला भरविणें इत्यादि प्रकारची श्रीकृष्णसेवा त्याच्या बालपणीं तुम्हीं केली आहे म्हणून तुम्हां उभयतांचा आत्माही पवित्र झाला आहे ॥ ४७ ॥

राजा ! शिशुपाल, पौंड्र, शाल्वप्रभृति राजांनीं श्रीकृष्णासंबंधानें वैरबुद्धि धरली; निजतांना, बसतांना " तो चालतो कसा, लीला करतो कशा, पाहतो कसा " इत्यादिकांचें

**एकनाथ**—भावें करितां भगवद्भक्ती । देहीं प्रगटे विदेहस्थिती ॥
ते पावोनि जनक नृपती । परम विश्रांति पावला (४४)
श्रद्धेनें केलिया वस्तुश्रवणा । मननयुक्त धरावी धारणा ॥
तैं निःसंग होऊनियां जाणा । पावसी तत्क्षणा निजधामासी (४५)

**एकनाथ**—नाम घेतां वसुदेवसूनु । स्मरतां देवकीनंदनु ॥
होय भवबंधच्छेदनु । ऐसें पावनु नाम तुमचें ॥ (४७)

चिंतन वैरभावानें का होईना, पण सतत झाल्यामुळें या कृष्णमय झालेल्या भ्याड वैऱ्यांचें सर्व आचरणही कृष्णसदृश झालें. हे वैरी ना ? परंतु संततध्यानानें यांचें आचरण आपणासारखें झालें हें पाहून भगवान् श्रीकृष्णानें त्या वैऱ्यांस सुद्धां 'सरूपता' मुक्ति दिली मग तुम्ही तर त्याच्या ठिकाणीं प्रेमबुद्धीनें अनुरक्त आहां. अर्थात् तुम्ही मुक्त व्हाल यात शंका कसली ? अनन्य भावानें ईश्वराची प्रेमभक्ति करणारे भक्त मुक्तच होतात ॥ ४८ ॥

सारांश, श्रीकृष्ण सर्वात्मा आहे, सर्वनियंता आहे, तो अव्यय आहे, तो सर्वश्रेष्ठ आहे, अशी शुद्ध भावना तुम्ही धरा. स्वतःच्या मायेनें तो मनुष्य झाला आहे म्हणूनच त्याचें ऐश्वर्य गुप्त आहे; पण तें ऐश्वर्य आहेच आहे. अतएव त्याच्या ठिकाणीं पुत्रभावना तुम्ही न ठेवतां तो ईश्वर आहे, मोक्ष देणारा आहे, अशी बुद्धि ठेवून भागवत धर्माचें अनुष्ठान ज्ञानपुरस्सर, श्रद्धापुरस्सर करा ॥ ४९ ॥

हा भगवान् मनुष्यरूपानें अवतीर्ण झाला तो दोन कारणांसाठीं. एक तर भूमीला भारभूत होणाऱ्या जुल्मी क्षत्रिय राजेरूपी राक्षसांचा संहार करावा आणि दुसरें साधुवृत्ति भक्तांचें संरक्षण करून त्यांस मुक्त करावें. अशा लोकसंग्रह करणाऱ्या परमेश्वराचें यश त्रैलोक्यांत भरून उरतें यांत आश्चर्य नाहीं. हेंच यश जीवाला सन्मार्गदर्शक होते ॥ ५० ॥

शुक म्हणतात, राजा जनमेजया ! भागवतधर्माचें हें रहस्य ऐकून भाग्यशाली राजा वसुदेव व देवी देवकी यांस परम विस्मय झाला व भागवत धर्मावर त्यांची ज्ञानपूर्वक श्रद्धा स्थिर झाली. अर्थात सर्व मायामोहाची आपद दूर झाली व शेवटीं ते मुक्त झाले ॥ ५१ ॥ राजा ! हा भागवतधर्म सांगणारा इतिहास समाधानवृत्तीनें जो कोणी श्रद्धेनें ऐकेल, निदिध्यासन करील, त्याप्रमाणें आचरण करील, त्याचें सर्व अज्ञान व अज्ञानजन्य मोहमल नष्ट होऊन तो ब्रह्मपदाचा अधिकारी होईल ॥ ५२ ॥

---

**एकनाथ**—कंसासुर भयावेशें । शिशुपाळादिक महाद्वेषें ॥
सायुज्य पावले अनायासें । मग श्रद्धाळू कैसे न पावती मोक्ष ( ४८ )
सार्थक एक एक पद । परिसतां होय अंतर शुद्ध ॥
यालागीं पावे ब्रह्मपद । परमानंद निजबोधें ॥ ( ५२ )

## पांचवा अध्याय समाप्त

# अध्याय ६ वा

श्रीशुकाचार्य म्हणतात:—नंतर आपल्या सनकादि मानसपुत्रांसह, देवांसह आणि प्रजापतीसह ब्रह्मदेव द्वारकेस आला. त्याचप्रमाणें आपल्या नंदीप्रभृति भूतगणांसह भूतभविष्याचा स्वामी शंकर तोही द्वारकेस आला ॥ १ ॥

मरुद्गणांसह भगवान् इंद्र, १२ आदित्य, ८ वसु, २ अश्विनीकुमार, ऋभु, अंगिरस, रुद्र, विश्वदेव, चारण, साध्य, गंधर्व, अप्सरा, अष्टनाग, सिद्ध, गुह्यक, ऋषि, पितर, विद्याधर, किन्नरप्रभृति सर्व द्वारकेस आले ॥ २ ॥ ३ ॥ सर्वांसच कृष्णमूर्ति पाहण्याची उत्कंठा होती. कारण, जें शरीर धारण करून भगवान् श्रीकृष्ण भूलोकांत मनुष्यांस अत्यंत प्रियकर झाला आणि ज्यानें सर्व लोकांतील पापांचा नाश करणारें आपलें यश चौदाही भुवनांत विस्तारलें, त्या भगवंताला प्रत्यक्ष पाहण्याची इच्छा देवांस होणें साहजिकच आहे ॥ ४ ॥

त्या देदीप्यमान व ऋद्धिसिद्धींनीं संपन्न द्वारकानगरींत त्या अद्वितीय सुंदर कृष्णमूर्तीचें दर्शन त्या देवादिकांस झालें ते सर्वजण आसोशीनें किती वेळ तरी कृष्णस्वरूप पाहात राहिले; पण त्यांच्या नेत्रांची तृप्ति झाली नाहीं ॥ ५ ॥ देवांनीं स्वर्गातील नंदनादि उपवनांत निर्माण होणाऱ्या सुगंधी पुष्पांच्या माळांचा यदूत्तम श्रीकृष्णावर वर्षाव करून त्याची पूजा केली आणि सुंदर शब्द व अपूर्व अर्थ यांनीं परिपूर्ण असलेल्या स्तोत्रांनीं त्याची स्तुति केली ॥ ६ ॥

देव स्तुति करतांना म्हणाले:—हे विश्वपते ! कर्माच्या महापाशांनीं युक्त असलेल्या संसारांतून मुक्त होण्याची इच्छा करणारे तुझे श्रद्धालु भक्त ज्या तुझ्या पवित्र चरणकमलाचें अंतःकरणपूर्वक चिंतन अहर्निश करतात, त्या तुझ्या मोक्षदायी पादपद्माला आम्ही आमच्या बुद्धि, इंद्रियें, मन, प्राण, वाणीप्रभृति अंगोपांगांसह शरण आलों आहों ॥७॥

हे अजित म्हणजे अजिंक्य व सर्वनियामक प्रभो ! परमेश्वरा ! तुझी दासी जी सत्त्वादिगुणयुक्त माया, तिच्या साहाय्यानें तूं आपल्या स्वरूपांतच अतर्क्य व अनिर्वचनीय असें दृश्य विश्व निर्मून त्याचें रक्षण व त्याचा संहार त्या त्या सत्त्वरजतमोगुणांत राहून स्वेच्छेनें करतोस, परंतु देवा ! या विश्वोत्पत्ति–रक्षणादि कर्मांनीं तुला कोणताच विकार होत नाहीं. इतकेंच नव्हे तर आपल्या स्वतःच्या अखंड आत्मानंदामध्यें तूं सदैव निर्लेपत्वानें रममाण असतोस ॥ ८ ॥

हे सर्वस्तव्य आणि सर्ववंद्य, सर्वश्रेष्ठ परमेश्वरा ! ज्याचें अंतःकरण मलीन वासनांमुळें कलुषित झालें अशा अभाग्यांनीं केवढीही मोठी विद्या संपादन केली, वेदपठण केलें,

**एकनाथ**—भावें घेतलिया श्रीकृष्णनाम । सकळ पातकां करी भस्म ॥
देवीं देखिला पुरुषोत्तम । विश्राम धाम जगाचें ॥ ( ४ )

कर्णासारखीं लोकोत्तर दानें दिलीं, विश्वामित्रासारखी घोर तपश्चर्या केली, किंवा भगीरथा-सारखीं महाकृत्यें केलीं, तथापि तुझें यशःश्रवण झाल्यामुळें वृद्धिंगत होऊन पुष्ट झालेली सच्छ्रद्धा असणाऱ्या सात्त्विक भक्तांच्या मनाची जशी शुद्धि होते, तशी त्यांच्या मनाची होत नाहीं. तात्पर्य, विद्यादिकांपेक्षां परमेश्वरलीलांचें श्रद्धापूर्ण श्रवण मोक्ष देणारें आहे ॥ ९ ॥

देवाधिदेवा ! तुझा हा पवित्र चरण आमच्या अमंगल वासनांचा धूमकेतु म्हणजे संहारक होवो ! आपल्या अत्यंत कल्याणार्थ प्रेमपूर्ण, कोमल मनाच्या श्रद्धालु मुनींनीं याच पायाचें अखंड चिंतन केलें आहे आणि स्वर्गाला मागें टाकून सरूपतानामक ऐश्वर्य-संपन्न मुक्ति मिळविण्यासाठीं आत्मज्ञ भक्तांनीं याच पायाचें त्रिकाल अर्चन केलें आहे, ( भागवत संप्रदायांत परमेश्वर चार व्यूहांत प्रगट असतो असें मानलें आहे. वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध हे ते चार व्यूह म्हणजे स्वरूपें होत. या वासुदेवादि चार व्यूहांच्या चरणांचा उल्लेख श्लोकांत ‘ व्यूह ’ शब्दानें केला आहे ) ॥ १० ॥

भगवन् ! स्थंडिलामध्यें पेटलेल्या आहवनीयादि अग्नीला वेदविहित मार्गें आहुति देण्यासाठीं हस्तामध्यें हवि घेऊन याज्ञिक याच पायाचें चिंतन करतात व आहुति देतात, तसेंच तुझ्या मायेचें अणिमादि सिद्धीपलीकडील तुझें स्वरूप जाणण्याची इच्छा करणारे ज्ञानयोगी सुद्धां याच पायाचें चिंतन करतात. तुझे भागवत भक्त मात्र अनेक प्रकारांनीं या चरणाची अखंडचिंतनपूर्वक यथासांग पूजा करतात ॥ ११ ॥

प्रभो ! तुझी भार्या भगवती लक्ष्मीदेवी ही तुझ्या गळ्यांत असलेल्या या शिळ्य वनमालेचा मत्सरच करते. कारण, तुझें या वनमालेवर अत्यंत प्रेम असतें. लक्ष्मीवरील प्रेमापेक्षांही वनमालेवरील तुझे प्रेम अधिक असतें. तुझ्या भक्तांनीं ती तुला प्रेमपुरःसर अर्पण केली आहे. या मालेच्या साहाय्यानें देवा ! आम्ही तुझी यथासांग पूजा केली व तिचा त्वां प्रेमपुरःसर स्वीकारही केला, अतएव हा तुझा पवित्र चरण आमच्या दुष्ट वासनांचें निर्दालन करो ! ॥ १२ ॥

हे भुमन् सर्वश्रेष्ठ भगवंता ! वामन अवतारीं दुसऱ्या पावलानें सर्व सत्यलोक व्यापला, त्या महत्कृत्याचा हा तुझा चरण विजयध्वजच होय. भगवन् ! त्रिपथगामिनी म्हणजे तिन्ही लोकांत संचार करून सर्वांस पावन करणारी श्रीगंगा तुझ्याच चरणापासून निघाली; म्हणून गंगा तुझ्या चरणांचा महिमा प्रस्तुत करणारी पताका होय. देवा ! देव-सेनेला अभय देऊन स्वर्गसुख देणारा आणि राक्षसांस भयकारी होऊन त्यांस नरकलोकीं ढकलणारा हा तुझा चरण आहे. देवा ! आम्ही तुझे भक्त म्हणून हा चरण आमचें पाप धुऊन काढून आम्हांस पवित्र करो ! ॥ १३ ॥

• हे पुरुषोत्तमा ! वेसण घातलेले बलीवर्द जसे वठणीस येतात, त्याप्रमाणें परस्परांशीं कलह करून एकमेकांस पीडा करणारे ब्रह्मादेवादि सर्व देहधारी देव तुझ्या चरणाच्या स्वाधीन असतात; तूं कालस्वरूपी म्हणून सर्वप्रवर्तक व नियामक आहेस.

तूं प्रकृति आणि पुरुष यांच्या पलीकडचा असून त्यांचा स्वामी व त्यांचा नियामक आहेस. देवा ! अशा तुझा हा चरण आमचें मंगलप्रद कल्याण करो ! ॥ १४ ॥

हे उत्तमपुरुषा ! तूं या विश्वाच्या उत्पत्तीचें, स्थितीचें आणि संहाराचें मूळ कारण आहेस. तूंच सर्व अव्यक्ताचा, जीवांचा आणि महत्तत्त्वाचा काल आहेस, असें श्रुति म्हणते हाच कालरूपी तूं त्रिणाभि म्हणजे तीन चतुर्मासांनीं * घटित असून सर्वांचा संहार करण्यास प्रवृत्त होतोस. तुझा म्हणजे कालाचा वेग अति गंभीर असतो. तुला पुरुषोत्तम म्हणतात, याचें कारण तुझें कर्तृत्व सर्वांहून अधिक आहे ॥ १५ ॥

देवा ! मायेच्या द्वारा तुझ्यापासूनच सगुण ईश्वराला अमोघ शक्ति प्राप्त झाली आणि पुढें ज्या विश्वाची उत्पत्ति होणार, त्याचा गर्भच जणों कांहीं मायान्वित महत्तत्त्वाच्या रूपानें त्या ईश्वरानें धारण केला. पुढें त्या ईश्वरानें मायेचें साहाय्य घेऊन स्वरूपामधूनच सुवर्णाचा अंडकोश ( ब्रह्मांड ) उत्पन्न केला. या अंडाला पुष्कळशीं आवरणें होतीं ॥ १६ ॥

हे हृषीकेशा ! मायेपासून उत्पन्न होणाऱ्या, इंद्रियें मन, बुद्धि इत्यादि वृत्तींपुढें आलेल्या विषयांचा स्वीकार करूनही ज्या अर्थीं तुला कसला विकार होत नाहीं, लेप लागत नाहीं, त्या अर्थीं तूं सर्वथा स्वतंत्र असून विश्वांतील स्थावरजंगम पदार्थांचा स्वामी होस. परंतु भगवंता ! इतरांस या नसणाऱ्या, नष्ट होणाऱ्या आणि नष्ट केलेल्या विषयांपासून नुसत्या चिंतनानेंही भीति प्राप्त होते ! ॥ १७ ॥

उदाहरणार्थ पाहा—सोळा हजार तुझ्या पत्नी त्या सर्वांनीं एकाच वेळीं तुझ्यावर हास्य, कटाक्ष, वक्र-भ्रुकुटीप्रभृति शृंगारयुद्धांत स्वकार्यक्षम होणाऱ्या अनंगाचे बाणांचा सारखा वर्षाव केला परंतु या बाणांना तुझ्या मनाला स्पर्शसुद्धां करतां आला नाहीं याचें कारण तुझा आत्मज्ञानजन्य मनोनिग्रह होय ॥ १८ ॥

आणखी पाहा:—तुझ्या चरित्रामृतानें भरलेल्या कथारूप ह्याच कोणी नद्या आणि तुझ्या चरणांपासून निघालेल्या गंगाप्रभृति नद्या, या त्रैलोक्यांतील सर्व पापें नाहींशीं करण्याला समर्थ आहेत म्हणून तुझे भक्त श्रुतींचा आश्रय करून, तुझ्या निर्मळ यशाचें श्रवण करतात, आणि तुझी कन्या जो गंगा तिच्या प्रवाहांत अवगाहन करतात व शुद्ध होतात. हींच दोन तीर्थें ( तुझी कथा व तुझी गंगा ) जगाला पावन करतात ॥ १९ ॥

श्रीशुक म्हणाले:—याप्रमाणें देवांसह व शंकरासह श्रीकृष्णस्तुति केल्यानंतर आकाशस्थ ब्रह्मदेव गोविंदास नमस्कार करून पुढें दिल्याप्रमाणें बोलला ॥ २० ॥

---

**एकनाथ**— पुढतीं सृष्टीचा सृजिता । तूंचि होशी गा अनंता ॥
ते उत्पत्तीची अवस्था । मूळकर्ता तूंचि तूं ॥
तुझी लाहोने वर्यशक्ति । होये पुरुषासी पुरुषत्वप्राप्ती ॥
तेणें अंगीकारूनि प्रकृती । केलें उत्पत्ती गर्भाधान ॥ ( १६ )

---

* बारा महिन्यांच्या एका वर्षांत तीन चतुर्मास असतात, हें प्रसिद्ध आहे.

ब्रह्मदेव म्हणाला:—प्रभो ! पृथ्वीचा भार हरण करावा अशी विनंति पूर्वी तुला आम्हीं सर्व देवांनीं केली, त्याप्रमाणें जगदात्मा जो तूं त्या त्वां सर्व घडवून आणलें आहे ॥ २१ ॥ आणखी, सत्यप्रिय अशा साधुलोकांत धर्माची स्थापनाही त्वां केली आणि सर्व लोकांचें पाप नाहींसें करण्यास समर्थ असणारी कीर्तिही सर्व विश्वभर पसरविली ॥ २२ ॥

यदुवंशांत तूं जन्म घेतलास. लोकोत्तर सुंदर वपुही धारण केलेंस आणि जगतांचें कल्याण करतील अशीं अमानुषी पराक्रमाचीं कृत्येंही त्वां केलीं आहेत ॥ २३ ॥ हे ईश्वरा ! या कलियुगांत जे साधु पुरुष तुझ्या अलौकिक चरित्रांचें श्रवण व कीर्तन करतील ते लोक हा अज्ञानजन्य भवसागर सहज लीलेनें तरून जाण्यास समर्थ होतील ॥२४॥ हे पुरुषोत्तमा ! तूं यदुवंशामध्यें अवतार घेतल्याला आज एकशें पंचवीस वर्षें होऊन गेलीं आहेत ॥ २५ ॥

हे देवेश्वरा ! हे सर्वांस आश्रय देणाऱ्या व आधार असणाऱ्या देवा ! आतां तुझ्या अवतारकृत्यांतील कोणताही अंश करावयाचा राहिला आहे असें नाहीं. एक तुझें हें यदुकुल काय तें राहिलें आहे. परंतु तेंही ब्राह्मणांचा शाप झाल्यामुळें बहुतेक नष्टच झाल्यासारखें आहे ॥ २६ ॥ म्हणून जर तुझी मर्जी असेल, तर तुझें परमधाम जें वैकुंठ, त्यामध्यें तूं आतां प्रवेश करावास आणि चतुर्दश भुवनें व त्यांचे पालक जे आम्ही, त्या वैकुंठदासाचें संरक्षण कृपा करून करावें ॥ २७ ॥

श्रीभगवान् म्हणाले, हे देवाधिपते ब्रह्मदेवा ! तूं जें भाषण केलेंस तें मी मनःपूर्वक ऐकलें तुम्हां देवांच्या विनंतीप्रमाणें तुमचें सर्व कार्य केलें आहे आणि पृथ्वीचा सर्व भार हलका केला आहे ॥ २८ ॥ पण तूं म्हणालास तें जें हें यादवकुल आहे, तें वीर्य, शौर्य आणि संपत्ति यांच्या मोहकारी समृद्धीमुळें उन्मत्त झालें आहे. या यादवांनीं हा सर्व भूलोकच गट्ट करून टाकला असता, पण मी होतों म्हणून त्यांचा प्रतिरोध झाला. समुद्राची मर्यादा समुद्राच्या भरतीचें नियंत्रण करते, त्याप्रमाणें मीं यादवांचें नियंत्रण केलें आहे ॥ २९ ॥

या असल्या उन्मत्त आणि संख्येनें मोठ्या यादवकुलाचा संहार केल्याविना मी निजधामाला गेलों, तर हें उद्दाम कुल मर्यादेचें उल्लंघन करील आणि भूलोकाचा घात करील ॥ ३० ॥ तुला ठाऊकच आहे कीं, या कुलाला ब्राह्मणांनीं शाप दिला आहे व त्याप्रमाणें त्या कुलाच्या नाशाचीं बीजें अंकुराला आलीं आहेत. त्याचा लवकरच नाश होईल. याप्रमाणें हें कुल नष्ट झालें म्हणजे मी वैकुंठाला जातांना हे निष्पाप ब्रह्मदेवा, तुझ्या भुवनाला खास येईन ॥ ३१ ॥

---

**एकनाथ**—यावरतें येथ कांहीं । देवकार्य उरलें नाहीं ॥
यादवकुळ म्हणसी तेंही । नष्टप्राय पाही उरलेंसे ॥ ( २६ )

श्रीशुक म्हणाले, या प्रकारें भगवान् श्रीकृष्ण बोलला, तें स्वयंभु ब्रह्मदेवानें ऐकलें. देवाला ब्रह्मदेवानें नमस्कार केला आणि सर्व देव, यक्ष, किन्नर, गंधर्व, आदित्य, वसु, मरुत यांसह आपल्या भुवनास प्रयाण केलें ॥ ३२ ॥ पुढें लवकरच त्या द्वारकानगरांत मोठमोठाले उत्पात होऊं लागले. हें पाहून भयभीत झालेले सर्व यादव एकत्र झाले. सभा भरली. तेथें श्रीकृष्ण यादवांतील वृद्ध व पोक्त गृहस्थांस उद्देशून म्हणाले ॥ ३३ ॥

श्रीकृष्ण म्हणतात, वृद्ध व संभावित गृहस्थ हो ! तुम्ही पाहतच आहांत कीं चोहींकडून आपल्या येथें उत्पातांनीं भयंकर गर्दी करून प्रलय करण्यास आरंभ केला आहे. हा अपमानिलेल्या ब्राह्मणांनीं दिलेला जो दुर्धर शाप त्याचा परिणाम होय ॥ ३४ ॥ म्हणून मला वाटतें कीं, आयुष्य कायम ठेवावयाचें असेल तर याउपर आतां येथें राहणें अप्रशस्त आहे. वृद्ध तरुण बांधव हो ! आपण सर्वजण आजच प्रभासक्षेत्राला जाण्याची तयारी करावयास लागूं या. आतां उशीर करण्यांत अर्थ नाहीं. प्रभासही फार मोठें व पवित्र क्षेत्र आहे ॥ ३५ ॥

या तीर्थांत स्नान करून आकाशांतील तारकानाथ जो चंद्र तो दक्षशापापासून मुक्त झाला. 'क्षयरोगी हो !', असा दक्ष प्रजापतीनें शाप चंद्राला दिला होता व त्याच्या कला अस्तंगत झाल्या होत्या; पण या तीर्थांत त्यानें स्नान केलें तेव्हां त्याला त्याच्या सोळाही कला पुनः प्राप्त झाल्या ॥ ३६ ॥ आपण तेथें सर्वजण जाऊं, पवित्र तीर्थजलानें पवित्र होऊं, पितरांचें व देवांचें तर्पण करूं, नाना प्रकारच्या सुंदर पक्वान्नांनीं तेथील पांक्त ब्राह्मणांस भोजन घालूं ॥ ३७ ॥ आणि श्रद्धापूर्वक त्या सत्पात्र ब्राह्मणांस चांगली दक्षिणा देऊं. असें पुण्याचें बीज पेरलें म्हणजे जीं मोठीं प्राणघातक संकटें आपणांस भेडसावीत आहेत, तीं सर्व नाहींशीं होतील व आपणही हा अनर्थसागर तरून पैलतीराला सुखरूप जाऊं. समुद्रांत नाव तारिते, त्याप्रमाणें संसारांत पुण्यकृत्यें तारक होतात ॥ ३८ ॥

श्रीशुक सांगतातः—हे कुलभूषण परीक्षिति राजा ! याप्रमाणें भगवंतांनीं उपदेशरूपानें आज्ञा केली. त्याप्रमाणें यादवांनीं प्रभासाला जाण्याचा निश्चय केला आणि त्यांनीं रथांची तयारी केली ॥ ३९ ॥ हे राजा परीक्षिता ! परंतु हा सर्व प्रकार पाहून उद्धव व्याकुलित झाला. तो भगवंताचा अनन्य भक्त होता. त्यानें भगवंताचें भाषण ऐकलेंच होतें व घोर व भयंकर अनर्थ प्रत्यहीं होत आहेत हेंही पाहिलें होतें. ह्या एकनिष्ठ भक्तानें जगन्नायक श्रीकृष्णाला एकांतांत गांठलें, त्याच्या चरणावर मस्तक ठेवून नमस्कार केला, हात जोडले आणि तो म्हणाला ॥ ४० ॥ ४१

उद्धव म्हणतो, देवाधिदेवा! योगेश्वरा ! तुझ्या नामांचें व चरित्राचें श्रवण व कीर्तन पवित्र व पुण्यकारक आहे. भगवन् ! विप्रांनीं यादवकुलाला दिलेल्या शापाचा निरास करण्याला समर्थ असतांही तूं त्याचा निरास केला नाहींस, म्हणून मला वाटतें कीं, या कुलाचा संहार करवूनच मग हा भूलोक सोडून जावें, असा तुझा संकल्प

आहे ॥ ४२ ॥ केशवा ! तुझ्या चरणकमलाचा विरह मला एक क्षणार्ध सुद्धां दुःसह होईल, हें तूं जाणतोसच. म्हणून कृपा कर आणि निजधामाला जाशील, तेव्हां मलाही बरोबर ने ! ॥ ४३ ॥

कृष्णा ! तुझ्या लीला म्हणजे मंगलमूर्तीचा प्रत्यक्ष अवतार होय. त्या लीलांच्या श्रवणरूपी अमृताचा आस्वाद ज्या भक्ताच्या कर्णांनीं घेतला, त्याला दुसऱ्या कशाचीही अपेक्षा उरत नाहीं ॥ ४४ ॥ तूं शयनावर पहुडलास, आसनावर बसलास, फिरूं लागलास, मुक्काम केलास, स्नान करूं लागलास, खेळ खेळण्यास आरंभ केलास, भोजन करूं लागलास म्हणजे तुझी सेवा करण्याचें ज्या भक्तांचें नित्यव्रत आहे, ते आम्ही तुझे भक्त तुला, म्हणजे प्राणाहूनही प्रिय असणाऱ्या अशा आत्म्याला, सोडून जाण्याला कसे समर्थ होऊं ? ॥ ४५ ॥

देवा त्वां उपभोगिलेली माळा, तुझ्यासाठीं सिद्ध केलेलीं सुवासिक गंध, वस्त्रें, अलंकार यांनींच आम्हीं भक्त मंडित होतों. या अलंकारांनीं व तुझ्या पात्रांतील उच्छिष्ट-भक्षणानें मात्र आम्ही मायेचा पराभव करण्यास समर्थ होतों ॥ ४६ ॥ वातांबु म्हणजे वायूचें व जलाचें मात्र भक्षण करून तपश्चर्या करणारे ऋषि, सर्वत्याग करणारे श्रमण, नैष्ठिक ब्रह्मचारी, हे अवघड तपश्चर्या करून व तद्योगें शांत व निर्मळ होऊन ब्रह्मनामक तुझ्या वैकुंठास जातात ॥ ४७ ॥

हे योगेश्वर भगवंता ! हा संन्यासाचा अवघड मार्ग होय; परंतु आम्ही, या भ्रामक संसारामध्यें राहून जर तुझ्या मंगल चरित्राचें श्रद्धेनें श्रवण केलें तर या अति सोप्या भक्ति-मार्गानें आम्हांला हा दुस्तर भवसागर सहज लीलेनें तरून जातां येतो ॥ ४८ ॥ जगताचा उद्धार करणारीं तुझीं कृत्यें, मनाला उत्कृष्ट शांति देणारें तुझें भाषण, गमन, हास्य, अव-लोकन, थट्टा इत्यादि जें जें कांहीं तूं मनुष्ययोनींत जन्म घेऊन मनुष्याचें अनुकरण करण्या-साठीं केलेंस, त्याचें स्मरण-कीर्तन करणाऱ्या आम्हांला संसाराची मुळींच भीति नाहीं. असें जरी आहे तरी पण देवा, तुझा वियोग मला कसा सहन व्हावा ? म्हणून तूं मला घेऊनच निजधामास जा ! ॥ ४९ ॥

---

**टीप**— शयनासनादिकांमध्यें तुझी नित्य सेवाचाकरी करणारे जे आम्ही अनन्य भक्त ते तुला टाकून कसे जिवंत राहतील ? तात्पर्य तुझा विरह आम्हांस सहनच होणार नाहीं ॥ ४५ ॥

---

**एकनाथ**—तुझी क्रीडा नाना खेळ। प्राणियासी परम मंगळ ॥
कर्णद्वारें वेल्हाळ। निजनिर्मळ सेविती ॥ ( ४४ )
आमचा जीवु आणि प्राण। ते तुझे गा श्रीचरण ॥
तें वियोगदुःख साहावया जाण। समर्पण मज नाहीं ॥ ( ४५ )

श्री शुक राजास सांगतात–राजा ! भगवान देवकीनंदनाला याप्रमाणें उद्धवानें नम्र विज्ञापना केली. सेवाभक्ति करणारा उद्धव कृष्णाचा अनन्य भक्त असून देवाला अत्यंत प्रिय होता. उद्धवानें उत्तमोत्तम दास्यभक्ति केली होती. अशा त्या परमप्रिय व एकनिष्ठ भक्ताला समाधान प्राप्त करून द्यावें म्हणून भगवंतांनीं बोलण्यास आरंभ केला ॥ ५० ॥

**एकनाथ—**निजभृत्य म्हणणें । उद्धवासी या कारणें ॥
निजगुज श्रीकृष्णें । त्यासी बोलणें सर्वदा ॥
जेथ रिगमु नाहीं रुक्मिणीसी । ठावो नाहीं वसुदेवदेवकीसी ॥
बळिभद्रा प्रद्युम्नासी । अनवसरू यांसी जे ठायीं ॥
ते ठायीं कृष्णाप्रती । उद्धव असे अहोरातीं ॥
यालागीं पैं एकांतीं । ज्ञाते म्हणती तयासी ॥ (५०)

**सहावा अध्याय समाप्त**

# अध्याय ७ वा

भगवान् म्हणाले, दैवशाली उद्धवा ! तूं म्हणालास तेंच खरें. स्वलोकगमन करण्याचाच माझा संकल्प आहे. शिवाय ब्रह्मा, शंकर, सर्व लोकपाल यांची इच्छा मी निजधामास जावें अशी आहे ॥ १ ॥ देवांनीं जें कार्य मला करावयास विनविलें होतें तें मीं समग्र पार पाडिलें आहे. ब्रह्मदेवानें प्रार्थना केली होती म्हणून तें देवकार्य करण्यासाठीं मी माझ्या एकाच अंशानें अवतीर्ण झालों व हें अवतारकार्य सिद्धीस नेलें ॥ २ ॥

आपलें यादवकुल ब्राह्मणांच्या शापामुळें बहुतेक दग्धच झाल्यासारखें आहे. यादवांमध्यें यादवी ( भावांभावांमध्यें भांडण ) होऊन सर्व कुलक्षय लवकर होईल आणि आजपासून सातव्या दिवशीं ही आपली नगरी समुद्रामध्यें बुडून जाईल ! ॥ ३ ॥ ज्या दिवशीं मी हा लोक सोडून जाईन त्यानंतर लवकरच भूलोकाचें सौभाग्य नष्ट होईल, शिवाय, कलीचा प्रादुर्भाव झाला म्हणजे सौभाग्याची वार्ताही संपेल !' ॥ ४ ॥

याकरितां मी गेल्यानंतर तूं या लोकीं राहूं नयेस. कारण कलियुगांतील लोकांस अधर्माचरण करण्याची भारी आवड असणार, करितां आप्तेष्ट मित्रांवरील तुझें स्नेहयुक्त प्रेम काढून टाक, माझ्या ठिकाणीं आपल्या शुद्ध मनाची स्थापना कर, आपपरभाव मनांत न ठेवतां माझ्यासारखा समदृष्टि हो आणि कुडींत प्राण आहे तोंपर्यंत खुशाल भटकत राहा ! ॥ ५, ६ ॥

इंद्रियांनीं व मनानें तूं ग्रहण करतोस, तें तें विश्वगत सर्व विषयात्मक म्हणजे जड असल्याकारणानें मनोत्पादित आहे, मायामय आहे, नश्वर आहे, असें जाण. येथील वैषम्य मनोनिर्मित आहे, संसारकारी आहे. तूं समदृष्टि झालास म्हणजे ही मनोमय माया नाहींशी होईल ॥ ७ ॥

उद्धवा ! आत्म्याचे ठिकाणीं ज्या पुरुषानें आपलें मन युक्त केलें नाहीं त्यालाच अनेकत्वाचा भ्रम होतो. विहित कर्म कोणतें, अकर्म म्हणजे विहिताकरण कोणतें आणि विकर्म म्हणजे निषिद्धाचरण कोणतें, असा गुणदोषदृष्टि होऊन, हें चांगलें, हें वाईट, अशी भेदबुद्धि तो धारण करतो ॥ ८ ॥ *

**टीप**--' हें विश्व मनोमय आहे, असें कां समजावें ? ' या शंकेला या श्लोकांत उत्तर आहे. या विश्वांत अनेक पदार्थ आहेत म्हणून विश्व हें भेदाचा विषय होय ही समजूत हाच भ्रम होय. या भ्रमामुळेंच विश्वगत पदार्थांत आणि जीवाच्या कर्मांत कोठें

**एकनाथ**--कलि वाटेल अतिविषम । ब्राह्मण सांडितील स्वधर्म ॥
स्वभावें नावडे दानधर्म । क्रियाकर्म दंभार्थ ॥ ( ४ )

म्हणून उद्धवा ! इंद्रियांस व चित्तास माझ्या ठिकाणीं युक्त कर म्हणजे हें सर्व विस्तीर्ण ब्रह्मांड तुझ्या जीवात्म्यामध्यें आहे व तुझा आत्मा माझ्यामध्यें आहे, असें अद्वितीय एकत्वाचें सम्यक्ज्ञान तुला होईल ॥ ९ ॥ याप्रमाणें शास्त्रोक्त ज्ञानाला शुद्ध अनुभवज्ञानाची ( विज्ञानाची ) जोड मिळून जगदात्मा होशील व स्वानुभव झाल्यामुळें ( आत्मसाक्षात्कार झाल्यामुळें ) तुला अखंड समाधान होईल. अर्थात् तुझ्याजवळ विघ्नांची मात्रा चालणार नाहीं ॥ १० ॥

जो प्राणी जीवन्मुक्त आहे, तो गुणदोषांच्या फार पलीकडे गेला असल्यामुळें त्याला विधि किंवा निषेध नसतात. लहान बालकाला तरी विधिनिषेधांची बाधा असते काय? नाहीं. त्याला दोषाची भीति नसते व गुणांची मातब्बरी नसते. ' निषिद्ध आहे ' म्हणूनच योगी चोरी करीत नाहीं असें नाहीं, किंवा विहित आहे म्हणूनच तो दया करतो असेंही नाहीं ॥ ११ ॥

उद्धवा ! जीवन्मुक्त जगताचा मित्र, शांतीचा सागर, ज्ञानविज्ञानांत निपुण म्हणून निःसंदेह असतो. ' हें सर्व ब्रह्मांड एकरस ब्रह्मच आहे. ' हें ज्ञानविज्ञान त्याला असतें म्हणून त्याला जन्ममरणाचा प्रसंग केव्हांही येत नाहीं ॥ १२ ॥

श्रीशुकाचार्य म्हणतात–राजा, हा श्रीकृष्णाचा उपदेश महाभागवत उद्धवानें ऐकला. त्यानें श्रीकृष्णास साष्टांग प्रणिपात केला आणि तत्त्व जाणण्याचा संकल्प मनांत धरून श्रीकृष्णास त्यानें विचारलें ॥ १३ ॥

उद्धव म्हणाला, ' हे योगस्वामी, योगरहस्याच्या निधाना, योगरूपा, योगजनका, मला मोक्षप्राप्ति व्हावी म्हणून तूं मला ' संन्यासरूपी त्याग कर, असा उपाय सांगितलास ॥ १४ ॥ परंतु देवा ! माझ्यासारख्या विषयलोलुपाला असला दुष्कर वासनात्याग साधणें शक्य नाहीं. त्यांतही हे जगदात्मन् , तुझ्याविषयीं ज्याची आदरबुद्धि नाहीं,

---

गुण आहेत, कोठें दोष आहेत, असें आपणांस वाटतें. असें वाटणें हें भ्रमकार्य आहे. आतां ' वेदानेंच कांहीं कर्मे विहित केलें आणि कांहींचा निषेध केला, यावरून वेदालाही भेद वस्तुतः खरा आहे हें मान्य आहे व म्हणून त्यानें विधिनिषेध सांगितले आहेत ' असें म्हणशील; पण तशी वस्तुस्थिति नाहीं. उद्धवा ! अज्ञानामुळें उत्पन्न होणारा जो भ्रम त्यानें विस्तारली आहे गुणदोषबुद्धि ज्यांची अशा पुरुषांच्या उद्धारासाठीं मात्र वेदानें विधि-निषेधांचा अवतार केला आहे. वेदानें करावयास सांगितलें आहे तें **विहित कर्म.** विहित कर्मांचा लोप करणें याला वेद **अकर्म** म्हणतो आणि जें कर्म करूं नये, अशी वेदाज्ञा आहे तें **निषिद्ध** कर्म होय. याप्रमाणें विहितकरण, विहिताकरण आणि अविहितकरण असे तीन भिन्न भिन्न प्रकार वेदानें सांगितले. हे अज्ञानी जीवाच्या कल्याणार्थ मात्र वेदानें भेद सांगितले. तात्पर्य, अविद्या हाच आहे विषय ज्यांचा असे वेद होत किंवा जे अज्ञानी आहेत त्यांच्यासाठीं मात्र उपदेश आहे ज्यांत ते वेद होत ॥ ८ ॥

त्यास तर हा संन्यासयोग स्वप्नांत सुद्धां आवडणार नाहीं. मग साधण्याचें नांव कशाला? ॥ १५ ॥ तुझ्या मायेनें निर्माण झालेल्या देहावर 'हा मी' असा भाव ठेवून अणि त्याच मायेनें उत्पन्न केलेल्या पुत्रमित्रादिकांवर 'हीं माझीं' असा भाव ठेवून मी मूर्ख झालों आहें. तेव्हा अशा माझ्यासारख्या मूर्खाच्या हातून सहज सिद्ध होईल असा एखादा मोक्षदाता योग सांग. मी तुझा दास तुला शरण आलों आहें! ॥ १६ ॥ ×

श्रीकृष्णा! तूं सत्याची मूर्ति आहेस. तूं स्वयंप्रकाश आहेस. तुझ्यासारखा योग्य गुरु मला देवदेवतांत सुद्धां सांपडणार नाहीं. कारण ते सर्व ब्रह्मादि तुझ्या मायेच्या सपाट्यांत सांपडल्यामुळें वेडे होऊन जन्ममरणाच्या प्रवाहांत गटंगळ्या खात आहेत. जगत् सत्यच होय असें मानणारे आहेत. ते मला काय उपदेश करूं शकणार? ॥ १७ ॥

देवा! तूं शुद्ध, बुद्ध, नित्य, मुक्त, अनंत आहेस. दयाळा! या घोर संसाराच्या तापत्रयानें मी पोळून निघालों आहें, निराश झालों आहें. म्हणून तुला शरण येऊन प्रार्थितों तूंच नरनारायण जगन्मित्र, जगदुद्धारक आहेस. तेव्हां मला सुकर होईल असा उपदेश कृपा करून कर, मी एकचित्तानें तो ऐकतों ॥ १८ ॥

श्रीभगवान् म्हणाले उद्धवा! आपण कोण हें विश्व काय, धरावें काय, टाकावें काय, आपला परम पुरुषार्थ कोणता, इत्यादि प्रश्नांचा उलगडा करण्यामध्यें प्रवीण असलेले लोक बहुधा विषयवासनांचा त्याग करून स्वतःच स्वोद्धार करण्याला बुद्धिद्वारें समर्थ असतात ॥ १९ ॥

सर्व जीवांस, पण विशेषतः मनुष्यांस उत्कृष्ट गुरु म्हणजे स्वतःचा आत्माच होय. प्रत्यक्ष आणि अनुमान या प्रमाणांनीं विचिकित्सा करणाऱ्या विवेकी मनुष्याला मोक्षमार्ग ठरवितां येतो ॥ २० ॥

मनुष्ययोनींत जन्मून पुरुषार्थसिद्धीचा संकल्प करणारे सांख्य-पंडित प्रत्यक्षच पाहातात कीं, सर्वशक्तिसंपन्न मी परमेश्वर सर्व विश्वरूप व्यापून उरलों आहें. या विश्वात एक, दोन, तीन, चार पाय असणाऱ्या, अनेक पाय असणाऱ्या, तसेंच मुळींच पाय

---

**टीपः**— भगवंता! तूं ज्याला त्यागादिकांचा उपदेश केलास, तो हा मी अतिशय अज्ञानी आहें. कसा म्हणशील तर पाहा 'हें माझें कलत्र' 'हा माझा पुत्र' आणि 'हा मी' अशा प्रकारें सानुबंध म्हणजे पुत्रकलत्रांसहित तुझ्याच मायेनें रचिलेल्या या देहामध्येंच मी निमग्न होऊन गेलों आहें. देवा, म्हणून तूं मला असा उपदेश कर कीं, त्या तुझ्या उपदेशानुरूप वागण्याला मला मुळींच पंचाईत पडणार नाहीं. तात्पर्य मला सहज साधेल अशा कर्माचा कृपा करून उपदेश कर! ॥ १६ ॥

---

**एकनाथ**—सांडूनि अशुभ वासना। जो न करी विषयकल्पना॥
तो आपुला गुरु आपण जाणा। नरकयातना चुकविली॥ (२०)

नसणाऱ्या अनेक योनि आहेत. त्यांत मनुष्ययोनि मला अत्यंत प्रिय आहे कारण या योनींतच जीवाला स्वोद्धार करून मतवरूप होतां येतें ॥ २१, २२ ॥

या मानवयोनींत राहणारे स्थिर मनाचे एकनिष्ठ विद्वान् पुरुष अनुमानप्रमाणाच्या साहाय्यानें ईश्वराचें म्हणजे माझें म्हणजे आत्म्याचें स्वरूप निश्चित करूं शकतात. गुण व लिंग ( चिन्ह ) ही अनुमानप्रमाण ठरविणारीं जीं साधनें त्या साधनांच्या द्वारें मला शोधून काढण्याचा प्रयत्न करतात ॥ २३ ॥

उद्धवा ! प्रत्यक्ष आणि अनुमानप्रमाणांच्या साहाय्यानें अवधूताला आत्मस्वरूप ठरवितां आलें व ती आपली कथा त्यानें यदुराजास सांगितली. " अवधूतगीता ' असें या संवादरूपी कथेला म्हणावें ॥ २४ ॥ यदुराजानें निर्भय अवधूतास पाहिलें. अवधूत तरुण होता, तरी ज्ञानसंपन्न आणि विरक्त होता. त्यानें त्या ब्राह्मणाला वंदन करून प्रश्न केला ॥ २५ ॥

यदुराज म्हणाले, हे बालमुने ! या जगांत ' मला दीर्घायुष्य असावें, माझी कीर्ति व्हावी, मला संपत्ति मिळावी ' हाच पुरुषार्थ साधणारीं माणसें दिसतात. धर्म, अर्थ, काम साधावे, हाच बहुतेक लोकांचा मनोरथ असतो; पण तूं मात्र लोकोत्तर दिसतोस. तुझें कर्मसामर्थ्य, बुद्धिसामर्थ्य, तुझी दक्षता, तुझी तेजस्विता, तुझें मधुर भाषण, सर्व बिलक्षण आहे असा बुद्धिसंपन्न व शक्तिसंपन्न असूनही तूं असा निष्कर्मा, निरिच्छ कसा ? सर्व लोक कामक्रोधादि राजस विकारांच्या असह्य तापानें पोळत असतां तूं असा शीतल जलांत स्नान करणाऱ्या गजाप्रमाणें शांत कसा ? हे महाभागा, तेव्हां कृपा करून मला सांग कीं, जीवन्मुक्ति सिद्ध करणारा जो तुझा समाधानी आनंद आहे, त्याचें कारण काय ? ॥ २६–३० ॥

भगवान् म्हणाले उद्धवा ! मोक्ष इच्छिणाऱ्या त्या बुद्धिवान् विनीत राजाचा प्रश्न ऐकून प्रसन्न झालेला अवधूत राजास सांगता झाला ( हा भाग अवधूतगीता म्हणून प्रसिद्ध आहे ) ॥ ३१ ॥

---

**एकनाथ**— येऊनि नरदेहाप्रती । कर्त्याची गवेषणा जे करिती ॥
ईश्वर त्रिजगतीं । उत्पत्तिस्थितिसंहारकर्ता ॥
ऐशा नानापरींच्या अनुमानां । मी तंव वश नव्हे जाणा ॥
जे लक्षिती सांडोनि अभिमाना । साक्षात्पणा ते येती ॥ ( २३ )

**एकनाथ**—दिसतोसी सर्वांथी कुशळ । परी कांहीं न करूनि निश्चळ ॥
अकर्तात्मबोधें तूं केवळ । जैसें बाळ अहेतुक ॥
तूं बाला ऐसा वर्तसी । परी बालबुद्धी नाहीं तुजपासीं ॥
सर्वज्ञ सर्वथा होसी । ऐसें आम्हांसी दिसतसे ॥ ( २६ )

अवधूत म्हणाले:—राजा, प्रत्यक्ष आणि अनुमानांप्रमाणांची विचिकित्सा करणाऱ्या माझ्या बुद्धीनें मला मोक्षमार्गी चोवीस गुरु दाखविले. त्यांचें प्रत्यक्ष उदाहरण पाहून व त्यांच्या वर्तनावरूनच अनुमानें काढून मी निःसंग होऊन समाधानानें सर्व पृथ्वीवर भ्रमण करतों ॥ ३२ ॥

अवधूत म्हणतात— हे राजा ! पृथ्वी, वायु, आकाश, जल, अग्नि, चंद्र, सूर्य, कपोत, अजगर, समुद्र, पतंग, मधमाशी, हत्ती, मध हरण करणारा, हरिण, मासा, पिंगला वेश्या, कुरर, बाल, कुमारी, बाण करणारा, साप, कांतीण आणि भिंगुरटी असे हे माझे चोवीस गुरु होत ॥ ३३ ॥ ३४ ॥ यांतील प्रत्येकाचें वर्तन पाहून त्यांच्या द्वारा मला उपयोगीं पडणारे वर्तनाचे धडे मी शिकलों, नहुष राजाच्या पौत्रा त्यांजपासून मीं जें शिक्षण घेतलें आहे तें हे बाघासारख्या शूर राजा ! तुला सांगतों. तूं नीट समजून घे ॥ ३५ ॥ ३६ ॥

मायेच्या अथवा निसर्गाच्या नियमानुसार वागणाऱ्या पंचमहाभूतांनीं सतावून सोडलें तरी क्षमावृत्ति धारण करून आपला ठरलेला मार्ग योगी सोडीत नाहीं. स्वमार्ग न सोडणें हा नियम मी पृथ्वीपासून शिकलों. भूतांचें वर्तन बुद्धिपुरःसर नसून ती माया नेईल तिकडे जातात हें ज्याला समजतें तोही पृथ्वीप्रमाणेंच आपला ठरलेला मार्ग सोडीत नाहीं ॥ ३७ ॥ आणखी, पृथ्वीचाच भाग असणारे पर्वत व वृक्ष हे सर्वदा परकार्यासाठीं जगतात व कर्म करतात हें पाहून मीं परोपकारी व क्षमाशील पृथ्वीला गुरु केलें ॥ ३८ ॥ *

वायु दोन प्रकारचा; एक प्राणवायु आणि दुसरा बाहेर वावरणारा वायु. प्राणाचें संरक्षण मात्र होईल इतकेंच आहारविहारादि उपभोग प्राण स्वीकारतो. इंद्रियांची आवडनिवड तो बघत नाहीं. इंद्रियांची, मनाची आवड बघितली, त्यांच्या आवडीप्रमाणें आहारादि सेवन केलें असतां ज्ञाननाश व मनोविक्षेप होतो. म्हणून प्राण इंद्रियांची प्रियाप्रियता बघत नाहीं प्राणरक्षक आहार मात्र प्राणवायु घेतो. तसेंच मीही करतों. बाह्य वायूपासून मी शिकलों कीं नाना धर्म असणाऱ्या विषयांमध्यें शिरूनही विषयाच्या गुण-

---

**टीप**—जी पृथ्वी पर्वतरूपानें व वृक्षरूपानें असते, तिच्यापासून कोणता बोध घेतला तें या श्लोकांत अवधूत सांगतो. शश्वत् = सर्वकाळीं सदा सर्व काळ दुसऱ्यांवर उपकार करण्याचीच ज्याची प्रत्येक इच्छा असते आणि दुसऱ्यांसाठींच ज्याची उत्पत्ति निश्चितपणें असते त्या पर्वतापासून परोपकार इच्छिणें व परोपकार करणें हे बोध मी घेतले. पाहा कीं, त्या पर्वतावर असणारे वृक्ष, तेथें उगवलेलें गवत, त्यावरून वाहणाऱ्या नद्या इत्यादि पर्वतानें उत्पन्न केलेल्या ज्या सर्व वस्तु, त्याचीं कर्मे सर्वथा दुसऱ्यांसाठीं असतात, त्याप्रमाणें माझ्या क्रिया व माझें अस्तित्व परोपकरासाठींच मात्र असावें, हा बोध मीं घेतला. तसेंच वृक्षाचेंही शिष्यत्व मीं पत्करिलें. म्हणजे वृक्ष पराधीन असतो, तसा मीही पराधीन म्हणजे दुसऱ्यासाठीं जगणारा व दुसऱ्यासाठीं काम करणारा झालों ॥ ३८ ॥

दोषांनीं वायु जसा लिप्त होत नाहीं, तसेंच आपण देहामध्यें राहूनही देहगुणांपासून अलिप्त राहावें. वायु पुष्पगंधाला आश्रय देतो, तरी स्वतः लिप्त होत नाहीं. हा निर्लेपपणाच गुण वायूपासून आत्मवेत्ता घेतो व विश्वांत संचार करतो ॥३९–४१॥

सर्व चरचराचे आंत व बाहेर व्यापून असणारें अनंत नभ म्हणजे आकाश असंग असतें. याचप्रमाणें सर्वांतर्यामीं असून सर्व विश्व व्यापणारा परमात्मा आपणच आहों अशी समन्वयानें ब्रह्मात्मैक्यभावना करून नभाप्रमाणें निःसंग राहावयास मी शिकलों. उदाहरणार्थ, वायूनें प्रेरिलेले मेघ आकाशाला स्पर्श करीत नाहींत त्याप्रमाणें कालोदरांत उत्पन्न झालेले तेच –जल पृथ्वीमय पदार्थ ज्ञानी पुरुषाला–आत्म्याला स्पर्श करूं शकत नाहींत. तात्पर्य आत्मा असंग आहे हें मी आकाशापासून शिकलों × ॥ ४२ ॥ ४३ ॥ जल हें स्वरूपतः स्वच्छ, अकठोर, मधुर आणि तीर्थ म्हणून शुद्ध करणारें आहे. मुनीनें निर्मळ, दयाशक्ति मधुर आणि पवित्र असावें, हें मी जलापासून शिकलों ॥ ४४ ॥

अग्नि हा तेजस्वी शीतनिवारक, अजित, उदरच ज्याचें भक्षणपात्र असतें असा तो अग्नि वाटेल तें खातो तरी निर्मळ असतो तो केव्हां गुप्त व केव्हां प्रगट असतो, कल्याणेच्छु

---

× **टीप**–आकाशस्वरूपापासून दोन अनुमानें काढून आत्मस्वरूप ठरविण्याचा यत्न केला तो कसा, हें ४२ , ४३ श्लोकांत आहे. विचार करून मनन करणारा जो मुनि, त्यानें नित्य अशी भावना करावी कीं, यद्यापि मी म्हणजे माझा जीव देहाच्या अंतर्भागीं वास्तव्य करितो, तथापि तो देहाशीं संयुक्त न होणारा म्हणजे असंग आहे आणि हा देह माझ्यामध्यें शिरूं शकत नाहीं म्हणून मी अव्यवच्छिन्न, अविभाज्य आहें ही भावना करण्याला गमक काय ? पाहा कीं, सर्व चराचरांत ज्याचा समन्वय आहे जेथें चराचर आहे तेथें आत्मा असतो. असा तो आत्मा सर्वव्यापीच असला पाहिजे. माळेच्या मण्यांत सूत्राची व्याप्ति, समन्वय असतो त्याप्रमाणें नव्हे तर हा आत्मा सर्वगत, अंतर्बाह्य सर्वत्र भरलेला आहे· हें कसें समजावें ? ‘ तत् त्वं असि ’–‘ तें ब्रह्म तूंच जीवात्मा आहेस ’ असें श्रुतीचें महावाक्य आहे, त्याच्या आधारानें माझें स्वरूप म्हणजे आत्मा ब्रह्म आहे अशी भावना दृढ केली म्हणजे आत्मा सर्वगामी आहे हें समजतें व तें तसें समजलें म्हणजे तो असंग व अविभाज्य आहे अशी संभावना करितां येते ॥ ४२ ॥

---

**एकनाथ**—पवित्र व्हावया प्राणियांसी । तीर्थीं तीर्थत्व उदकासी ॥
इतुकीं लक्षणें योगियासी । अहर्निशीं असावीं ॥
उदकीं रिघाले जे समैळ । ते स्वभावें करी निर्मळ ॥
परी न धरी अहंबळ । जे म्यां हे मळ क्षाळिले ॥ ( ४४ )

---

* **नभोवत् विततस्य** ’ हा विजयध्वजी पाठ बालबोध आहे.

याची उपासना करतात आपले भक्त जें काय देतील तें भक्षून तो भक्तांचीं पातकें जाळून भस्म करतो. भक्त जें अर्पण करतील तत्स्वरूप अग्नि होतो. ज्ञानी मुमुक्षूनें हें अग्निव्रत धारण करावें म्हणजे तेजस्विता, परपीडानिवारकता, निर्मूढता, परिग्रहशून्यता, निर्मलता, लोकसंग्राहकता, पावकता, सर्वांतर्यामिता हे गुण जीवन्मुताचे ठिकाणीं असतात. मुमुक्षूनें हे गुण अग्नीपासून घ्यावे. मीं घेतले आहेत ॥ ४५ ॥ ४६ ॥ ४७ ॥

चंद्रकला वाढतात, कमी होतात. ही वृद्धिक्षयाची अवस्था कलांची आहे, चंद्राची नव्हे. जन्म, अस्तित्व, वृद्धि, तारुण्य, वार्धक्य, मरण हे सहा विकार देहाचे आहेत, आत्म्याचे नव्हेत. हें चंद्र स्वतःच्या उदाहरणानें मला शिकविता झाला * ॥ ४८ ॥

---

**टीप**—जीवात्म्याला उच्च नीच भाव असतातसें दिसतें; परंतु ते भाव म्हणजे त्या अवस्था स्वरूपतः आत्म्याच्या नसतात, देहोपाधींमुळें आत्मा लहान-मोठा, ज्ञानी-अज्ञानी, दुष्ट-सुष्ट दिसतो ही आत्मनिर्गुणत्वाची संभावना [ अनुमानजन्य कल्पना ] अग्नीच्या दृष्टांतानेंही स्थापित करतां येते हें येथें दाखवावयाचें आहे. स्वमायया म्हणजे आपण स्वतःच उत्पन्न केलेल्या अविद्येनें उत्पन्न केलेलें. काय उत्पन्न केलेलें ? तर सत् म्हणजे सात्त्विक. सात्त्विक आहे लक्षण ज्यांचें असे देव आणि असात्त्विक लक्षणाचे पशुपक्ष्यादि हीं रूपें म्हणा अथवा विप्र म्हणजे जे ज्ञानी तेच नर व शूद्र म्हणजे अज्ञानी मात्र पुरुष यांचीं रूपें म्हणा. हीं रूपें आत्मा घेतोसा दिसतो. स्वरूपतः आत्म्याचीं हीं रूपें नव्हत. तो स्वरूपतः अरूप आहे. ४५, ४६, ४७ या तीन श्लोकांतील अग्नीचे तेजस्विता, परिग्रहशून्यता सर्वभक्षकत्व, पराधीनत्व, मलविनाकत्व प्रगट-अप्रकटत्म यदृच्छालाभत्व, पापहारकत्व, उपाधिजन्यरूपकत्वप्रभृति गुण मुमुक्षूनें शिकावे; मी शिकलों. मुनीचे हेच गुण असतात. आत्मा असंग निर्विकार शुद्ध अरूप आहे हें अग्नीच्या दृष्टांतावरून समजतें. श्रुति तर सांगतेच ; पण अनुभवानें व अनुमानानेंही हें ठरवितां येतें ॥ ४७ ॥

---

**टीप**— जीवात्म्याला उत्पत्ति अस्तिता इत्यादि सहा अवस्था नसतात. ही संभावना चंद्राच्या दृष्टान्तानें अनुमानितां येते, हें या श्लोकांत सांगितलें. विसर्ग म्हणजे जन्म, श्मशान म्हणजे नाश मृत्यु जन्ममरणादि कोणताहि विकार आत्म्याला दूषित करूं शकत नाहीं याला दृष्टांत चंद्राचा. चंद्राला कळा लागतातसें दिसतें, परंतु त्या चंद्राच्या अवस्था नव्हेत. चंद्राला कळा लागतातसें दिसतें तें कां याचा उलगडा करणारी ज्योतिःशास्त्राची सरणी पाहा. चंद्र हें आप्य म्हणजे जलाचें मंडल आहे व सूर्य तेजोमंडल होय. हीं दोन्ही मंडलें म्हणजे चंद्र सूर्य हे एकाच नक्षत्राला आले म्हणजे आपणांला चंद्र दिसत नाहीं.

---

**एकनाथ**—अग्नीसी जेवीं मुखचि पात्र । तैसें योगियासी उदर मात्र ॥
ठेवा ठेवणें विचित्र । नाहीं पात्र गांठीसी ॥
अग्नींत पडलें जें समळ । तें अग्निमुखें होय निर्मळ ॥
योगिया जें सेवी अळुमाळ । परम मंगळ तें होय ॥ ( ४५ )

अग्नीच्या ज्वाळांचा किंवा दीपशिखेचा क्षणोक्षणीं उत्पत्तिविनाश होत असतांही रूपांतरें दिसत नाहींत. ज्वाळा नित्य वाढतात. त्याप्रमाणें पंचमहाभूतांचा व तद्रचित जगाचा क्षणोक्षणीं उत्पत्तिविनाश नित्य होत असतांनाही तो दिसत नाहीं. तात्पर्य, कालाच्या ओघात इकडे तिकडे भटकणारें हें सर्व विश्व क्षणभंगुर असताही नित्य वाटतें. हा भ्रम आहे, हें मी अग्नीपासून शिकलों ॥ ४९ ॥

गो म्हणजे किरण त्यांचा पति ( गोपति ) तो सूर्य हा सूर्य किरणांनी आणलेल्या 'गां' चा म्हणजे जलांचा स्वीकार यथाकालीं करून त्यास योग्य वेळीं टाकून देतो;

---

कारण आपली दृष्टि आणि सूर्यमंडळ एकाच रेषेमध्यें असल्यामुळें सूर्य आपणां जीवांच्या व चंद्राच्या मध्यें येतो आणि चंद्र दिसत नाहीं. ही स्थिति ज्या दिवशीं येतें त्या दिवसाला अमावास्या म्हणतात. आतां एक नक्षत्र सोडून त्याच्यापुढील दुसऱ्या नक्षत्रापर्यंत जाण्याला चंद्राला साठ घटका लागतात; परंतु तितकेंच लांब जाण्याला सूर्याला तेरा अहोरात्रि लागतात. अर्थातच चंद्राच्या पाठीमागें राहिलेल्या सूर्यमंडळाचा $\frac{१}{१५}$ वा भाग चंद्रमंडलांत म्हणजे जलमंडलांत प्रतिबिंबित होतोसा दिसतो. या प्रतिबिंबित झालेल्या चंद्रमंडलाच्या भागाला '**कला**' असें म्हणतात. याप्रमाणें १५ व्या दिवशीं १३ नक्षत्रांच्या अंतरा-इतकें सूर्यचंद्रामध्यें अंतर पडतें. आकाशांतील राशिचक्रांत सत्तावीस नक्षत्रें आहेत, हें प्रसिद्ध आहे. तेव्हां उभयतांमध्यें १३ नक्षत्रांचें अंतर पडतें. तेव्हा उभयतांहीं एकमेकांच्या समोर येतात. म्हणजे उभयतांमध्यें १८० अंशांचें अंतर असतें. म्हणजे आमोरासमोर असणाऱ्या सूर्यमंडळाचें पूर्ण प्रतिबिंब चंद्रमंडलात पडलेसें आपल्यास दिसतें; पण त्याच वेळीं पृथ्वीची छायाही प्रतिबिंबांत असते. याप्रमाणें पृथ्वीच्या छायेनें अलंकृत [ लांच्छित ] सूर्यप्रतिबिंबित चंद्रमंडल पूर्ण प्रकाशित दिसतें तें वर सांगितलेल्या पंधराव्या दिवशीं. या दिवसाला पौर्णिमा म्हणतात. या पौर्णिमेच्या दिवशींच १६ कलांचा चंद्र असतो. कारण अमावास्येचेंही प्रतिबिंब चंद्रमंडलांत असतें अशी भावना करून चंद्राला १६ कला आहेत, असें म्हणतात. पौर्णिमेनंतर पुनः चंद्रसूर्यांचा स्थानभेद झाला म्हणजे उलट रीतीनें प्रतिपदेपासून पुढें सूर्याचें तेजःप्रतिबिंब कमी कमी होत जातें आणि अमावास्येला पुनः सूर्यचंद्र एका स्थानीं आलेले दिसतात. प्रतिबिंबाच्या कमी कमी होत जाणाऱ्या कलांस त्यांचा ऱ्हास किंवा क्षय म्हणतात. असो; तेव्हां हा प्रतिबिंबाचा वृद्धिक्षय चंद्राचा नाहीं, कलांचा आहे. तसेंच, जन्मादि विकार देहाचे आहेत, आत्म्याचे नव्हेत हें शिक्षण मीं चंद्रापासून घेतलें ॥ ४८ ॥

---

**एकनाथ**—शुक्लकृष्णपक्षपाडी । चंद्रकळांची वाढीमोडी ॥
ते निजचंद्रीं नाहीं वोढी । तैशी रोकडी योगियां ॥
जन्मनाशादि षड्विकार । हे देहासीच साचार ॥
आत्मा अविनाशी निर्विकार । अनंत अपार स्वरूपत्वें ( ४८ )

जलांनीं संपृक्त होत नाहीं. योगी मुमुक्षूनें असेंच करावें. इंद्रियांस भोग मिळाले म्हणून आनंदूं नये, गेले म्हणून खिन्न होऊं नये ॥ ५० ॥ आणखी, सूर्यावर ढग येऊन त्यात तो प्रतिबिंबित झाला असतां निरनिराळ्या आकाराचा दिसतो. सूर्य अनेक आकारांचा आहे ते आकार नित्य आहेत असें मंदमतींना वाटतें. पण स्वरूपतः सूर्य एकच असतो उपाधींमुळें निरनिराळा वाटतो, उपाधींचे गुण त्यांत आहेत असें दिसतें. हा भ्रम होय. तात्पर्य, सूर्य जसा निर्विकार, असंग आहे, तसा आत्मा आहे, हेंच मुमुक्षूनें शिकावें. मी हें शिकलों ॥ ५१ ॥ कोणावर अतिस्नेह करूं नये. फाजील प्रेम करणारे मंदमति कपोताप्रमाणें संतापास प्राप्त होतात ॥ ५२ ॥

अवधूत म्हणाले, राजा ! एक कपोतकपोतींचें जोडपें होतें. त्यांचें परस्परांवर उत्कृष्ट प्रेम असे. तें सर्वदा एकत्र वास्तव्य करीत व एकत्र संचार करीत व एकमेकांस तीं उभयतां कष्ट घेऊनही स्वसुखार्थ सुख देत असत. अशा स्थितींत ती कपोती पहिल्यांदाच गर्भवती झाली. तिच्यावर आसक्त असलेल्या कपोतानें तिचे सर्व लाड पुरविले. तीही हास्य, रति, विनोदांनीं त्या इंद्रियवश कपोताचें चित्तरंजन करी. कपोतीनें घातलेलीं अंडीं त्यांनीं उबविलीं. पुढें त्या अंड्यांतून हरिमायेच्या अघटित करणीनें पिलें बाहेर पडलीं. तेव्हां तेथें हजर असणाऱ्या कपोताला व त्याच्या मादीला फारच हर्ष झाला. त्याचें वर्णन काय करावें ? हळूहळू त्यांस पंख फुटले. त्यांचें इकडे तिकडे वागडणें, त्यांची किलबिल इत्यादि बाललीलांनीं त्या जोडप्याचा आनंद दिवसेंदिवस वाढतच गेला. अर्थात् त्यांची पुत्रांवरील माया वाढत गेली. बालकांचें पोषणही त्यांनीं उत्कृष्ट केलें. पिलांनींहीं माता-पितरांवर प्रसन्न होऊन उभयतांचे पांग फेडले ॥ ५३-६१ ॥

नित्याप्रमाणें एकदां आपल्यास भक्ष्य आणण्यासाठीं तीं दोघेंजण अरण्यांत गेलीं. तेथें त्यास बराच वेळ लागला. इकडे तीं पिलें एकटींच आपल्या घरट्याच्या आजुबाजूला फिरतांना एका पारध्यानें पाहिलीं. त्यानें जाळें टाकलें. पिलें त्या जाळ्यांत अडकलीं ! पुढें लवकरच तीं कपोत व कपोती पिलांसाठीं चारा घेऊन झपाट्यानें परत आलीं. पुत्रांस खाद्य द्यावें, म्हणून तीं दोघें आतुर झालीं होतीं. तीं झपाझप घरट्यापाशीं आलीं ॥ ६२,६३,६४ ॥

पण पाहतात तों काय ? प्राणाहूनही प्रियकर असणारीं तीं पिलें पारध्याच्या जाळ्यांत सांपडलीं आहेत ! हा प्रकार पाहून त्या उभयतांस परमावधीचें दुःख झालें. त्यांतही मादीला तर मातृप्रेमानें जास्तच दुःख झालें. मायेनें बद्ध झालेली ती कपोती वेडी झाली. तिला पुत्रविरह सहन होईना. ती रडली, ओरडली आणि शेवटीं तिनें जाळ्यांत उडी टाकली ! पिलांजवळ ती मादी गेली आणि कैदेंत पडली. हा प्रकार पाहतांच कपोताच्या हृदयानें ठाव सोडला. तो मनस्वी विलाप करूं लागला ! माझी गृहधर्मचारिणी भार्या गेली ! ज्यांच्यासाठीं प्राणाला गहाण ठेवून मीं खस्ता खाल्ल्या तीं पिलेंही गेलीं ! ॥ ६५,६६,६७ ॥

हर हर ! देवा, किती मी अभागी ! इतके दिवस संसार केला, पण तृप्त झालों नाहीं. धर्म, अर्थ, काम साध्य करून देणारें माझें घरच आज बसलें ना ? किती तरी गोष्टी मला करावयाच्या होत्या. मी अकृतार्थ ! माझी पतिव्रता भार्या मला एकट्याला मागें ठेवून गेली ना ! पिलांसह ती स्वर्गास जाईल. तेव्हां फुटक्या कपाळाचा मी मागें कशाला राहूं ? असें विलपत, राजा ! त्यानें जाळ्यांत उडी टाकली ! काय चमत्कार आहे पाहा. तीं जाळ्यांत सांपडून मरणाच्या दारांत उभीं राहिलेलीं व धडपड करणारीं बायकामुलें प्रत्यक्ष पाहात असतांही त्या मंदबुद्धीनें त्या मारक जाळ्यांत उडी टाकली ! कोण आसक्ति ही ! कोण अज्ञान हें ! कोण विचित्रता ही मायाविलासाची ! ॥ ६८–७१ ॥

असो. त्या पारध्याला हर्ष झाला. आपल्या बायकापोरांसाठीं तो पारधी हें आयतेंच सांपडलेलें घबाड संपादून घरीं गेला. कपोताचें उदाहरण पाहून त्या लुब्धकाला अतिस्नेहाचा वीट आला नाहीं ! तात्पर्य हें, ज्याचा आत्मा अशांत आहे, पुत्रकलत्रांच्या संगतींतच जो सुख मानणारा आहे, कुटुंबपोषण हाच अंतिम पुरुषार्थ असें ज्याला वाटतें, तो गृहस्थाश्रमी पुरुष त्या कपोताच्या सर्व कुटुंबाप्रमाणें सर्वनाश पावतो. राजा ! मोक्षाचा दरवाजा खुला करण्याचें सामर्थ्य ज्या मनुष्यजन्मांत आहे, असा मनुष्यजन्म सुदैवानें प्राप्त झाला असतां, जो पुत्रकलत्रांवर मात्र आसक्त राहिला, त्याचा केव्हां तरी त्या कपोताप्रमाणें नाश होईल ! अशालाच ‘ आरूढच्युत’ म्हणजे ‘ पढतमूर्ख ’ हें नांव शोभतें ॥ ७२,७३,७४ ॥

## सातवा अध्याय समाप्त

# अध्याय ८ वा

राजा ! स्वर्गामध्यें काय किंवा नरकलोकीं काय, कोणतेंही इंद्रियजन्य सुख दुःख-प्रदच असतें. शिवाय, दुःखाप्रमाणेंच सुखही न बोलावतां येत असतें. म्हणून शाहण्या पुरुषानें इंद्रियजन्य सुखाची इच्छा करूं नये व तदर्थच प्रयत्नही करूं नये ॥ १ ॥ यदृच्छेनें हाताशीं आलेलें भक्ष्य गोड असो वा नसो, थोडें असो, बहुत असो, स्वस्थ पडलेला अजगर समाधानानें त्याचा स्वीकार करतो. नाहींच कांहीं मिळालें तर तो स्वस्थ पडून राहतो. उपाशी असतो, पण अजगर स्वतः उठून कधीं भक्ष्य मिळवीत नाहीं. दैव देवो वा न देवो, अजगर स्वस्थ. भोगासंबंधानेंही निरलस. उदासीनता मी अजगरापासून शिकलों ॥ २ ॥ ३ ॥ इंद्रियें सतेज असून, मनःशक्ति व शारीरिक शक्ति खंबीर असूनही मुमुक्षु इंद्रियशांतीसाठीं कांहींएक न करतां अजगरासारखा स्वस्थ पडून राहतो; पण झोंप घेत नाहीं. मुनि आत्मध्यानांत निमग्न असतो ॥ ४ ॥

समुद्र सर्वदा प्रसन्न, गंभीर, इंद्रियांस अगोचर, दुस्तर, अनंत, अपार, निर्विकार शांत असतो. नद्यांच्या पुरांनीं समुद्रांत कितीही पाणी ओतलें म्हणून तो आपली सीमा ओलांडित नाहीं. उन्हाळ्यांत नद्या शुष्क झाल्यामुळें समुद्रांत पाणी आलें नाहीं, तरी तो रोडावत नाहीं. राजा ! नारायणभक्त असणारा मुनि समुद्राचे गुण घेऊन शांत, गंभीर, प्रसन्न, निर्विकार, मोहाला बळी न पडणारा संपत्तीनें न फुगणारा, विपत्तीनें न खंगणार, असतो. सारांश समुद्रानें मला हे गुण शिकविले ॥ ५ ॥ ६ ॥

दीप-प्रकाशाचें सौंदर्य पाहून पतंग दिव्यावर झडप घालतो व मरतो. स्त्रियांचें सौंदर्य व त्यांचे हावभाव पाहून लुब्ध होणारा कामवश कामुक भुलतो व फसतो. पतंगाचा नाश पाहून मी प्रमोहक स्त्रीसौंदर्य, त्यांचे अलंकार, हावभाव इत्यादि अवलोकनांचा त्याग केला. सुंदरतेला भुलूं नये ही शिक्षा मीं पतंगापासून घेतली ॥ ७ ॥ ८ ॥

---

**टीप**——नेत्राचा विषय रूप, नासिकेचा विषय गंध, त्वचेचा स्पर्श, कर्णाचा विषय शब्द आणि जिव्हेचा विषय रस. या पांच इंद्रियांच्या अनुक्रमें पांच विषयांनीं प्रत्येकशः मोह घालून पतंग, भृंग, गज, हरिण आणि मत्स्य या पांच जातींच्या प्राण्यांचा नाश करितात. म्हणून त्या ह्या विषयामध्यें आसक्त होऊं नये असें या पांच प्राण्यांनीं मला शिकविलें. ते हे माझे पांच गुरु होत. म्हटलें आहे—" एकएकच विषयानें आपल्या इंद्रियास भुलवून एकएक प्राणी प्रत्येकीं मारला आहे; पण भ्रांत झालेला मनुष्य पांचही इंद्रियांनीं

---

**एकनाथ**——अजगरासी बळ उदंड । देहो पराक्रमें प्रचंड ॥
परी न करी उद्योगाचें बंड । पसरूनी तोंड पडिलासे ॥ ( ४ )

मधुकर फुलांतील मधाचा एक एक ( कण ) थेंब मात्र घेतो; पण तो कोणत्याही फुलाला दुखवीत नाहीं. हा अल्पसंतुष्टपणाचा गुण मीं मधुकरापासून घेतला. देह आहे तोंवर मी अल्पसंतुष्टच राहणार ॥ ९ ॥ त्याचप्रमाणें पुष्प लहान असो, मोठें असो, मधुकर त्यांतून सार तेवढें काढून घेतो. मुनीनेंही असेंच करावें. शास्त्र लहान असो, मोठें असो. त्यांतून सार जें असेल तेवढेंच घ्यावें; फल्गूकडे दुर्लक्ष करावे ॥ १० ॥

भविष्यकाळासाठीं मधुमक्षिका मधाचा संग्रह करते, पण अखेरीला फसते. कोणी तरी तिच्या संग्रहावर हल्ला करतो आणि तिला ठार करून तिचा संग्रह घेऊन जातो ! मुनीनें दुसऱ्या दिवसासाठीं फार तर काय, पण संध्याकाळासाठींसुद्धां कांहीं शिल्लक ठेवूं नये. त्याजवळ भांडें सुद्धां असूं नये. करतलभिक्षा ( तळहातावर राहील इतकीच भिक्षा त्यानें घ्यावी. कांहीं मुनि तर उदर ( पोट ) हेंच भांडें करतात. म्हणजे एका भुकेपुरती भिक्षा मागतात; तात्पर्य संग्रह करीत नाहींत. मधमाशीच्या उदाहरणावरून मी ' संग्रह न करण्याचें व्रत ' घेतलें ॥ ११ ॥ १२ ॥

लांकडाच्या हत्तिणीला फसून वनहत्ती तिच्याशीं अंगसंग करतो आणि बंदींत सांपडतो. म्हणून प्राज्ञ मुनीनें लांकडाची बाहुली सुद्धां हातात घेऊं नये किंवा पायानें स्पर्शूं नये. स्त्री म्हणजे प्रत्यक्ष मृत्यु होय. स्त्रीसंगति केली कीं, संगति करणाराला दुसरे कामुक ठारच करतात ! गजाचें उदाहरण प्रत्यक्ष आहे. सारांश, स्त्रीसंग घातकी हें मीं हत्तीपासून शिकलों ॥ १३ ॥ १४ ॥

कृपण कष्ट सोसून धनसंग्रह करतो. तो कोणाला कांहीं देत नाहीं; स्वतःही उपभोग घेत नाहीं ! पण परिणाम काय ? दुसराच कोणी चोर अथवा राजा तें धन घेऊन जातो. मधाचीं पोळीं धुंडणारा भिल्ल, मधमाशांनीं न खातां व न देतां जमविलेलीं मधाचीं पोळीं लुटून नेतो हें मीं पाहिलें; आणि आपल्यास मिळालें असेल, त्यांतील कांहीं भाग

---

पांचही विषयांचें यथेच्छ सेवन करितो ! तेव्हां तो कसा बरें विनष्ट होणार नाहीं ? " सारांश या श्लोकांत रूपाच्या सुंदरतेनें मुग्ध झालेल्याचा नाश होतो हें सांगितलें आहे. श्लोकांतील तत् म्हणजे तिच्या, स्त्रीच्या हावभावांनीं प्रलोभित म्हणजे कामोत्सुकतेनें मूर्ख झालेला ॥ ७ ॥

**टीप**—मधुकरापासून घेतलेला बोध येथें सांगितला. गृह = गृहस्थाश्रमी लोक. अहिंसन् म्हणजे त्यांस पीडा न देतां, त्यांचा छळ न करितां. तात्पर्य असें:- मधुकराची स्थिति पहातां स्पष्ट दिसतें कीं, तो एका विशेष प्रकारच्या सुगंधाला भुलून एकाच फुललेल्या कमळामध्यें वास्तव्य करितो. पुढें सायंकाळ झाला कीं तें सूर्यकमळ मिटतें आणि त्याच्या आंत तो बिचारा गंधासक्त झालेला मधुकर बद्ध होतो, कैदेंत पडतो ! याच प्रकारानें मुनि सुद्धां एखाद्या गुणावर मोहित होऊन एकाच घरांत तो जर आसक्त होऊन राहील, तर त्या मधुकराप्रमाणें आपलाही नाश करून घेईल ॥ ९ ॥

दुसऱ्या अनाथाला द्यावा असें ठरविलें. तसेंच कोणी गृहस्थ कष्टार्जित द्रव्य खर्चून मोठ्या आसोशीनें आवडीचा पाक सिद्ध करतात; पण अतिथि येतो आणि कल्याणेच्छु गृहपति तो पाक त्या आगंतुकाला अर्पितो. सारांश, कांहीं खटपट न करितां अतिथीला अन्न मिळतें. जसा अतिथि तसाच मध हरण करणारा भिल्ल. एवंच दैवीं असेल, तर श्रमावीण योगक्षेम चालतो, हा दुसरा धडा मला भिल्लानें शिकविला ॥ १५ ॥ १६ ॥

पारध्यांचें गीत ऐकून नादलुब्ध हरिण बंदींत पडतो. मृगीचा मुलगा ऋष्यशृंग ऋषि वेश्यांचीं मोहक गाणीं व सुस्वर वाद्यें ऐकून व त्यांचें हावभावयुक्त नृत्य पाहून त्यांचा बंदा गुलाम झाला. तात्पर्य, विकारोत्तेजक गाणें बजावणें बनांत राहणाऱ्या यतीनें केव्हांहि ऐकूं नये हा धडा मी हरिणापासून शिकलों ॥ १७,१८ ॥

आमिष लावलेला गळ आमिषाच्या आशेनें मासा पकडतो व गळांत सांपडून पुढें मरतो. राजा ! रसनेंद्रिय मोठें अनावर आहे. जिव्हालौल्याच्या स्वाधीन जीव झाला कीं मेलाच समज. रसनेशिवाय बाकीचीं सर्व इंद्रियें वश होतात. पण जीभ वश होणें कठिण. इतर इंद्रियांस त्यांचे विषय दिलेच नाहींत, तर तीं क्षीण होतात, पण जिभेचें सर्व उलट ! निराहार करणाऱ्याची जीभ फारच खवळते ! ! म्हणून रसना जावत्काल हातीं आली नाहीं, तावत्काल जितेंद्रियत्व मिळत नाहीं. रसना जिंकिली कीं सर्व इंद्रियें वश होतात. रसना ताब्यांत ठेवली नाहीं तर मरण येतें, हें मी जळांतील माशापासून शिकलों ॥ १९–२१ ॥

राजा ! पिंगला नांवाची एक वेश्या विदेह नगरींत रहात असे. तिनें मला जें शिकविलें तें तुला सांगतो. ॥ २२ ॥ वेश्यापणाचा धंदा करून ती आपला उदरनिर्वाह करी. एके दिवशीं नित्याप्रमाणें उत्तम शृंगार करून ती दाराच्या बाहेर आली आणि

---

**टीप**—केवल धनसंग्रह करणारा जो असतो, म्हणजे जो दुसऱ्याला कांहीं देत नाहीं किंवा आपण स्वतःही उपभोग घेत नाहीं, त्या कृपणाचा तो धनसंचय दुसराच कोणी बलवान्—राजा म्हणा किंवा चोर म्हणा—जबरदस्तीनें लुटून नेतो आणि त्याचा उपभोग घेतो. कोहिनूर हिऱ्याची गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे. असो; मधमाशा मधाचा संग्रह मात्र करतात; परंतु त्याचा तो संग्रह कोणी भलताच भिल्ल हरण करतो, वाण्याला विकतो आणि तो मध परंपरेनें श्रीमंताच्या घरांत जाऊन तेथें भलतींच माणसें त्याचा उपभोग घेतात ! आतां, " बळकट पेटींत किंवा भुईत पुरलेलें सुरक्षित द्रव्य दुसऱ्याला समजतें कसें व तो तें घेऊन जातो कसा ? " याला उत्तर असें:—श्लोकांत ' अर्थवित् ' पद आहे. आकार, इंगित, चेष्टा, भाषण इत्यादि चिन्हांनीं अर्थ म्हणजे द्रव्य आहे, तें कोठें आहे व कसें न्यावें, हें ज्याला पूर्णपणें ठाऊक असतें, तो अर्थवित् होय. उदाहरण, मध हरण करणारा भिल्ल किंवा कोळी झाडाच्या भगदाडांत सांचविलेला मध शोधून काढितो व घेऊन जातो. तात्पर्य, कृपणाचें धन त्याच्याजवळ राहत नाहीं. ॥ १५ ॥

रतिस्थानीं नेण्यासाठीं एखाद्या कामुकास भुलविण्याकरितां ती तेथेंच उभी राहिली ॥ २३ ॥ तिच्या दारावरून अनेक लोक येत जात होते. त्यांपैकीं प्रत्येक जण श्रीमंत आहे, गुलहौशी आहे, आपल्यास द्रव्याचा योग्य मोबदला देईल व रमवील असें त्या द्रव्यलोभी योषितेस वाटलें ॥ २४ ॥

लोक आले व गेले; पण कोणीच तिच्या हावभावांकडे लक्ष दिलें नाहीं. तरी पण कोणी तरी लवकरच येऊन माझी इच्छा पूर्ण करील अशा आशेनें ती रतिविक्रय करणारी पिंगला बराच वेळ दारांत उभी राहिली ॥ २५ ॥ द्रव्याची आशा जबर ! तिनें तिची झोंप घालवली. वरचेवर ती आंत जाई, बाहेर येई, दारांत उभी राही; पण व्यर्थ ! मध्यरात्र झाली. तिला त्या रात्रीं रमण मिळालाच नाहीं. आशेची निराशा झाल्यामुळें तिचें तोंड सुकलें, ती दीन झाली. पण काय उपयोग ? शेवटीं वित्ताच्या दुर्धर आशेचें पर्यवसान मात्र फारच उत्तम झालें. राजा ! निर्वेद म्हणजे अलंबुद्धि, समाधान, नैराश्य तिच्या अंतःकरणांत प्रगट झालें. त्या अलंबुद्धीच्या भरांत तिनें एक सुंदर गीत गाइलें. त्याचें तात्पर्य मी सांगतों, तें ऐक. पण एक गोष्ट लक्षांत ठेव. निर्वेदबुद्धि म्हणजे आहे त्यांतच समाधान मानण्याची बुद्धि होय. ही बुद्धि म्हणजे वासनांचें जाळें तोडणारी तलवारच होय. बाबा ! ज्याला निर्वेद प्राप्त झाला नाहीं, त्याचा देहबंध किंवा संसारबंध कधींही सुटायचा नाहीं व त्याला तो सोडावासाही वाटणार नाहीं. ॥ २६–२९ ॥ असो. पिंगला आपल्या गीतांत म्हणते, केवढा हो माझ्या मोहाचा विस्तार हा ! मन अनावर झालें त्याचा हा परिणाम ! किती तरी मूर्ख मी ! क्षुद्र रतिपति संपादून त्याकरवीं माझ्या कामाची तृप्ति करून घेण्याला इच्छिणारी माझ्यासारखी मूर्ख मीच होय ! ॥ ३० ॥

अति उदार, रमणीय, श्रेष्ठ आनंद देणारा, हवें असेल तेवढें द्रव्य देणारा, असा जो माझा आत्मा, मला अत्यंत प्रिय असणारा माझा कांत, माझ्या अत्यंत निकट नित्य राहत असतांही मी त्याला [ माझ्या आत्म्याला ] ढकलून दिलें आणि कसलीही इच्छा पूर्ण न करणाऱ्या, दुःख, भय, शोक व मोह उत्पन्न करणाऱ्या भलत्या क्षुद्रांच्या सेवेंत मीं आपला जन्म घालविला ! केवढें हें अज्ञान ! ॥ ३१ ॥

---

**टीप**—श्लोकांत ' यथा ' हें पद आहे. त्याचा अर्थ जसें होतें तसेंच; मम म्हणजे मजपासून, माझ्या तोंडून ऐक. राजा ! तूं म्हणशील " निराश झालेल्या वेश्येचें गाणें ऐकण्यांत स्वारस्य काय ? हें गाणें ऐकायचें कशाला ? " तर त्याचें उत्तर ऐक. निर्वेद म्हणजे अलंबुद्धि. हा निर्वेद म्हणजे, जीव आशांच्या ज्या पाशांत म्हणजे जाळ्यांत बद्ध झालेला असतो त्या जाळ्याला—जाळ्याच्या दोऱ्यांचा—तोडणारा खड्ग आहे. ज्या अर्थीं पूर्ण नैराश्य उत्पन्न झालें म्हणजे सर्व आशा व वासना नाहींशा होतात, त्या अर्थीं या पिंगलेला जो निर्वेद झाला व ज्याच्या भरांत तिनें गीत गाइलें, तो निर्वेद समजून घेणें अगत्याचें आहे ॥ २८ ॥

पिंगला म्हणते, मी आपल्या आत्म्याला आजपर्यंत व्यर्थ शिणविलें; अत्यंत निंद्य असणारा देह-विक्रयाचा धंदा केला आणि माझ्या प्रियकर रमणाला मी संतापविलें. स्त्रीलंपट, द्रव्यलोलुप आणि हलकट मनाच्या दुष्ट पुरुषांस मी आपला सोन्यासारखा देह विकला ! कशासाठीं पैशासाठीं ! कशासाठीं पतिसुख मिळविण्यासाठीं ! धिक्कार, धिक्कार असो मला ! ॥ ३२ ॥

अहो, हें पुरुषशरीर म्हणजे केवळ हाडांचा सांपळा ! कण्याच्या हाडाला बरगड्यांचीं हाडें जुळवून हातापायांचीं हाडकें पुढें आलेला घाणेरडा पुतळा. त्यालाच घाणेरड्या नीरस कातड्यानें, केसांनीं, नखांनीं, वर खालीं बांधून काढलेला आणि त्याचींच नऊ दारें ( डोळे, कान, नाक इत्यादि खिडक्या ) दुर्गंध असणारा मळ नित्य ओकतात ना ! इश्श ! ! ! असल्या घाणेरड्या पुरुषशरीराकडे माझ्याशिवाय दुसरी कोणती स्त्री प्रेमानें पाहील ? मीच मूर्ख, मीच अभागी ! या विदेहनगरींत माझ्यासारखी मूर्ख स्त्री औषधापुरती तरी मिळेल का ? नाहीं, मुळींच नाहीं ! आत्मस्वरूप प्राप्त करून देणाऱ्या या माझ्या अच्युत आत्मारामाला मी टाकून दिलें आणि मीं वेश्येनें इच्छापूर्तीसाठीं अनात्मक रमणाची आस बाळगली ! ॥ ३३,३४ ॥

असो; झालें तें सालगुदस्त. यापुढें माझा जिवलग मित्र, अत्यंत प्रियकर, माझा नाथ, सर्व देहधाऱ्यांचा नियंता जो माझा आत्माराम, त्यालाच मी माझें आत्मसर्वस्व देऊन त्याच्या मोबदला मी आत्मस्वरूप घेणार आणि त्या आत्मारूप नारायणाशीं मी रमेप्रमाणें रममाण होणार ! ॥ ३५ ॥

खरेंच आहे. आज आहेत, उद्यां नाहींत असे विषय म्हणा, किंवा ते ते विषय देणारे कालवश मानव किंवा देव म्हणा, त्यांनीं आपल्या भजकांचें व भार्यांचें अंतिम कल्याण कधींही साधिलें नाहीं किंवा आवडत्या गोष्टीही त्यांस दिल्या नाहींत. अशा क्षणभंगुर, क्षुद्र आणि आपलपोट्या पुरुषांची सेवा यापुढें मी कधींही करणार नाहीं. काय हें माझें भाग्य उदयास आलें कीं, ज्यानें जणूं सुखाची खाणच असा निर्वेदरूप श्रीविष्णूचा प्रसाद दुराशा धरणाऱ्या मला मिळवून दिला. हा भगवत्प्रसाद परम भाग्यावांचून शक्य नाहीं. मी जर मंदभाग्य असतें, तर मला हे वैराग्यजनक क्लेश कदापि झाले नसते. वैराग्याचे योगेंच मनुष्याला गृहादिकांचा त्याग करितां येऊन मोक्ष मिळवितां येतो ॥ ३६–३८ ॥ यापुढें भगवदुपकाररूप वैराग्य शिरसा धारण करणारी मी आहारविहारादि ग्राम्य

---

एकनाथ—जो सोयरा माझा हृदयस्थु । सुख प्रीति प्रिय अच्युतु ॥
तोचि अंतरात्मा सर्वगतू । नाथ कांतू तो माझा ॥
रमा जाली पायांची दासी । मी भोगीन अनारिसी ॥
सर्वकाळ सर्वदेशीं । सर्वरूपेंसीं सर्वस्वें ॥ ( ३५ )

आशा व दुराशा सोडून देऊन महादेव जो अनाथांचा नाथ विष्णु त्याला शरण जातें. यापुढें मी नित्य संतुष्ट, ईश्वरावर श्रद्धा ठेवणारी, प्राप्त पदार्थांत समाधान मानणारी होऊन माझ्या आत्मारामाशीं सर्वात्मना विलास करीत राहीन. त्या ह्या माझ्या अनाथनाथाशिवाय संसारगर्तेत पडलेल्या, विषयांध झालेल्या आणि काळाच्या जबड्यांत सांपडलेल्या माझ्यासारख्या अनाथाला तारण्याचें प्रभुत्व कोणाच्याच अंगीं नाहीं. मी माझ्या आत्म्यालाच शरण जाणार. माझ्या आत्म्याचा संरक्षक एक माझा आत्माच आहे. हें केव्हां समजतें ? हें सर्व विश्व काळसर्पानें ग्रासून टाकलें आहे, असें जेव्हां भ्रमशून्य ज्ञान होतें अर्थात् सर्व चराचरात्मक उपभोगांपासून सर्वथा निवृत्त होतें, निर्वेद प्राप्त होतो तेव्हांच आत्मारामाचा पालक व रक्षक आत्माराम होतो. मला निर्वेद प्राप्त झाला. आतां मी आत्माराम व आत्मक्रीड होणार. धन्य, धन्य मी आणि माझें भाग्य ! ॥ ३९--४२ ॥

अवधूत म्हणाले, राजा ! याप्रमाणें ग्राम्यरतीची तृष्णा, आशा व दुराशा यांचे पाश तोडून टाकून पिंगलेनें आपली बुद्धि आत्म्याचे ठिकाणीं दृढ केली. ती शांत झाली आणि स्वस्थ चित्तानें निश्चिंत होऊन आपल्या शय्येवर जाऊन पहुडली ॥ ४३ ॥ तात्पर्य, राजा, आशा ही दुःखाची जननी आहे आणि नैराश्य म्हणजे निर्वेद सुखजनक आहे. पिंगलाच पाहा. तिनें ग्राम्य कांताशीं रममाण होण्याची आशा तोडली म्हणून नैराश्य तिला मिळालें व शांतिही मिळाली. अर्थात् तिला सुखाची झोंप मिळाली ॥ ४४ ॥

---

**एकनाथ**—ऐसिया पीडतयां जीवांसी । काढावया विवसा नव्हे कोणासी ॥
तुजवांचोनि हृषीकेशी । पात्र वेगेंसी कृपाळुवा ॥ ( ४१ )
दृढ वैराग्यता ते ऐशी । विषयो टेंकल्या अंगासी ॥
चेतना नव्हे इंद्रियांसी । निद्रितापासीं जेंवि रंभा ॥
तें वैराग्य कैसेनि जोडे । तरी सावधान पाहतां रोकडें ॥
जग काळें गिळिलें चहूंकडे । वेगळें पडे तें नाहीं ॥ ( ४२ )

## आठवा अध्याय समाप्त

# अध्याय ९ वा

श्रीअवधूत म्हणाले, राजा ! मनुष्यांस जें जें म्हणून अत्यंत प्रियकर असतें, त्याचा त्याचा परिग्रह करणें दुःखदायक होतें. हें जाणून जो अकिंचन म्हणजे दरिद्री राहतो त्याला उत्कृष्ट प्रकारचें सुख सदोदित मिळतें ॥ १ ॥ एका टिटव्याजवळ कांहीं खाद्य होतें, तोंपर्यंत इतर निरामिष बलवान् टिटव्यांनीं त्याला मार मारून पुष्कळ त्रास दिला. पुढें त्या टिटव्यानें आपल्या जवळचें आमिष टाकून दिलें, तेव्हां त्याला निर्वेध सुख मिळालें. परिग्रह ठेवूं नये, ही टिटव्याची शिकवण होय ॥ २ ॥

लहान बालकाला मानापमानाचीं क्षिति नसते, बायकापोरांची काळजी नसते. तें आपल्याशींच रमतें व खेळतें. ही बालकाची मला शिकवण. आतां मला मानापमानाची क्षिति किंवा संसाराची काळजी नाहीं, मी आत्मसंतुष्ट, आत्मविहारी आहें. राजा ! अज्ञानी व स्वस्थ पडून राहणारा असा बालक आणि गुणातीत योगी या दोघांस चिंताशून्य परमानंद-सागरांत पोहतां येतें ॥ ३ ॥ ४ ॥

अवधूत म्हणाले, राजा, आता एकाएकीं राहण्याचा गुण मी एका कुमारिकेपासून कसा घेतला, तें ऐक. वडील माणसें बाहेरगांवीं गेलीं आहेत अशा वेळीं वधूनिश्चय करण्याच्या हेतूनें एका कुमारीने घरीं कांहीं पाहुणे आले. त्यांच्या जेवणाची तजवीज त्या कुमारिकेलाच करावी लागली. साळी कांडून तांदूळ करण्यासाठीं ती उखळावर गेली व कांडूं लागली. तेव्हां तिच्या हातांत शंखाचीं कांकणवजा वलयें होतीं तीं वाजूं लागलीं. आवाज बाहेर ऐकूं जाऊं नये म्हणून तिनें, एक, दुसरें, तिसरें, अशीं एकामागून एक कांकणें हातांतून काढलीं व दोनच कांकणें हातांत ठेवून कांडूं लागली ॥ ५,६,७ ॥ तिनें जरी याप्रमाणें केलें, तरी आवाज बंद होईना. तेव्हां तिनें फक्त एकेकच कांकण हातांत ठेवलें तेव्हां मात्र आवाज बंद झाला. मी विश्वरहस्य जाणण्याचे इच्छेनें हिंडत असतां माझ्या दृष्टीला हें कुमारीचें वर्तन पडलें व मी शिकलों कीं, पुष्कळ लोक एकत्र जमले म्हणजे भांडण होतें; दोनच असले तरी गप्पागोष्टी चालतातच. तेव्हां एकाकी असणें हें त्या मुलीनें अथवा मुलीच्या हातांतील कांकणांनीं मला शिकविलें ॥ ८,९,१० ॥

साधनेच्छु पुरुषानें आपलें आसन स्थिर करून पूरकादि प्राणायामाच्या साहाय्यानें प्राणवायु स्वाधीन करून मन एकाग्र करावें आणि निरलसपणें योगाभ्यासाच्या साहाय्यानें

---

**एकनाथ**—कामादिक सहा वैरी । येणें उपदेश शस्त्रधारीं ॥
जिणोनि घालितां तोडरीं । मग संसारीं अरि नाहीं ॥ (९)
जेथें गोष्टीखालीं काळू जाये । तेथें निजस्वार्थू हों न लाहे ॥
यालागीं मी पाहें । विचरत आहें एकाकी ॥ (१०)

आपलें मन लक्ष्यावर म्हणजे परमपदावर ठेवावें ॥ ११ ॥ नंतर त्या परमपदावर एकाग्र झालेलें हें मन हळूहळू कर्मरेणूंचा म्हणजे वासनाधूलीचा त्याग करण्यास समर्थ होतें. आणि असें झालें म्हणजे सत्त्वगुणाची वृद्धि होऊन रज व तम या गुणांचा लय होतो आणि असें झालें म्हणजे तें मन विषयशून्य होऊन उन्मनी अवस्थेला प्राप्त होतें ॥ १२ ॥ बाण तयार करण्यांत निमग्न झालेल्या एका बाणकारानें जवळून वाजत गाजत जाणारी राजाची स्वारी पाहिली नाहीं. अर्थात् एकाग्रतेमुळें त्याचें लक्ष त्या राजाच्या स्वारीकडे गेलें नाहीं, त्याप्रमाणें आत्मस्वरूपांत समरस होऊन योगी पुरुषानें आंतील व बाहेरील हें यत्किंचितही मनांत येऊं देऊं नये हें मी त्या बाणकारापासून शिकलों ॥ १३ ॥

---

**टीप**—चित्ताची एकाग्रता करणें हें प्रथम कर्तव्य आहे. कारण चित्तैकाग्र्य हें समाधीचें उत्तम साधन आहे. या समाधीचें लक्षण हें कीं, त्या वेळीं द्वैताची स्फूर्ति मुळींच नसते. ही चित्तैकाग्रता श्रीअवधूत शरकारापासून शिकलो, हें या श्लोकांत सांगावयाचें आहे. 'चित्तैकाग्र्य कसें साध्य होतें?' ह्या प्रश्नाला उत्तर म्हणून उपाय सांगतात—साधकानें प्रथम कांहीं वेळ आसनावर स्थिर होऊन हालचाल न करतां अगदीं ताठ बसतां येण्याची कला साध्य करून घ्यावी. हा आसनजय होय. आसनजयाला पद्मासन फारच उपयुक्त आहे. स्थिर व ताठ बसतां येऊं लागलें असतां प्राणायामाच्या साहाय्यानें आपल्या श्वासोच्छ्वासावर आपली म्हणजे साधकाची सत्ता प्रतिष्ठापित होऊं लागते. श्वास ताब्यांत येणें हाच श्वासजय होय. मन श्वासाच्या स्वाधीन असतें अर्थात् श्वासजय केला म्हणजे स्वभावतः चंचल असणारें मन निश्चल, स्थिर होतें. हीच चित्ताची एकाग्रता होय. राजा! तूं म्हणशील, "क्षण एक मन स्थिर झालें तरी त्या मनांत घोळणाऱ्या विषयवासनांनीं जर तें पुन: भडकूं लागलें अथवा विषयशून्य झाल्यामुळें झोपेंत लय पावतें, तसा साधकाच्या मनाचा जागेपणींच लय झाला तर काय करावें?" याला उत्तर असें — साधकाला विरक्ति म्हणजे विषयवैराग्य संपादण्याची कला असलीच पाहिजे. ही विरक्ति जवळ असली म्हणजे मन भडकणार नाहीं. तसाच त्यानें आपलें जें इष्टतम ध्येय आहे, तिकडे मनाला नेऊन तेथें स्थिर करण्याचा अभ्यास हळूहळू वाढवीत जावा. अर्थात् ध्यान जागृतींतच होणार, तेव्हां लयाची भीतिही संपली. एवंच आसनजय, प्राणजय आणि समाधि ही परंपरा साध्य झाल्यास मनाचें भडकणें निघून जाईल आणि बाणकारासारखें चित्तैकाग्र्य साध्य होईल ॥ ११ ॥

'एकत्र म्हणून मागच्या श्लोकांत सांगितलें, तें एक ठिकाण कोणतें?' हें ठिकाणच या श्लोकांत सांगितलें आहे. आपलें मन झोपेंत लय पावतें आणि जागृतींत वाटेल तिकडे भडकत असतें. तें हें मन जर परम आनंदाचें धाम अशा भगवत्स्वरूपांत ध्यानधारणामार्गें स्थान मिळवूं शकलें, तर तें आपलें मन आपल्या कर्मवासना त्याच भगवत्स्वरूपांत सोडून देतें. तात्पर्य, भगवत्स्वरूपाचें एकाग्रध्यान मागें सांगितलेल्या यमनियमपूर्वक आसनप्राणायामाच्या मार्गानें ब्रह्मरूपांत जाऊन मिळतें. अर्थात् त्याच्या कर्ममूलक व उपभोगमूलक सर्व वासना नष्ट होतात. तेव्हां एकत्र म्हणजे ब्रह्मस्वरूपांत असें समजावें. आतां

" कर्मवासनांचा नाश झाला, तरी झोपेंतील लय कसा नाहींसा होईल ? कर्मवासनेच्या वृत्ति संपल्या तर, सर्व कर्मरेणु नाहींसे झाले तर, वृत्तिशून्य मन झोपेंत जाईल. हें संकटच आहे ' अशीही शंका घेण्याचें कारण नाहीं. हें अवधूत सांगतो. यमनियमांनीं वाढविलेला सत्त्वगुण स्वसामर्थ्यानेंच रजोगुणाचा पराभव करून मनाचें भडकणें संपवितो आणि तमाचा नाश करून झोपेचा म्हणजे लयाचा अभाव करितो. या सत्त्वाचें स्वरूपच उपशमात्मक, निवृत्त्यात्मक आहे. म्हणजे तो सत्त्वगुणही पुढें लीन होतो, असो, या प्रकारें वृत्तिशून्य झालेलें चित्त ' चित्स्वरूप ' होतें. यालाच ' निर्वाण ' म्हणजे मनोनाश व वासनानाश पूर्वक ब्रह्माकारता म्हणतात. हें ब्रह्मच आपलें ध्येय असतें. वृत्तिशून्यत्व समजावें म्हणून अवधूत अग्नीचा दृष्टांत देतो. इंधन नसलें म्हणजे अग्नि विझतो, त्याप्रमाणें गुण व त्यांचीं कार्यें यांचा अभाव झाला म्हणजे मन ब्रह्मस्वरूपांत जाऊन ब्रह्मरूप होतें. योगशास्त्रांत सांगितलें आहे– " वृत्तिशून्य मन झालें म्हणजे त्याला ब्रह्माकारता येते. या स्थितीलाच ' असंप्रज्ञात समाधि ' असें नांव आहे " ॥ १२ ॥

इतकी सिद्धता झाली म्हणजे द्वैताची स्फूर्ति म्हणजे उभारणीच होत नाहीं, हें येथें सांगावयाचें आहे. बाहेरचें म्हणजे नेत्रकर्णादि इंद्रियद्वारां होणारें दर्शनादि ज्ञान आणि आंतर म्हणजे स्मृतीनें होणारें ज्ञान होय. मुळांतील अंतर म्हणजे आंतून होय. इषुकाराची एकाग्रता संपादली पाहिजे. ही शिकवण मीं इषुकाराकडून घेतली ॥ १३ ॥

राजा ! साप एकटा असतो त्याला स्वतःचे घर नसतें. तो नेहमीं गुप्त ठिकाणीं असतो. विषारी किंवा निर्विष हें आकृतीवरून दाखविणारा आणि मुळींच आवाज न करणारा साप मुंग्यांनीं केलेल्या वारुळांत स्वस्थ असतो. समाधान हवें असेल तर सापाप्रमाणें जनसंगाचा त्याग, निष्परिग्रहता, गुप्त वास, खोल मन, मौन इत्यादिकांचा स्वीकार मुनीनें करावा. हा देह क्षणभंगुर म्हणून गृहादिक करूंच नये, ही गोष्ट सापानें मला शिकविली ॥ १४ ॥ १५ ॥

आपल्या नाभींतून लोकरीचे तंतु तोंडानें बाहेर काढून त्यांचें स्वतः जाळें विणणारा ऊर्णनाभि त्या जाळ्यांत कांहीं वेळ असतो व तें जाळें आपण स्वतःच गिळून टाकतो. हें ऊर्णनाभीचें कृत्य पाहून मीं अनुमान काढलें कीं, एकच एक परमेश्वर असला पाहिजे. त्या ऊर्णनाभीप्रमाणेंच तो परमेश्वर आपल्या स्वतःच्याच संकल्पानें स्वतःमधूनच त्रिगुणात्मक माया निर्माण करतो, तिचे सत्त्वादि गुणाचा क्षोभ करून स्वतःच्याच कालसामर्थ्यानें तो ईश्वर तद्द्वारा आपण सूत्रात्मा म्हणजे क्रियाशक्तिमान्

---

**एकनाथ**—पाहतां ध्येय ध्याता ध्यान । जेथ उल्हासें विगुंतलें मौन ॥
ते संप्रज्ञात समाधी जाण । गुणेंवीण भोगिती ॥
तेथ निःशेष समरसे मन । जाला सुखरूप चिद्घन ॥
ते समाधी परम कारण । विचक्षण बोलती ॥ ( १२ )

महत्तत्त्व निर्माण करतो म्हणजे होतो आणि महत्तत्त्वाच्या गुणव्यापारांनीं हें ब्रह्मांड निर्माण होतें आणि या ब्रह्मांडांत पूर्वसंचितानुसार जीव संसारांत म्हणजे जन्ममरणाच्या चक्रांत सांपडून सुखदुःख अनुभवितात. पुढें नियमित काल लोटल्यावर त्या परमेश्वराला ऊर्णनाभीप्रमाणेंच सर्व संहार करण्याची इच्छा होते. तेव्हां तो स्वतःच्या कालसामर्थ्यानें आपणच उत्पन्न केलेल्या ब्रह्मांडाचा संहार करतो म्हणजे आपल्या स्वरूपांत सर्व ब्रह्मांड मायेसह घेतो. यालाच प्रलयकाल म्हणतात. संहारकालीं व प्रलय झाल्यानंतर त्रिगुणात्मक माया संक्षुब्ध झाल्याकारणानें तिचे विषम स्थितींत असणारे जे गुण ते प्रलयकाळीं शांत होतात, समता पावतात आणि ईश्वरसंकल्पासह माया नाहींशी होते. ऊर्णनाभीनें आपलें जाळें गिळल्यावर तो एकटाच राहतो, तसा परमेश्वर श्रीनारायण एकटा, सच्चिदानंदस्वरूप असतो. तो एकच एक अद्वितीय असून विश्वकालीं सर्व जीवांचा आश्रय व आधार असतो. व्यवहारकालीं दिसणाऱ्या जडांचा ( प्रकृतीचा, सांख्योक्त प्रधानाचा ) व पुरुषांचा म्हणजे जीवांचा नियंता व सर्वश्रेष्ठ पुरुषोत्तम हाच नारायण होय. यालाच केवल व मोक्षाचें, कैवल्याचें निधान म्हणतात. ऊर्णनाभी निरुपाधिक, तसाच परमेश्वर निरुपाधिक असून शुद्ध अनुभवानंदाचा गड्डा आहे. हें सर्व अनुमान मीं ऊर्णनाभीचें वर्तन पाहून काढलें. एकाकी ईश्वर जगत् कसें निर्माण करतो व कसा संहार करतो, याला ऊर्णनाभीचें उत्तम उदाहरण आहे ॥ १६–२१ ॥

भिंगुरटीनें धरलेला व स्वतःच्या घरट्यांत नेलेला कीटक भयानें त्या भिंगुरट्याचें अखंड ध्यान करतो आणि शेवटीं आपला देह न सोडतांही भिंगुरट्याचें स्वरूप ध्यानामुळें प्राप्त करून घेतो. या कीटकानें मला शिकविलें कीं, अखंड ध्यान केलें असतां—मग तें स्नेहानें, द्वेषानें किंवा भयानें, कोणत्याही मनोवृत्तीनें करा — ज्याचें आपण ध्यान करतों त्याचें रूप याच लोकीं व याच देहीं आपल्यास प्राप्त होतें. ध्यानाचें हें सामर्थ्य कीटकाच्य-उदाहरणावरून मला समजलें ॥ २२ ॥ २३ ॥ राजा ! याप्रमाणें माझ्या चोवीस गुरूं

**टीप**—त्या केवल परमात्म्यापासूनच सृष्टीची उत्पत्ति या श्लोकांत सांगितली आहे. केवल असा जो परमात्म्याचा अनुभव म्हणजे सामर्थ्य = काल, या कालाच्या साहाय्यानें केवल परमात्मा ‘ महत् ’ नामक तत्त्वाला उत्पन्न करितो. या महत्तत्त्वाला ‘ सूत्र ’ अशी संज्ञा असून तें तत्त्व क्रियाशक्तिप्रधान आहे. म्हणजे त्याचें क्रियासामर्थ्य अकुंठित असतें १ परमात्मा, २ काल—त्रिगुणात्मक मायेचा क्षोभसमय—आणि ३ सूत्र ‘ किंवा महत्तत्त्व अशी कार्यपरंपरा आहे. असो राजा ! जीवांच्या संसृतीला कारण असणारें जें मायाजन्य महत्तत्त्व म्हणजे सूत्रात्मा त्याची उत्पत्ति होऊन तो स्वकार्य करीत राहिला, तरी तुला भिण्याचें कारण नाहीं, हें सुचविण्यासाठीं अवधूतानें राजाला अरिंदम असें संबोधिलें. अरिंदम म्हणजे कामक्रोधादि जे शत्रु त्यांस दमविणारा, शांत करणारा, नाहींसें करण्यास समर्थ असणारा. अर्थात् कामादि नष्ट झाल्यावर शुद्धचित्त राजाला सूत्रात्म्याची काय भीति असणार ! ॥ १९ ॥

पासून अनेक प्रकारचें शिक्षण मी शिकलों. आतां, माझ्या स्वतःच्याच देहादिकांकडून मी काय शिकलों तें ऐक ॥ २४ ॥

या देहानेंच मला विवेक ( सत् कोणतें, असत् कोणतें याची निवड ) व वैराग्य ( विषयांविषयीं तिटकारा ) शिकविलीं. पाहा कीं, या देहाला जन्म आहे, मरण आहे, हीं दोन्ही दुःखदायक. आणि देह आहे तोंपर्यंत ही सर्वदा दुःखाचीच माळ जिवाच्या गळ्यांत असते. हें पाहून वैराग्य उत्पन्न होतें व शेवटीं हा देह अग्नीचें, मातीचें किंवा काकशृगालप्रभृति वनपशूंचें भक्ष्य होणार म्हणून तो देह* माझा नव्हे दुसऱ्याचा आहे, हें पाहून तें पूर्वीचें वैराग्य दृढतर होतें. तसेंच देह माझा नव्हे हा विवेक आणि या विश्वांत जीं जीं भूतें म्हणजे पृथ्वीप्रमुख तत्त्वें आहेत तींही देहाप्रमाणेंच अनित्य, असत् आहेत असा यथार्थ विवेक होतो. तसेंच, भार्या, पुत्र, धन, पशु, दास, गृह, आप्त, इष्टमित्र वगैरे परिवार स्वतःच्याच सुखासाठीं मोठे कष्ट सोसून वाढवून पालनपोषण केला असतांही अंतकालीं त्यांचा वियोग अति दुःखद होतो. शिवाय ज्याच्या कल्याणासाठीं धनसंचय केला त्याचाही विरह होतो, हें परमावधीचें दुःख होय. राजा ! ज्या देहाला दुःख सोसून मीं न्हाणिलें, खाऊं-पिऊं, घातलें, प्रेमानें नटविलें, तो देह तरी काय करतो ? तर वृक्ष जसा दुसऱ्या वृक्षाचें बीज उत्पन्न करून नष्ट होतो, त्याप्रमाणेंच हा देहही दुसऱ्या आणि दुःखद जन्मांची पेरणी करून निघून जातो ! कोण दुःखदायी कृतघ्नता ही या देहाची ! या देहावर चिकटून बसविलेलीं इंद्रियें तरी सुखेपणीं वागतात काय ? नाहीं. आपली जिव्हा म्हणजे भूक, आपली तहान आपलें शिश्न, आपली त्वचा, उदर, श्रवण ( कान ), नाक, दृष्टि, प्राण हीं सर्व आपआपल्या परीनें जीवांना सतावून सोडतातच. प्रत्येक इंद्रियाचा हट्ट निराळा ! यामुळें गृहपति (देहपति ) जो जीव याला अत्यंत यातना होतात. तेव्हां हा देह व हे विषयोपभोग नकोत असें वैराग्य माझा देहच मला शिकवितो आणि हें जें सर्व देह, इंद्रियें, कुटुंब, समाज, स्थावर जगत् आहे, तें नश्वर आहे, जीवाला उपयोगी व जीवाला कल्याणकर असें यांत कांहीं नाहीं असा विवेक हा माझा देहच मला शिवितो ॥ २५,२६,२७ ॥

असो. पण राजा ! ह्या मानवी देहाची महती फारच मोठी आहे परमेश्वरानें आपलें अगाध सामर्थ्य उपयोगांत आणून वृक्ष, सर्प, पशु, पक्षी दंश ( डांस ) जलचरादि मत्स्यप्रभृति अनेक पुरें म्हणजे देह उत्पन्न केले; तथापि त्याचें समाधान कांहीं

---

**टीप**—गुरुत्वाला म्हणजे विरक्ति व विवेक हीं दोन्ही प्राप्त करून देण्याला कारण हा देह आहे. सत्त्व = उत्पत्ति· निधन = विनाश. आतां विवेक पाहा – हीं जीं अनंत तत्त्वें विश्वांत पसरलीं आहेत त्यांचें यथार्थ स्वरूप देहद्वाराच समजतें सत्यासत्यविवेक करितां येतो. अशा प्रकारें विरक्ति आणि विवेक शिकवून उपकार करणाऱ्या परंतु परक्याचा असणाऱ्या देहाची आस्था केव्हांही करूं नये ॥ २५ ॥

होईना. तेव्हां शेवटीं त्यानें एक अपूर्व असा देह उत्पन्न केला. तो देह म्हणजे मानव हा होय. या मानव देहांत राहणाऱ्या जीवाला देहसामर्थ्यानेंच सर्वचिकित्सक बुद्धि उत्पन्न होते व तद्द्वारा ब्रह्माचें अपरोक्ष दर्शन घेण्याची अमोघशक्ति या मानवशरीरस्थ जीवाला मिळते. अशा महिम्याचा देह उत्पन्न केला, तेव्हां देवाला अपूर्व आनंद झाला. इतर देहांत आहार विहार मात्र; पण या देहांत पुरुषोत्तमाची भेट होण्याचा प्रसंग. म्हणून हा दुर्लभ मानव देह अपूर्व महत्त्वाचा होय ॥ २८ ॥

अनेक जन्म घेतल्यानंतर पूर्वसुकृतानें प्राप्त होणारा हा देह दुर्लभ व विनाशी असतांही अत्युत्तम पुरुषार्थ साधून देणारा आहे. करितां हा प्राप्त झाला असतां विवेकी बुद्धिमंतानें लवकर म्हणजे मृत्यु येण्याच्या आधीं असा प्रयत्न करावा कीं, ज्यायोगें निःश्रेयस अथवा अत्यंत सुखाची प्राप्ति करून देणारा मोक्ष मिळेल. इतर देह विषयाच्या उपभोगासाठीं मात्र असतात; तेथें मोक्ष मिळत नाहीं. परंतु मनुष्यदेह मोक्ष देण्याला समर्थ आहे. म्हणून मोक्षाची संधि आणून देणारा हा दुर्लभ मानवदेह विषयोपभोगांच्या खर्चीं न घालतां मोक्षाप्रीत्यर्थेच उपयोजावा ॥ २९ ॥

असो. आशा प्रकारें माझ्या वैराग्याची उत्पत्ति होऊन माझ्या बुद्धींत ब्रह्मज्ञानाचा प्रकाश पडला आहे. मी सर्वसंगपरित्याग करून अभिमानशून्य होत्साता, समाधानवृत्तीनें पृथ्विसंचार करीत आहें ॥ ३० ॥

राजा ! एकाच गुरूपासून सुस्थिर आणि पुष्कळ ज्ञान मिळणें शक्य नाहीं. श्रुतिप्रमाण सोडून द्या, पण प्रत्यक्ष आणि अनुमान या प्रमाणांचे साहाय्यानेंच ज्ञान मिळविण्याचें असेल, तर तें पुष्कळ गुरूंपासून शिकलें पाहिजे. ब्रह्म एकच एक आणि अद्वि-

---

**टीप**—अनेक जन्मांचा संभव प्राप्त झाल्यानंतर शेवटीं मनुष्यजन्म दैववशात् प्राप्त होतो. यद्यपि हा मनुष्यजन्म अनित्य म्हणजे थोडेच दिवस राहणारा आहे, कालभंगुर आहे, तथापि तो अर्थ म्हणजे पुरुषार्थ साध्य करून देणारा आहे. हें जाणून जावत्कालपर्यंत तो मृत्यूच्या तोंडांत पडला नाहीं,—मृत्यु ज्याच्या समोर रात्रंदिवस त्यालागिळण्याकरितां बसला आहे, त्याच्या तडाख्यांत जाऊन पडला नाहीं,—तोंपर्यंतच म्हणजे जलदी करून जीवांचें अत्यंत कल्याण करणारा जो मोक्ष त्यासाठीं होईल तेवढा यत्न एकनिष्ठेनें करावा. कारण, हा मानवजन्मच पुनः मिळेल याचा भरंवसा नाहीं. बाकी विषयांचा उपभोग जो आहे, तो सर्व पशुपक्ष्यांच्या योनींत ठेवलेलाच आहे. त्यासाठीं धडपड करण्याचें कांहीं कारण नाहीं ॥ २९ ॥

---

**एकनाथ**—जैं पुरुषाची अहंता गळे। तैं देह अदृष्टयोगें चळे ॥
जेवीं सुकलें पान वायुबळें। पडिलें लोळे सर्वत्र ॥
देहनिश्चळत्वें वृत्ति निश्चळ। देहचंचळत्वें वृत्ति चंचळ ॥
तरी ते देहबुद्धीचि सबळ। नव्हे केवळ निजबोधू ॥ (३०)

तीय आहे, पण तत्स्वरूप सांगणारे अनेक ऋषींचे अनेक संप्रदाय आहेतच. असो; तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें यथामति दिलीं ॥ ३१ ॥

श्रीभगवान् म्हणतात, मग यदुराजानें त्याला वंदिलें, आशीर्वाद मागितला व तो मिळाल्यावर त्या गंभीर बुद्धीच्या अवधूताला त्यानें सप्रेम निरोप दिला व तो अवधूत यदृच्छेनें आला तसा गेला ॥ ३२ ॥ नंतर, श्रीअवधूताचा उपदेश ऐकून आमच्या पूर्वजांचा पूर्वज जो यदुराजा त्यानें सर्वसंगाचा परित्याग केला आणि भेदाभेदबुद्धि टाकून देऊन तो समबुद्धि झाला ॥ ३३ ॥

## नववा अध्याय समाप्त

# अध्याय १० वा

भगवान् म्हणतात, मी जो स्वधर्माचा उपदेश केला आहे, त्यावर श्रद्धेनें लक्ष ठेवून आणि माझ्याबरच निष्ठेनें अवलंबून मद्भक्तानें आपल्या वर्णाचे, आश्रमांचे व स्वकुलाचे आचार निष्काम वृत्ति धारण करून यथासांग चालवावे ॥ १ ॥

विषयलोलुप जीव, विषयोपभोगच परम पुरुषार्थ आहे, विषय सत्य आहेत असें मानतात, म्हणून त्यांच्या सर्व उद्योगांचें फल विपरीत होतें. म्हणजे ते उद्योग व तीं कर्में दुःख देणारीं होतात. ज्याचा आत्मा शुद्ध झाला आहे, त्या माझ्या भक्तानें हें संसारी पुरुषाचें चित्र लक्ष लावून पाहावें व त्यापासून बोध घ्यावा ॥ २ ॥ स्वप्नसृष्टींत अथवा मनोराज्याच्या सृष्टींत उत्पन्न-विनष्ट होणारे विषय व त्यांचें दर्शन एकात्मक नसल्यामुळें जसें फलशून्य, त्याचप्रमाणें जागृतकालींही विषयवैचित्र्य व इंद्रियवैचित्र्यामुळें उत्पन्न होणारी भेदात्मक बुद्धिही विफल अथवा मिथ्या असते ॥ ३ ॥

माझ्या भक्तानें विषयत्याग सांगणारें विहित कर्म वैराग्यवृत्तीनें करावें आणि सकाम कर्मांचा त्यागच करावा. आत्मविचार एकनिष्ठेनें करणाऱ्या पुरुषानें श्रुतिकथित सकाम कर्मसंबंधींच्या आज्ञा आदरूं नयेत ॥ ४ ॥

अहिंसासत्यप्रभृति यम आदरानें पाळावे, नियमांचेंही पालन करूं नये असें नाहीं; परंतु शांत, तत्पर ब्रह्मवेत्त्या गुरूला शरण जाऊन त्याची सेवा भक्तिपूर्वक तच्छिष्यानें करावी हा शिष्य निरभिमानी, निर्मत्सर, दक्ष, परिग्रहशून्य, दृढप्रेमी, सावध, तत्त्वजिज्ञासु, असूया-रहित, सत्यवक्ता, भार्या-पुत्र-घर-जमीन-आप्त-धन इत्यादींविषयीं उदासीन म्हणजे काळजी* न करणारा, सम वृत्तीनें सर्वत्र आत्मस्वरूप पाहणारा असा असावा. शिष्यवृत्तीला हे गुण अत्यंत आवश्यक आहेत ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥

---

**टीप**—आपल्या स्वतःच्या भार्यापुत्रादिकांवर ममत्वाचा अभाव कसा होणार ही शंका या श्लोकांत खोडून काढली. ममत्वशून्यता व उदासीनता आणण्याला कारण विवेक आहे. तो विवेक हा कीं, सर्वव्यापी जो आत्मा त्याचें प्रयोजन सारखेंच आहे. आत्मा एकरूपानें नांदत आहे, असें पाहण्यास शिकणें हें आत्मप्रयोजन सर्वत्र एकच म्हणजे असें:—सर्व देहांत आत्मा एकच आहे. तेव्हां जायादिकांच्या देहांत व ह्या इतर देहांतही आत्मा तोच आहे व त्याचा अर्थ = प्रयोजन = सुखादिही एकच असणार. म्हणून असा प्रश्न निघतो कीं, ममत्वाचा अभिनिवेश = आग्रह ठेवण्यासारख्या त्या जायादिकांच्या देहांतच काय विशेष आहे ? उत्तर कांहीं नाहीं. सारांश, विवेक केला कीं, औदासीन्य प्राप्त होतें ॥ ७ ॥

---

**एकनाथ**—प्रपंचामाजी असतें सुख । तरी कां त्यजिते सनकादिक ॥
द्वैत तितुकें केवळ दुःख । परमसुख अद्वैतीं ॥ ( ७ )

अग्नि हा दाह्यांहून ( लांकडें, गोवऱ्या वगैरेंहून ) विलक्षण असून त्या दाह्यांचा प्रकाशक असतो. त्याप्रमाणें जीवाच्या स्थूल आणि सूक्ष्म अशा दोन्ही देहांहून विलक्षण असा त्यांचा नियामक आत्मा असतो. तो स्वतः द्रष्टा आणि देह दृश्य असतात. आत्मा स्वयंप्रकाश आणि देह परप्रकाश्य असतात, म्हणून आत्मा सर्वविलक्षण आहे * ॥ ८ ॥ अग्नि हा लाकडामध्यें अंतःप्रविष्ट असतो आणि अग्नीनेंच लांकडामध्यें उत्पन्न केलेले नाश, उत्पत्ति, लहानमोठेपणा, अनेकत्व इत्यादि गुण अग्नि ग्रहण करतोसें दिसतें. त्याप्रमाणें देहाच्या आंत प्रविष्ट होऊनही नित्य, निर्गुण, मुक्त, देहातपर असणारा आत्मा, स्वतः आपणच देहादिकांमध्यें उत्पन्न केलेले जन्ममरणादि गुण घेतो, असा भास होतो ॥ ९ ॥

पुरुषोत्तमाच्या मायाविलासानें सूक्ष्म व स्थूल असे जे देह निर्माण केले आहेत ते, व हा सारा संसार, हीं जीवाच्या अध्यासानें ( अज्ञानानें ) उत्पन्न झालीं आहेत हा जीवाचा अध्यास छेदून नाहींसा करण्याला एक आत्म विद्या मात्र समर्थ आहे ॥ १० ॥ म्हणून जिज्ञासूनें आपल्या ठिकाणींच स्थित असणाऱ्या अशा केवल ( निर्गुण ) व सर्वश्रेष्ठ आत्म्याची मात्र संगति दृढ धरावी आणि 'विषय सत्य आहेत' हा बुद्धिभ्रम क्रमाक्रमानें नाहींसा करावा ॥ ११ ॥

यज्ञाचा अग्नि, दोन काष्ठें एकावर एक ठेवून घासल्यानंतर प्रकट होतो, हा दृष्टांत घेऊन भगवान् म्हणतो, गुरु ही आधार देणारी अरणी म्हणजे खालचें लांकूड आणि शिष्य हा वरची अरणी होय. खालच्या अरणीला अधरारणि व वरचीला

---

**टीप**—श्रुतिप्रणीत आणि सर्वानुभूत आत्मा विलक्षण आहे. म्हणजे दृश्यस्थूल शरीर आणि पंचज्ञानेंद्रियें, पंच कर्मेंद्रियें, पंच तन्मात्रा, बुद्धि आणि मन मिळून १७ तत्त्वांनीं रचित होतें तें सूक्ष्मशरीर—लिंगशरीर. या दोन्ही शरीरांहून आत्मा विलक्षण आहे. विलक्षण कसा ? पहिला प्रकार हा—तो ईक्षिता म्हणजे द्रष्टा आहे. दृश्याहून द्रष्टा विलक्षण असतो हा आनुभव आहे. दुसरा प्रकार — तो आत्मा स्वदृक म्हणजे स्वयंप्रकाश आहे, आणि जडाचा प्रकाशक आहे म्हणून विलक्षण, आणि विलक्षण म्हणून निराळा असतो, हें उघड आहे. दाहक आणि प्रकाशक अग्नि दाह्य म्हणजे जळणारें व प्रकाश्य म्हणजे दुसऱ्याच्या प्रकाशानें प्रकाशित होणारें काष्ठ यांपासून वेगळाच असतो. दृश्याचे, जडाचे, प्रकाश्याचे धर्म द्रष्ट्यांत, चैतन्यांत व स्वयंप्रकाशांत नसतात व दुसऱ्याचे पहिल्यांत नसतात. हा द्रष्टा आत्मा एक व सर्वत्र समत्वानें भरलेला आहे ॥ ८ ॥

---

**एकनाथ**—दोर भासला होता विखार । त्याचा करितां निजनिर्धार ॥
हारपोनियां सर्पाकार । उरे दोर निजरूपें ॥
पाहतां विवेकाचेनि निवाडें । दोराचें सर्पत्व जेवीं उडे
तेवीं ब्रह्म सद्भावीं रोकडें । देह नातुडे सत्यत्वें ॥ ( ११ )

उत्तरारणि म्हणतात. गुरुजींचें प्रवचन म्हणजे उपदेश हें दोन अरणींमधील मध्यम काष्ठ होय. हें काष्ठ अधरोत्तर अरणींस सांधतें म्हणून ते संधान. या प्रवचनरूपी संधानापासून स्वयंप्रकाशक विद्या प्रकट होते. हाच संधि होय. ही विद्या सुख देणारी असते ॥ १२ ॥ निपुण गुरुजी आणि तत्पर शिष्य यांच्या संधीनें उत्पन्न झालेली स्वयंप्रकाशी शुद्ध विद्या प्राप्त झाली म्हणजे अर्थातच गुणप्रसूत अविद्या, तद्‌गुण आणि तिचे गुणांनीं उत्पन्न केलेला हा संसार दग्धच होतो. कुंडांतील सर्व समिधा जळून खाक झाल्या म्हणजे त्यांचा दाहक जो अग्नि तोही शांत होतो, त्याप्रमाणें संसार हा दाह्य पदार्थ संपला म्हणजे तद्दाहक विद्याही अदृश्य होते ॥ १३ ॥

आतां तूं समजत असशील कीं, हे सर्व कर्म करणारे व सुखदुःखांचा उपभोग घेणारे जीव स्वतंत्र व अनेक आहेत आणि हे लोक ( भुवनें व भुवनपति ) काल, वेद आणि संसारी जीव वस्तुतः नित्यच आहेत ॥ १४ ॥

सारांश, याप्रमाणें सर्व पदार्थांची ( जीवांची ) स्थिति, ही नदीच्या ओघाप्रमाणें प्रवाहरूपानें नित्य आहे. आणखी ज्ञान नित्य व एकरूप नसून तें दृश्यदर्शन झालें म्हणजे उत्पन्न होतें आणि भिन्न दृश्यें म्हणून तें ज्ञान भिन्न प्रकारचें असतें. सारांश, जीव नाना, लोक – कालदिकांचें नित्यच्या, पदार्थांच्या स्थितीचें प्रवाहरूप नित्यत्व आणि ज्ञानाचें अनित्यत्व व भेदयुक्तत्व याच गोष्टी खऱ्या आहेत, असें तूं मानीत असशील तर–तें योग्य नाहीं ॥ १५ ॥ कारण जीव नाना आहेत, लोक–कालादिक नित्य आहे, इत्यादि मानणें ठीक नव्हे. आणि 'ठीक आहे' असें जरी म्हटलें तरी शरीर धारण करणाऱ्या सर्व जीवांस अनेक जन्ममृत्युप्रभृति भिन्न भिन्न अवस्था प्राप्त होतात. त्या त्यांच्या जीवत्वामुळें नव्हे, तर त्यांचा शरिराशीं संबंध होऊन व कालाच्या संवत्सरादिकांशीं संबंध होऊन वृद्धत्वादि अवस्था उत्पन्न होतात म्हणून होय. नानात्वाचा हेतु ( कारण ) देहसंबंध व कालसंबंध आहे. जीव नाना नाहींत देह नाना आहेत. एकच देह बाल, तरुण, वृद्ध, दिसतो, याचें कारण काल होय. ॥ १६ ॥ शिवाय, येथें म्हणजे जीव स्वतंत्र आहे, असें म्हटलें तरी कर्म. करणारे लोकांस स्वातंत्र्य आहे असें दिसत नाहीं, आणि कर्मफलाचा भोक्ता सुख-दुःखांसंबंधानें स्वतंत्र नाहीं. कारण, जीव स्वतंत्र असता, तर त्यानें दुष्कर्म सुख वाईट फल देणारें कर्म केलें नसतें तसेंच तो स्वतंत्र असता, तर वाईट फलाचा उपभोगही त्यानें घेतला नसता. परतंत्र जो आहे, त्याला कोणता सौख्यद पुरुषार्थ साध्य करतां येईल ? ॥ १७ ॥ मोठा शहाणा विद्वान् असला तरी त्याला नेहमी शुद्ध सुख मिळतेंच असें नाहीं आणि मूर्खाला नेहमीं दुःखच भोगावें लागतें, असेंही नाहीं तेव्हां मी कर्म करण्याच्या व सुखदुःख भोगण्याच्या बाबतींत स्वतंत्र आहें, असा अभिमान बाळगणें व्यर्थ आहे ॥ १८ ॥

आतां सुखाची प्राप्ति अथवा त्याचा नाश होणार किंवा दुःखाची प्राप्ति अथवा निरास होणार, याचें ज्ञान जीवाला आहे, असेंही जरी समजलें, तरी असा कांहीं रामबाण उपाय त्यास सांपडला नाहीं कीं, ज्यायोगें मृत्यूचें येणें त्याला थांबवितां येईल ! ॥ १९ ॥ फांशीची शिक्षा झालेल्या अपराध्याला बधस्थानाकडे नेत असतां त्याला तें खाद्य दिलें किंवा 'देऊं' असें प्रामाणिकतः जरी सांगितलें, तरी त्या सुखकर भोगानें किंवा आशेनेंही सुख होत नाहीं. तसेंच, 'आपण मर्त्य, खास मरणार' असें ठाऊक असून त्याचें नित्य स्मरण असेल तर किंवा आज उद्यां मृत्यू येणार असें कळलें असेल तर, कोणत्या पदार्थाच्या प्रत्यक्ष लाभानें किंवा लाभाच्या आशेनें जीवाला सुख किंवा समाधान होईल बरें ? कोणत्याही नाहीं * ॥ २० ॥

आणखी, श्रुति स्वर्गफल सुखकारी आहे असें सांगते ना ? पण तें सुखही येथील सुखासारखेंच स्पर्धा, असूया, अपक्षय, नाश इत्यादि अनेक विघ्नकारी प्रसंगांनीं व दोषांनीं दूषित झालेलें असतें. शेतकीला जशीं अनेक विघ्नें, तशींच येथेंही. तात्पर्य, स्वर्गांत पुष्कळ सुख आहे, असें श्रुतीनें सांगितलें आहे खरें; पण तेथें विघ्नें फार म्हणून तें निष्फळच होय ॥ २१ ॥ समज कीं, श्रुतिप्रणीत यज्ञादि धर्माचें अनुष्ठान यथासांग झालें आणि त्या पुण्यानें तो याज्ञिक स्वर्गाला गेला तर तेथें त्याची स्थिति काय होते ती ऐक ॥ २२ ॥

देवांस प्रसन्न करणारे अनेक यज्ञ करणारा सुखेच्छु याज्ञिक स्वर्गाला जातो व तेथें स्वपुण्यानें संपादित असे दिव्य भोग देवांप्रमाणेंच उपभोगितो. पांढऱ्या शुभ्र विमानामध्यें मनोहर वेष धारण करून तो बसतो. त्याच्या सभोंवार अनेक दिव्यांगना बसल्या असून त्यांच्याशीं तो हास्यविनोदादि क्रीडा करीत आहे, गंधर्व सुंदर गायन करीत आहेत, आणि मनोहारी नाद करणाऱ्या घंटिकांनीं विभूषित असें तें विमान त्याच्या इच्छेनुसार सुंदर सुंदर वनोपवनांतून जात आहे, अशा प्रकारचे अनेक ऐंद्रियक सुखाचे उपभोगांमध्यें तो रमत रमत तल्लीन होतो. पण बिचाऱ्याला काय ठाऊक कीं, प्रत्येक सुखाचा उपभोग आपला पुण्यसंचय प्रत्येक क्षणीं कमी कमी करीत असतो ! उपभोगानें सांचविलेलें पुण्य अधिक भर न पडणाऱ्या धनाप्रमाणें कमी होतें आणि तें अजीबात संपलें म्हणजे त्याचा स्वर्गवास संपून तो अधःपतन पावतो. त्याची इच्छा स्वर्ग सोडण्याची नसते. परंतु कालाच्या सामर्थ्यापुढें म्हणा, निसर्गनियम घालून देणाऱ्या परमेश्वराच्या न्यायी इच्छेपुढें म्हणा, त्या बिचाऱ्या

---

**एकनाथः**—उठिल्या मरणांत व्यथा । जन धन अन्न आणि कांता ॥
सुख नेदितीच सर्वथा । जालीं वृथा समूळ ॥
अंतकाळीं स्त्री धन । जालीं दुःखासीच कारण ॥
त्यांसी सांडूनि न निघती प्राण । तळमळी जाण प्राणांतीं ॥ ( २० )

परतंत्र आणि पुण्यशून्य जीवाची मातब्बरी चालत नाहीं. पुण्य संपतांच तो खालीं पडतो ! ॥ २३–२६ ॥

पण जर तो वाईट लोकांच्या संगतींत राहून अथवा स्वतःच इंद्रिवश होऊन निषिद्ध आचरण करण्यांतच निमग्न असेल, वासनावश असेल, कृपण असून लोभी, स्त्रीकामुक, जीवांस त्रास देणार, अशास्त्र पशुवध करणारा, भूत, प्रेत, पिशाच यांची आराधना करणारा असेल, तर तो मेल्यावर अति दुःखद नरकलोकीं जातो. याच्यापेक्षांही गर्ह्य आचरण करणारा असल्यास पाषाणादि स्थावरतेला प्राप्त होतो * ॥ २७ ॥ २८ ॥

याप्रमाणें, उद्धवा ! देहद्वारा दुःखमूलक, दुःखपरिणामी आणि दुःख-स्वरूप कर्में करणारा मेल्यावर पुनः देह धारण करून जन्माला येतो आणि दुःख भोगतो ! सारांश, सकाम कर्मेच करणाऱ्या मर्त्य मानवाला यत्किंचित्ही शुद्ध सुख मिळणें शक्य नाहीं. कारण कल्प कल्पपर्यंत आयुर्दाय असणारे ' महः ' ' जनः ' प्रभृति लोक ( भुवनें ) आणि त्यांचे स्वामी यांसच काय, पण दोन दोन परार्ध आयुष्य असणाऱ्या ब्रह्मदेवालाही कालस्वरूप माझें भय असतें ॥ २९-३० ॥

---

**टीप**—प्रवृत्ति दोन प्रकारची. श्रुतीनें सांगितल्याप्रमाणें काम्य कर्मांमध्यें गुंतणें ही एक प्रवृत्ति किंवा श्रुतीच्या आज्ञा उल्लंघून अधर्माकडे जाणें, ही दुसरी प्रवृत्ति होय. गेल्या श्लोकांत काम्य प्रवृत्तीचा काय परिणाम होतो हें सांगितलें. अधर्मप्रवृत्तीचा काय परिणाम होतो तो २७ व २८ श्लोकांत सांगितला आहे. इंद्रियें वश नसलीं म्हणजे जीव वासनामय होतो. वासनामयत्वापासून कार्पण्य—दान न करण्याचें व्रत, त्यापासून लुब्धता म्हणजे भोग भोगण्याची अनावर इच्छा या अनावर इच्छेचा परिणाम बाहेरख्यालीपणा आणि बाहेरख्याली दुसऱ्याचा घात करणारी होते ॥ २७ ॥

---

**एकनाथ**—मज पतन होईल येथ । भोग जातील समस्त ॥
हेंही नाठवी त्याचें चित्त । कामासक्त जालासे ॥
दीपासी देतां आलिंगन । पतंगा नाठवे निजमरण ॥
तैसें नाठवे आत्मपतन । भोगीं मन विगुंतलें ॥ ( २५ )
जंव असे पुण्यसंपत्ति । तंव स्वर्गभोग भोगिती ॥
क्षीण जाल्या पुण्यशक्ती । पतन पावती तत्काळ ॥
जंववरी गांठीं असे धन । तंववरी वेश्येचें सौजन्य ॥
निःशेष वेंचल्या धन । मुख परतोन पाहेना ॥ ( २६ )

**एकनाथ**—प्रळयकर्त्या महाकाळासी । माझी काळसत्ता ग्रासी ॥
माझें महाभय सर्वांसी । लोकपाळांसी सुख कैंचें ॥ ( ३० )

उद्धवा ! गुण म्हणजे इंद्रियेंच कर्मे उत्पन्न करतात आणि मायेचें सत्त्व, रज, तम हे गुण विषम झाले म्हणजे इंद्रियांस कर्मप्रवृत्त करतात आणि बिचारा इंद्रियसंपन्न जीव सुखात्मक व दुःखात्मक कर्मफलाचा उपभोक्ता होतो ॥ ३१ ॥ तात्पर्य, जोंपर्यंत गुणवैषम्य असतें तोंपर्यंत जीव 'नाना आहेत' असा भ्रम असतो आणि हें नानात्व जीवाच्या पारतंत्र्याला कारण होतें * ॥ ३२ ॥

पारतंत्र्यांत राहणारे जीवाला ईश्वरभय असतें हें सांगणेंच नलगे. एतावता गुणवैषम्याची आराधना करणारे लोकांस येथें व स्वर्गात शोक आणि मोह यांच्या ताब्यांत सदैव गुलाम होऊन राहावें लागतें ॥ ३३ ॥ आणि वस्तुतः कालादि मजहून निराळे नसतां गुणांचा व्यतिकर म्हणजे मायेचा विस्तार झाला कीं काल, आत्मा, वेद, स्वभाव, धर्म अशीं नावें मला—ईश्वराला—संसारी लोक देत असतात ॥ ३४ ॥

उद्धव म्हणाला, हे समर्थ श्रीकृष्णा ! देहांतच उत्पन्न होणाऱ्या गुणांमध्यें वास्तव्य करणारा व वास्तव्य करूनही, स्वतंत्र व स्वयंप्रकाश देही म्हणजे आत्मा, गुणांनीं बद्ध होत नाहीं. तो स्वतंत्र म्हणावा तर त्याला बंध कसा प्राप्त होतो ? आणि तो जर बद्ध होत असेल, तर त्या बंधांतून सुटण्यासाठीं मुमुक्षूनें कसें वागावें ? कोणते आहारविहार करावे ? त्यानें घ्यावें काय ? टाकावें काय ? निजावें, बसावें, जावें कसें ? ह्या मुमुक्षूचीं लक्षणें कोणतीं ?

---

टीप —पूर्वपक्षामध्यें एक गूढ अभिप्राय म्हणून सांगितला कीं, प्रवृत्ति हीच कल्याणकारक आहे त्याला येथें उत्तर आहे. उत्तरार्धांतील 'एतत्' म्हणजे गुणवैषम्य व गुणवैषम्यानें उत्पन्न केलेलें कर्म व त्या कर्मानें फल. उपासना = सेवन करणें. ते संसारी लोक शोकमोहांत गोविले जातात; कारण कोणताही लोक नित्य नाहींच आहे ॥ ३३ ॥

स्वर्गादि लोक केवळ अनित्य असतात, इतकेंच नव्हे तर ते मायेनें—मिथ्यात्वानें—पूर्ण असतात, हें येथें सांगितलें आहे. स्वभाव म्हणजे देवत्वादि हा जो परिणाम होतो—देवत्वादि कार्य उत्पन्न होतें—याचें कारण माया. धर्म = सुखदुःखकारण. मायेचा क्षोभ झाला, गुणवैषम्य असलें कीं हींच नावें मला मिळतात ॥ ३४ ॥

टीप—श्रीकृष्णा ! जीवाला मुक्ति मिळते असें तुम्ही म्हणतां, ती मुक्ति सत्त्वादि-गुण विद्यमान नसूनच मिळते कीं ते गुण असूनही मिळते ? सत्त्वादि नसूनच असें म्हणाल तर जीवाला ज्ञान करून देणारा जो सत्त्वगुण त्याचा अभाव असल्यामुळें मुक्ति मिळणें शक्य नाहीं. बरें, गुण विद्यमान असा दुसरा पक्ष स्वीकारावा तर, गुणांमध्येंच राहणारा हा आत्मा गुणकार्य जो देह त्यांत उत्पन्न होणाऱ्या कर्मांमध्यें व कर्मजन्य सुखदुःखादींमध्यें बद्ध झालेला तो मुक्त कसा होणार ? या गुणांच्या पाशांत तो सांपडलाच पाहिजे, तेव्हां तो गुणांनीं बद्ध होतो. तात्पर्य, त्याला मुक्ति मिळणें अशक्य आहे. तुम्हीं म्हणाल कीं

---

**एकनाथ**—देह मी कर्म माझें । हें आत्मेनि स्वप्नां नेणिजे ॥
मृगजळीं बुडाले राजे । सत्य मानिजे तैसें हें ॥ (३१)

तें मला कृपा करून सांग. तूं सर्वज्ञ आहेस. नित्यमुक्त आत्माच अनादि गुणसंबंधामुळें नित्यबद्ध आहे असा मला भ्रम आहे, त्याचें निवारण कृपा करून कर ॥ ३५–३७ ॥

---

' आकाश जसें कोणत्याही वस्तुसंबंधामुळें बांधलें जात नाहीं, तें सदा मुक्तच असतें, त्याप्रमाणें आत्माही गुणादींनीं झांकला न गेल्यामुळें–बद्ध न झाल्यामुळें व स्वतंत्र असल्यामुळें-मुक्तच असतो. ' तर मी म्हणतों, गुणांशीं त्याचा संबंधच होत नाहीं म्हणून तो बद्ध होण्याचा संभवही नाहीं. अर्थात् मोक्षशास्त्र व्यर्थ होतें. तो बद्ध होतो असें म्हणाल तर त्या अनपावृताला, अपरिच्छिन्नाला, सर्वस्वतंत्राला बंध कसा होतो ? असा हा उद्धवाचा शंकात्मक प्रश्न या श्लोकांत आहे ॥ ३५ ॥

## दहावा अध्याय समाप्त

# अध्याय ११ वा

श्रीभगवान म्हणतात, उद्धवा ! बद्ध व मुक्त हे शद्ब माझ्या म्हणजे आत्म्या-संबंधानें उच्चारितात, परंतु ' आत्मा बद्ध आहे, तो मुक्त होतो ' हें म्हणणें माझ्या स्वाधीन असलेल्या मायागुणांनीं उत्पन्न होतें. अथवा सत्त्वादि, इंद्रियादि गुणांनीं मला म्हणजे आत्म्यासंबंधानें- उपाधीनें तें उत्पन्न होतें. वस्तुतः मी (आत्मा) बद्धही नाहीं व मुक्तही नाहीं. कारण, हे सर्व गुण मायेचे होत, आत्म्याचे नव्हेत. अर्थात् त्याला बंधमोक्ष मुळींच नाहींत ॥ १ ॥

शोक - मोहांची जोडी, सुख, दुःख, देहाची उत्पत्ति आणि मरण हीं सर्व मायेनें उत्पन्न होतात. स्वप्नातील शोक-मोहादि जसे मायिक, मिथ्या, तसेंच जागृतींतीलही होत. हा सर्व संसार आत्म्यावर आरोपित आहे. हा संसार वास्तविक पाहतां सत्य नाहीं. ' आत्मा संसारी, हे शद्ब मात्र आहेत; केवळ वाचारंभण आहे. संसारच वास्तविक नाहीं, मग आत्मा संसारी कसा होणार ? ॥ २ ॥

उद्धवा, माझ्याच मायेनें निर्माण केलेली विद्या व अविद्या ही जोडी म्हणजे माझ्या आविर्भावाच्या दोन शक्ति होत. या संसारी दृष्टीनें आद्य, परंतु आत्मदृष्टीनें अनिर्वचनीय म्हणून अनादि आहेत. अविद्या व विद्या यांची जोडी बंधमोक्ष उत्पन्न करिते व अज्ञानी व ज्ञानी देहधारी जीव बद्ध व मुक्त होतात ॥ ३ ॥

हे बुद्धिवंता उद्धवा, माझ्याच एका मात्र अंशानें स्थित असणाऱ्या या जीवाला अविद्येमुळें अनादि बंध असतो व विद्येमुळें जीव नित्यमुक्त असतो * ॥ ४ ॥

---

**टीप**—अविद्येमध्यें प्रतिबिंबित झालेला आत्माच जीवत्व पावतो. जीव म्हणजे उपाधींत दडलेलें आत्मप्रतिबिंब मात्र या प्रतिबिंबाला अविद्या ही उपाधि असते व तिच्याचमुळें उत्पन्न झालेला बंध म्हणजे संसार असतो; व जीवाला प्राप्त होणारी जन्म-मरणादि सुखदुःखें होतात. प्रत्येक जीवाची अविद्या म्हणजे उपाधि निराळी म्हणून तत्कृत बंधही निरनिराळे. आत्मा स्वेच्छेनें अविद्येंत पडतोसा दिसतो. नंतर त्याला अविद्या व तज्जन्य संसार खरा वाटतो आणि त्याप्रमाणें सुखदुःखें होतात. कोठेंही घोटाळा होत नाहीं. म्हटलें आहे:- " धुळ, धूर इत्यादींनीं युक्त असलेल्या एका घटाच्या आकाशांतील धूळ व धूर इतर घटांतील आकाशाला असत नाहींत, त्याप्रमाणें एका जीवाच्या अनुभवाला येणारीं सुखदुःखें सर्वांसच असत नाहींत. "हे अतिगूढ असणारें तत्व स्वबुद्धीनेंच निश्चित करून घ्यावें, असें सुचविण्यासाठीं 'बुद्धिवंता ! ' असें उद्धवाला कृष्णानें संबोधिलें आहे. श्लोकांतील ' इतर ' याचा अर्थ मोक्ष आहे ॥ ४ ॥

आतां विरुद्धधर्मी असणारे हे बद्ध व मुक्त एकाच जडांत म्हणजे देशांत राहून परस्परांहून किती विलक्षण असतात; आणि उभयतांच्या शरिराचा धर्म एकच परंतु विद्या व अविद्या यांनीं विलक्षणता उत्पन्न केल्यामुळें मुक्त व बद्ध, दक्षिणोत्तर ध्रुवाप्रमाणें परस्पर कसे विलक्षण होतात, तें, श्रीकृष्ण म्हणतात, हें मद्भक्ता वत्सा उद्धवा, तुला सांगतों * ॥ ५ ॥

शरीरतः एकासारखे एक असणारे, नित्य एकत्र राहणारे हे दोन पक्षी ( एक जीव व दुसरा शिव ) जणो स्वेच्छेनें वस्तुतः मायेमुळें एकाच वृक्षावर घरटीं करून राहतात. त्यांतील एक ( जिव ) पिप्पलान्नाचा ( वृक्षफळाचा ) उपभोग घेतो व दुसरा ( शिव ) कांहीं खात नाही तरी बळानें अधिक असतो ॥ ६ ॥ अन्न भक्षण न करणारा – उपभोग अभिनिवेशानें न घेणारा – विद्वान् आपण ( आत्म-स्वरूपतः ) निराळे आहों, अन्नाचा आपला संबंध नाहीं असें जाणतो व अज्ञानी जीव आपण अन्नसंबंधी आहों असें समजतो. अर्थात् जो विद्वान् असतो तो नित्यमुक्तच असतो; परंतु जो अविद्वान्, मायावश असतो तो मात्र नित्यबद्ध असतो ॥ ७ ॥ स्वप्नांतून जागा झालेल्या पुरुषाला ठाऊक असतें कीं, स्वप्नांत जो देह आपण पाहिला, त्या देहांत आपणच होतों, असें स्वप्नांत जरी वाटत होतें, तथापि तो देह आपला नव्हता. याप्रमाणेंच विद्वान् पक्केपणीं समजतो कीं देहांत आपण असलों, तरी आपलें देही हें स्वरूप नसून आपण स्वरूपतः अशरीरच आहो. परंतु कुमति जो आहे, संसारांत राहिल्यामुळें ज्याची विवेकशक्ति क्षीण झाली आहे, नव्हे भ्रष्ट झाली आहे, त्याला वाटतें कीं, आपण देहीच आहों, स्वप्न पाहाणारा स्वप्नकाळीं आपण हत्ती, वघा वगैरे कांहीं आहों व तेंच आपलें खरें स्वरूप आहे असें समजतो. वस्तुतः तें त्याचें स्वरूप नसतें. तसेंच देहत्व हेंच आपलें स्वरूप, अदेहत्व नव्हे, असें भ्रष्टमतीला वाटतें ॥ ८ ॥

आपलीं इंद्रियें आपआपले विषय घेत असतां व सत्त्व, रज व तम हे गुण सुख ज्ञान, दुःख, कर्म, आळस व अज्ञान हीं उत्पन्न करीत असतां जो विद्वान् म्हणून निर्विकार आहे त्यानें अहंभाव धरूं नये व तो या इंद्रिय - विषयांचे व सुखदुःखांचे ठिकाणीं अहंभाव धरीत नाहीं. तो अनासक्त असतो किंवा अहंभाव न धरल्यामुळें अविकृत, शुद्ध राहतो ॥ ९ ॥ दैवानें म्हणजे पूर्वजन्मार्जित प्रारब्धामुळें जें शरीर प्राप्त झालें, त्यांत राहणरा अज्ञानी, गुणजन्य म्हणजे गुणांनीं मात्र उत्पन्न झालेल्या कर्मांचा आपणच कर्ता आहों असें समजतो – हा नसता अभिमानच त्या अज्ञान्याच्या बंधाला कारण होतो ॥ १० ॥

---

**एकनाथ—** येथें विलक्षणता दों प्रकारीं । एक तो जीव ईश्वरामाझारीं ॥
एक ते जिवासी परस्परीं । बद्धमुक्त निर्धारीं निर्वास्त ॥ ( ५ )

विरक्त पुरुष निजणें, बसणें, फिरणें, स्नान करणें इत्यादि कर्मांमध्यें व दर्शन-स्पर्शन गंध—भोजन—श्रवणप्रभृति इंद्रियजन्य ज्ञानांमध्यें अज्ञानी मनुष्याप्रमाणें आसक्त असत नाहीं. संसारी जीवाप्रमाणेंच जीवन्मुक्तही विषयांचा उपभोग घेतो परंतु घटामध्यें राहूनही आकाश जसें परिच्छिन्न होत नाहीं, पाण्यांत प्रतिबिंबूनही जलतरंगांबरोबर सूर्यबिंब हालत नाहीं किंवा जाईजुईच्या ताटव्यावरून येणारा वाराही स्वरूपतः गंधयुक्त होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष प्रकृतींत राहून विषयसेवन करीत असतांना ' इंद्रियें विषय सेवन करतात, मी नाही, मनाला सुखदुःख होतें, मला नाहीं ' असें जाणतो म्हणून तो बद्ध होत नाहीं ॥ ११ ॥ १२ ॥ वासनाक्षय आणि अभिमानशून्यता प्राप्त झाल्यामुळें निर्मळ व स्वच्छ झालेली जी बुद्धिशक्ति तिच्या सामर्थ्यानें मुमुक्षु अनेकपणापासून निवृत्त होतो. जागा झालेला पुरुष जसा स्वप्नांतील विषय खोटे असा निश्चय करतो, तसाच अज्ञानांतून बाहेर आलेला मुमुक्षु ' एकच एक अद्वितीय आत्मा आहे. देहादि विषय व विश्व मुळींच नाहींत ' असा निश्चय करतो ॥ १३ ॥

याप्रमाणें बुद्धिप्रभृति सर्व इंद्रियें संकल्पशून्य झालीं, या इंद्रियांच्या वृत्तिही विषयशून्य झाल्या म्हणजे मुमुक्षु जीवन्मुक्त होतो. तो देहांत राहतो व जगांत वावरतो खरा; परंतु देहादि दृश्याचे गुण त्याला मुळींच बाधक होत नाहींत. ते त्याला सोडून जातात ॥ १४ ॥

त्याला कोणी दुष्टांनीं त्रास दिला किंवा सुष्टांनीं त्याची स्तुति केली, तरी त्याला त्या निंदास्तुतीपासून मुळींच विकार होत नाहीं. कोणीं इजा केली किंवा निंदिलें तरी विषाद नसतो व कोणीं वंदिलें म्हणून तो हर्षतही नाहीं ॥ १५ ॥

कोणी त्याला चांगलें केलें किंवा कांहीं दिलें, तर तो कोणाची स्तुति करीत नाहीं; किंवा कोणीं बुरें ( वाईट ) केलें वा निंदिलें, तर त्या दुष्टाची निंदाही करीत नाहीं ॥ १६ ॥ जो खरा मुनि आहे, तो निजानंदांत लीन असतो म्हणून तो कांहीं बरें किंवा बुरें करीत नाहीं, बोलत नाहीं, चिंतीतही नाहीं. जसा अचल पदार्थ म्हणजे धोंडा वगैरे स्वस्थ असतो, त्याप्रमाणें जीवन्मुक्तानें निःसंगवृत्तीनें असावें ॥ १७ ॥

वेदवेदांताची शाब्दिक चर्चा करणारा मोठा पंडित झाला पण ह्या पंडितानें कर्मयोग ज्ञानयोग वगैरे चित्तशोधक साधनांनीं व पुढें श्रवणादिकांनीं ब्रह्म-साक्षात्काराची खटपट केली नाहीं, तर त्याची ही सर्व तयारी त्याचें बोलघेवडें पांडित्य व्यर्थ आहे एखाद्यानें दुधासाठीं जर भाकड गाय पाळली तर त्याच्या पदरीं तिला पाळण्याच्या श्रमांपासून दुसरें कोणतें फल पडावयाचें आहेत ? ॥ १८ ॥

भाकड झालेली गाय किंवा दुष्ट भार्या किंवा सर्वथा पराधीन झालेला देह किंवा कुपात्राचें धन किंवा ईश्वराचें गुणसंकीर्तन न करणारी वाणी, ह्यांस जतन करणारांना, ह्या सर्व गोष्टी दुःखाला मात्र कारण होतात ॥ १९ ॥

ह्या अखिल अनंत कोटिब्रह्मांडांची उत्पत्ति, त्यांचीं स्थिति व त्यांचा संहार करणारीं जीं माझीं पवित्र चरित्रें आहेत अथवा जगत्कल्याणकारी माझे अवतार व जन्म आहेत त्यांचें भक्तिपूर्वक अखंड संकीर्तन करण्यांत जी वाणी रममाण होत नाहीं ती वंध्या स्त्रीप्रमाणें व्यर्थ होय. बुद्धिवंतानें असली वाणी बाळगूं नये ॥ २० ॥

असो; याप्रमाणें आत्मज्ञानाची इच्छा करणाऱ्या मुमुक्षु भक्तानें शास्त्राभ्यासानें विश्वांतील अनेकत्वाचा निरास करावा. चित्त शुद्ध ( निर्मळ ) करावें, मन मज सर्वगामीला समर्पावें आणि बाह्य विश्वापासून निवृत्त होऊन आत्म-स्थितीमध्यें सदैव असावें ॥ २१ ॥ हें जर साधेना, जर चंचल मनाला निश्चल ब्रह्मविषयक-वृत्ति येईना, तर येवढें तरी तूं कर कीं तूं जीं काय कर्में करशील तीं निरपेक्ष बुद्धीनें मला अर्पण कर. असें करूं लागलास, म्हणजे तुझें मन स्थिर होऊन हळूहळू ब्रह्मध्याना-कडे अखंड लागेल ॥ २२ ॥

नेहमीं सद्गुरूंवर व ते काय सांगतात त्यांवर श्रद्धा ठेव. माझीं जीं पापहारक मंगल चरित्रें आहेत, त्यांच्या कथा श्रवण करीत जा. तीं चरित्रें गात जा. त्यांचें ध्यान निरंतर कर आणि मी कसे अवतार घेतले, काय चरित्रें केलीं याचें प्रदर्शन कर म्हणजे माझें अनुकरण भक्तीनें स्वतः करून तें लोकांस दाखीव ॥ २३ ॥ मला अनन्यशरण ये, मलाच तुझीं धार्मिक, ऐच्छिक व आर्थिक कृत्यें समर्पण कर, माझ्यासाठींच तूं हीं धर्मादि तीन पुरुषार्थांचीं कर्में कर, म्हणजे उद्धवा ! पुराणपुरुष जो मी त्या माझ्या ठिकाणीं तुला अढळ भक्ति प्राप्त होईल आणि नित्य असणारा मोक्ष म्हणून जो चौथा पुरुषार्थ, तो तुला साध्य होईल. धर्म, अर्थ व काम हे तिन्ही पुरुषार्थ कर्मानें उत्पन्न होतात म्हणून त्यांचीं फळेंही नश्वर असतात ॥ २४ ॥

साधुसमागमानें माझ्या ठिकाणीं ज्याची भक्ति नित्य स्थिर झाली, जो माझीच दृढ उपासना करूं लागला, त्याला संतांनीं अत्यंत प्रेमानें गाइलेलें व स्वशिष्यांस प्रकट केलेलें माझें पद ( वैकुंठ, मोक्ष ) सहज म्हणजे सुलभतेनें मिळतें ॥ २५ ॥

हे उत्तमश्लोका ! पुण्यश्लोका ! जगदीश्वरा ! तुला मान्य असलेला साधु असतो कसा, तें मला सांग आणि त्या त्या संतानें आदरानें स्वीकारलेली भक्ति कोणत्या प्रकारची असली म्हणजे तुझ्या प्राप्तीला उपकारक होते, हेंही सांग ॥ २६ ॥ हे भगवन्, पुरुषोत्तम, देवदेवेश्वर ! कृपा करून ' साधु कसा ओळखावा, तुला प्राप्त करून देणारी तुझी संतनिर्दिष्ट भक्ति कशी असते, हें मला सांग; मी तुला शरण आलेला तुझा नम्र भक्त आहें ॥ २७ ॥ तूं शुद्ध, अव्यक्त व अक्षर ब्रह्म, परम निःसंग आकाशच, प्रकृति व पुरुष यांच्या पली-कडचा व प्रकृति-पुरुषांचा स्वामी आहेस आणि तूं आपल्या स्वेच्छेनेंच तुझ्या भक्तांची ( देव व मानवांची ) मनकामना पूर्ण करण्यासाठीं अवतार घेऊन हें व्यक्तिस्वरूप धारण केलें आहेस. म्हणून मज शरणागत भक्ताला खऱ्या भक्तीचें स्वरूप सांग ॥ २८ ॥

भगवान् म्हणतात, दयाळु, निर्वैर, सत्यग्राहक, निष्पाप, समवृत्तीचा, लोकसंग्राहक निष्काम म्हणून निर्मळ बुद्धीचा, इंद्रियदमन केलेला, मेणाहून मृदु, शुद्धाचारी, दारासुतांचा परिग्रह नसणारा, निष्क्रिय अल्पाहारी, शांत, स्थिर, सत्यासत्य निवडणारा माझा अनन्य भक्त होय ॥ २९,३० ॥ सावध, गंभीर, धैर्यवंत, निर्विकार, निरभिमानी गुणग्राहक, शिष्यचिंतानिवारक, जगन्मित्र, करुणहृदयी, साक्षात्कारी ॥ ३१ ॥ श्रुतिप्रणीत सर्व वर्णाश्रमधर्मांचे गुणदोष जाणून त्यांचा यथाप्रसंग त्याग करणारा व माझी आराधना अढळ चित्तानें व अनन्य भावानें करणाराच साधु माझा उत्तम भक्त होय ॥ ३२ ॥

मीं ( परमेश्वर ) कोण, कसा, केवढा आहें हें जाणणारे असोत अथवा नसोत, अथवा वारंवार जाणून किंवा न जाणूनहि जे माझी मात्र आराधना अनन्य भावानें करतात, ते खरे भक्तोत्तम मला आवडतात ॥ ३३ ॥ उद्धवा ! माझ्या रामकृष्णादि मूर्तींचें व माझ्या भक्तांचें सादर दर्शन घेणें, त्यांचे चरणांवर मस्तक ठेवून त्यांस आलिंगन देणें, त्यांची स्तुति करणें, नम्रतेनें त्यांचे गुणकर्मांचा ( चरित्रांचा ) जप करून संकीर्तन करणें, माझ्या कथा श्रद्धेनें ऐकणें, माझें ध्यान करणें, मला सर्व अर्पण करणें, माझें दासत्व पत्करून आपला आत्माही मला देणें ॥ ३४ ॥ ३५ ॥ माझ्या जन्माच्या व चरित्रांच्या कथा सांगणें, गीत, नृत्य, वादन, कथा यांच्या साहाय्यानें माझ्या देवालयांत जन्मकाळचे उत्सव करणें, आणि मीं पवित्र केलेल्या तीर्थांची सर्व पर्व काळीं यात्रा करणें, मला फुलें, तुळसी, नैवेद्य अर्पण करणें, वेदविहित दीक्षा घेऊन माझें व्रत धारण करणें हीं भक्तीचीं लक्षणें होत ॥ २६,२७ ॥

माझी पूजा अर्चा करण्याविषयीं श्रद्धा ठेवून पुष्पें व फळें मिळतील अशीं स्थळें निर्माण करणें क्रीडांगणें–नगरें–मंदिरें करण्याच्या कामीं स्वतः व दुसऱ्यांच्या साहाय्यानें उद्योग करणें ॥ ३८ ॥ सडासंमार्जन व सारवण यांच्या योगें आणि सुंदर कारंजीं, सुंदर रांगोळ्या इत्यादिकांच्या योगें माझ्या देवालयांची सेवा करणें, निष्कपटपणें माझें दास्य पतकरणें ॥ ३९ ॥ निरभिमानता, भोंदूपणाचा सर्वस्वीं अभाव, स्वकृतीसंबंधानें मौनव्रत, मला अर्पिलेल्या कोणत्याही वस्तूचा, फार काय पण दिव्याच्या प्रकाशाचाही आपल्या कामीं उपयोग न करणें ॥ ४० ॥ सारांश जें जें प्रिय म्हणून प्रसिद्ध आहे, जें जें स्वतःला अत्यंत प्रिय असतें, तें मला–परमेश्वराला–निष्काम भक्तीनें अर्पण केलें असतां मोक्षासारखें अनंत काल परमानंद ( चिदानंद ) देणारें फल मिळतें ॥ ४१ ॥

उद्धवा ! सूर्य, अग्नि, ब्राह्मण, गायी, वैष्णव, आकाश, वायु, जल, भूमि, आत्मा व सर्व भूतें ( प्राणिमात्र ) हीं माझ्या मंगल पूजेचीं स्थानें होत ॥ ४२ ॥ तिन्ही वेदांतील सूक्तमंत्रांच्या साहाय्यानें सूर्यामध्यें, हविर्भाग देऊन अग्नीमध्यें, स्वागत करून ब्राह्मणश्रेष्ठांच्या प्रीतीत, चारा घालून धेनूंत ॥ ४३ ॥ बंधुप्रेमाच्या सत्कारानें वैष्णवांत, नैष्ठिक ध्यानानें हृदयाकाशांत प्राण हाच मुख्य वायु असें समजून वायूंत, तिळतांदूळ घालून जलाच्या अर्पणानें जलाशयांत, रहस्यपूर्ण मंत्रसाहाय्यानें स्थंडिलांमध्यें ( भूमींत ), आत्म्याला

भोग्य विषय अर्पून स्वतःच्या आत्म्यांत, सर्व वस्तूचे ठायीं क्षेत्रज्ञ परमेश्वर आहे असें जाणून सर्व भूतमात्रांत मला पाहा; आणि माझें यजन म्हणजे अर्चन कर ॥ ४४,४५ ॥

" या स्थानामध्यें " शांत वृत्ति ठेवून ज्याच्या चारही हातांत शंख, चक्र, गदा व पद्म अशीं चार आयुधें आहेत, व ज्याचें स्वरूप शांत आहे असें ध्यान करावें व याप्रमाणें माझी पूजा करावी ॥ ४६ ॥ याप्रमाणें इष्टापूर्तानें म्हणजे सर्व कामना पूर्ण झाल्या आहेत असें जें समाधान, त्या समाधानानें जे माझें अहर्निश यजन करतात, त्या सर्वांस माझ्या ठिकाणीं उत्तमोत्तम भक्ति उत्पन्न होते. आणि साधु--सेवा केली असतां माझें स्मरणही त्यांस अखंड राहतें ॥ ४७ ॥ उद्धवा ! सत्संगतीमुळें भक्तियोग साध्य होऊन दृढ होतो आणि तदनुसार एकनिष्ठेनें आचरण केलें असतां भवसागर तरण्याचा मार्ग सुलभ होतो. अन्य चांगला उपायच नाहीं. संतांस माझा सतत आश्रय असतो म्हणून संतसंगति अवश्य हवी. कारण मीं तेथें असतोच ॥ ४८ ॥ असो. यानंतर अत्यंत गुप्त असें एक रहस्य, उद्धवा ! यादवा ! तुला सांगतों, तें ऐक. हें रहस्य यद्यपि प्रकट करण्या-सारखें नाहीं, तथापि तुला मीं तें सांगतां याचें कारण तूं माझा अनन्य भक्त, माझा मित्र आणि माझा प्रियकर अनुयायी आहेस ॥ ४९ ॥

**अकरावा अध्याय समाप्त**

# अध्याय १२ वा

उद्धवा ! योग, सांख्य, स्ववर्णाश्रमाचरण, वेदाभ्यास, तपश्चर्या, इष्टापूर्त, दक्षिणा हीं मला वश करूं शकत नाहींत ॥ १ ॥ * त्याचप्रमाणें व्रतवैकल्यें, यज्ञ, मंत्रतंत्रादि तीर्थयात्रा, यमनियमांचें पालन यांच्या योगही माझा अनुग्रह प्राप्त होत नाहीं; परंतु सर्व आसक्तींचा उच्छेद करणारी संतसंगतीच मला भक्तांचा दास करिते. सत्संगाव्यतिरिक्त सर्व व्यर्थ आहे ॥ २ ॥

निष्पाप उद्धवा ! वृत्र, प्रल्हाद, वृषपर्वा, बलि, बाण, मयासुर, बिभीषण यांसारखे दैत्य-राक्षस; सुग्रीव, हनुमान यांसारखे वानर व जांबुवंतासारखे अस्वल ( हेच मृग होत ); जटायुसारखे गिधाड पक्षी; तुलाधारासारखे वैश्य; धर्मव्याधासारखे अंत्यज (अस्पृश्य); कुब्जा दासी - गोकुळांतील गोपी - य ज्ञिकांच्या बायका यांसारख्या स्त्रिया, गंधर्व, अप्सरा, नाग, सिद्ध, चारण, गुह्यक, विद्याधर हे व आणखी दुसरेही रजोगुणी व तमोगुणी जीव त्या त्या युगांत संतसंगति करते झाले व संतानुग्रहानें मत्पदाला येऊन पोहोचले ॥ ३-६॥

ह्या वर सांगितलेल्या महाशयांनीं वेदाध्ययन केलें नव्हतें किंवा कोणा शास्त्रवेत्त्या गुरूची अथवा देवदेवतांची उपासनाही केली नव्हती; त्यांस व्रतांचें किंवा तपाचें साहाय्य नव्हतें. पण एक संतांचा सहवास त्यांच्या उपयोगीं पडला व तें मुक्त झाले. निदान सलोकता व सरूपता ह्या मुक्ति त्यांस मिळाल्या ॥ ७ ॥

गाई, गोप, वृक्ष, मृग, नाग, सिद्ध आणि दुसरे अनेक जडबुद्धीचे जीव केवळ एका सत्संगप्राप्त प्रेमश्रद्धेनें मत्पदीं सहज घेऊन राहिले ॥ ८ ॥

उद्धवा ! मोठ्या दीर्घप्रयत्नानें सांख्य व योग यांत नैपुण्य मिळविलें, दानें दिलीं, व्रतें केलीं, तपस्या केली, यज्ञ संपादले, प्रवचनें केलीं, भवति न भवति चालविली, वेदाभ्यास केला, संन्यासही घेतला तरी जें पद मिळत नाहीं, तें पद एका सत्संगानें मिळतें ॥ ९ ॥

अक्रूरानें मला बलरामासह मथुरेस नेण्यासाठीं रथांत बसविलें, त्या वेळीं माझ्या ठिकाणीं प्रेमसर्वस्वानें आपलें पूर्ण चित्त ज्या गोपींनीं अर्पण केलें होतें. त्या गोपींस माझा

---

* टीप–योग चित्ताची एकाग्रता. चित्तैकाग्रता करण्याचे शास्त्रालाही योग म्हणतात. पातंजल शास्त्र होय. यम, नियम, आसन, प्राणायम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि अशीं आठ अंगें या योगाचीं आहेत. चित्ताला एकाग्र करून आपल्याला इष्टतम असणाऱ्या ध्येयाचें अखंड ध्यान करण्यास योगानें सामर्थ्य येतें. योगाचे ' राजयोग व हठयोग ' असे दोन मार्ग आहेत. सांख्य म्हणजे तत्त्वाचा विवेक. सांख्यमतानें प्रकृति आणि पुरुष हीं दोन मुख्य तत्त्वें आहेत.

वियोग होणार हें पाहून दारुण शोक झाला. त्यांना वाटलें कीं, श्रीकृष्णाशिवाय अन्य कोणीही आपणांस सुखसाधन होणें शक्य नाहीं ॥ १० ॥

वृन्दावनांत राहणारा व गोपींच्या अत्यंत प्रेमाचें स्थान असणारा जो मी त्या माझ्यासह रासक्रीडा करतांना मोठमोठ्या रात्रि ज्यांस अर्ध्या क्षणासारख्या वाटल्या त्यांच रात्रि माझा विरह झाला तेव्हां त्यांस अनेक युगांप्रमाणें भासल्या. प्रेमातिशयानें कालस्थलांच्या उपाधींचा क्षय होतो तो असा ॥ ११ ॥ त्या गोपींचें अंतःकरण माझ्यावरील उत्कट प्रेमामुळे इतकें समरस झालें होतें कीं, त्यांस जवळ दूर हा भेद राहिलाच नव्हता. त्यांच्या सर्व वृत्ति एकरस झाल्या होत्या. स्वर्ग, मृत्यु, पाताळ, आपला देह, दुसऱ्याचा देह इत्यादि भेदांचें भान त्यांनीं प्रेमानें नष्ट केलें होतें. समाधींत असणारे मुनि जसे नामरूपाला पाहात नाहींत, पति जो सागर त्याशीं समरस झाल्यानंतर नद्या जसें आपलें माहेरचें नांव व स्वतःचें रूप टाकून देतात, तसेंच त्या गोपींनीं नामरूपात्मक मायाजन्य भेद टाकून दिले होते. हा प्रेममहिमा ! ॥ १२ ॥

त्या गोपींना कांहीं आत्मज्ञान नव्हतें. गरीब बिचाऱ्या स्त्रिया त्या. मी ब्रह्मरूप; पण त्यांनीं माझ्यावर मी त्यांचा रमण, त्यांचा उपपति अशी प्रेमपूर्ण नैष्ठिक दृष्टि अखंड ठेवली म्हणून माझ्या नित्य संगतीनें, हंसणें-बसणें इत्यादि हजारों प्रकारांनीं माझी संगति होऊन त्यांस ब्रह्मपद मिळालें ॥ १३ ॥

म्हणून उद्धवा ! तूं कर्म करण्यास सांगणाऱ्या श्रुतींचा, विधिनिषेधांचा, श्रवण-श्राव्यांचा सर्वथा त्याग कर. ही कर्माची कटकट व त्याच्या चर्चेची चर्पटपंजरी सर्व सोडून दे ॥ १४ ॥ आणि सर्व जीवांचा नियंता जो मी त्याला सर्व तनु-धन-मनानें आणि पूर्ण श्रद्धेनें शरण ये. म्हणजे तुला मग कळिकाळाचें मुळींच भय उरणार नाहीं ॥ १५ ॥

उद्धव म्हणाला, हे योगेश्वरांच्या प्रभो ! मीं तुझें भाषण लक्षपूर्वक ऐकलें; पण माझ्या मनांतील संशयाची मळमळ कांहीं जात नाहीं. वर्णाश्रमधर्म पाळावे म्हणून मघाशी सांगितलेंस आणि आतां कर्माचा त्याग सांगतोस ! तेव्हां तत्त्वार्थ काय आहे, हेंच मला समजत नाहीं. कर्म करावें कीं टाकावें, आत्मा कर्ता का अकर्ता या गोंधळांत माझें मन चंचल झालें आहे ॥ १६ ॥

उद्धवा ! तुझ्या जिवींचें गुज मी सांगतों, तें ऐक; म्हणजे तुझा संशय भुसासारखा उडून जाईल. अव्यक्त व अक्षर ब्रह्म स्वसृष्ट शरिरांत शिरून तें प्रगट होतांना त्यानें नाद व प्राण या उपधींचें ग्रहण केलें होतें ! जीवाच्या शरिरांत मूलाधारापासून तों आज्ञाचक्रापर्यंत सहा चक्रें आहेत, तीं तुला मागाहून समजावून देतों. आतां फक्त शरिरांत प्रविष्ट होऊन जीवचैतन्य ( शुद्ध ब्रह्म शरिरांत शिरलें कीं जीवस्वरूपी होतें ) अभिव्यक्त = व्यक्त = प्रकट कसें झालें तें पाहा. तें प्रथम मूलाधारचक्रापाशीं गेलें तेव्हां त्याची पहिली उत्क्रांति झाली. जो नुसता घोष होता, तो नादासह 'परा' रूपानें उत्क्रांत झाला. पुढील चक्रांवर जात असतां त्याला मनोरूप प्राप्त झालें व

नादाला पश्यंतीचें व मध्यमेचें रूप मिळून नंतर तो पांचव्या चक्रावर आला, तेव्हां त्याला वैखरीचें ( स्पष्ट भाषण करण्यास अवश्य लागणाऱ्या मात्रा, स्वर, वर्णाचें ) स्वरूप आलें. या प्रवासांत असतां प्राणाचेही प्राण, अपान, समान, उदान व व्यान ह्यांमध्यें विभजन झालेलें असतें. असो. त्या जीवाला वाणीचें व प्राणापानादिकांचें उपाधियोगें व्यक्त म्हणजे स्थूलरूप प्राप्त झालें ॥ १७ ॥

एका उदाहरणानें तुला ही उत्क्रांति तितक्यापुरती समजेल. आकाशामध्यें अति सूक्ष्म = अव्यक्त स्वरूपानें असणारा जो अग्नि त्याला ' ऊष्मा ' म्हणतात. तोच अग्नि लांकडांतही ऊष्मारूपानें असतो. दोन लांकडें एकमेकांवर जोरानें घांसलीं व त्यांचा सखा जो वायु त्याचें थोडेंसें उपकारक साहाय्य मिळालें म्हणजे स्फुलिंगाच्या रूपानें तो अव्यक्त अग्नि ( ऊष्मा ) व्यक्त म्हणजे प्रकट होतो. त्या स्फुलिंगाला आहुतींचें खाद्य मिळालें म्हणजे तोच ज्वालारूपी होतो. अव्यक्त ऊष्मा, सूक्ष्माणु, स्फुलिंग आणि रसरशीत निखारे अथवा धडाडणाऱ्या ज्वाला, हीं एकाच अग्नीचीं उत्क्रांत रूपें होतात. तसेंच नादब्रह्मरूपी जो मी त्या मला वाणीचें व्यक्त स्वरूप प्राप्त होतें, तेंही उपाधीमुळेंच होय. उपाधि निराळ्या असल्या कीं एकाच मूळरूपाला अनेक प्रकारचीं रूपें उत्क्रांतीनें प्राप्त होतात. ही भाषणाचीच सरणी सर्व कर्माला लावावी. पाह्य कर्म ( हाताचें ), गमन ( पायाचें ), उत्सर्ग ( मलमूत्रविसर्जक इंद्रियांचें ), या कर्मेंद्रियांच्या, शब्द स्पर्श, रूप, रस, गंध हे विषय अनुक्रमें असणाऱ्या कर्ण, त्वचा, नेत्र, जिव्हा, नाक या ज्ञानेंद्रियांच्या, तसेंच संकल्पात्मक मनाच्या, विज्ञानात्मक बुद्धीच्या, अभिमान धरणाऱ्या अहंकाराच्या, सूत्रात्मकत्व असणाऱ्या प्रधानाच्या उत्क्रांतीसंबंधानें वरील प्रकारच आहे. हें सर्व मींच उत्क्रांत होऊन विश्वरूप धारण केलें आहे. आणि हें विश्व सत्त्व, रज आणि तम यांच्या विकारांनीं नामरूपाला येऊन प्रकट झालें आहे ॥ १८ ॥ १९ ॥

उद्धवा ! एकच शुद्ध जीव ( आत्मा ) सत्त्वादि तीन गुणांचा आश्रय झाला म्हण, किंवा त्रिगुणांचा आश्रय जीवानें केला म्हण, जो एकच एक अद्वितीय अव्यक्त, अनादि, अनंत होता तो गुणाश्रित ( अथवा गुणाश्रय ) होतांच कालभावानें ब्रह्मांडाचा जनक होऊन ब्रह्मांड झाला. भिन्न भिन्न शक्ति आविर्भूत होऊन तो अनेक झाला आहे अथवा अनेकच आहे असा भासूं लागला. एकाच बीजाला क्षेत्र सुपीक मिळालें म्हणजे अनेकत्व प्राप्त होतें तें आपण पाहतोंच ॥ २० ॥ तंतूंच्या ताणाबाणांमध्येंच जसा पट ( वस्त्र ) असतो, तंतूंहून निराळा नसतो, त्याप्रमाणेंच ह्या एका जीवामध्येंच ( ब्रह्मामध्येंच ) हें निखिल विश्व ओतप्रोत भरलेलें आहे. आत्मव्यतिरिक्त तें नाहीं. असो. वस्तुतः ब्रह्मस्वरूपी असतांही हा व्यक्त आणि क्षर संसारवृक्ष, पुरातन, कर्मजन्मा व कर्मफळी आहे. याला दोन फळें येतात. एक मोक्ष आणि दुसरें येथील व स्वर्गातील भोग, हीं तीं दोन फळें होत ॥ २१ ॥ वृक्षाला जसे बीज, मूळ, नाळ, स्कंध, रस, शाखा, धरटीं, साल, फळें असतात व तो जसा गगनचुंबी वाढतो, त्याप्रमाणेंच संसारवृक्षाचीं पुण्य व पाप हीं बीजें,

वासना या मुळ्या, सत्त्व, रज, तम हीं कांडीं (नाळ), महाभूतें हे स्थाणु, शब्द–स्पर्श–रूप–रस–गंध हे या संसारवृक्षापासून पाझरणारे रस, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व मन ह्या अकरा फांद्या, जीव आणि शिव या दोन पक्ष्यांचीं या वृक्षावरील दोन घरटीं, त्वचेच्या आंत असणाऱ्या वात-पित्त-कफ या अंतसाली, आणि सुख व दुःख हीं फळें असून हा संसारवृक्ष अंतर्बाह्य व्यापून सर्व ब्रह्मांडभर पसरलेला आहे ।। २२ ।।

मागील श्लोकांत दोन फळें सांगितलीं. त्यांतील एक म्हणजे दुःखात्मक फल ग्राम्य गृध्र (अधाशी प्राकृत लोक) खातात, आणि दुसरें शुद्ध सुखात्मक फळ अरण्यवासी (संन्यासी, यांसच हंस म्हटलें. परमहंसच ते !) खातात. असो; उद्धवा ! स्वरूपतः एकच एक अद्वितीय असून जो मायेमुळें अनेकरूपी, भिन्नस्वरूपी दिसतो, त्याचें परमार्थत शुद्ध आत्मस्वरूप जो गुरुपासून समजून व उमजून घेतो, तोच वेदांचा खरा अभिप्राय म्हणजे त्यांचें तात्पर्य समजतो ।। २३ ।। हें असें परमात्मस्वरूप आहे. हें ज्ञान-विज्ञान सद्गुरूचा आश्रय करून त्याच्या एकनिष्ठ सेवेनें, परमेश्वरभक्तीनें आणि आत्मविद्येनें उद्धवा, समजून घे. विद्या (आत्मविद्या) ही तिखट सुरी (मुळांत कुऱ्हाड आहे) जीवाच्य सूक्ष्म-स्थूल देहांस (अज्ञानास) समूळ छाटून टाकते आणि बुद्धिवंत धैर्याचा जो दक्ष पुरुष आहे, त्याला आत्मस्वरूप मिळवून देते. हें आत्मस्वरूप मिळण्याच्या संधीला हें विद्यारूपी अस्त्र सुद्धां टाकून दिलें पाहिजे ।। २४ ।।

## बारावा अध्याय समाप्त

# अध्याय १३ वा

श्रीकृष्ण म्हणतात—सत्त्व, रज आणि तम हे गुण बुद्धीचे आहेत, आत्म्याचे नव्हत. हे गुण बुद्धीमध्यें असतात, आत्म्यांत मुळीं सुद्धां नसतात. म्हणून आत्म्यानें सत्त्वगुणाचें साहाय्य घेऊन रजोगुण आणि तमोगुण यांचा नाश करावा आणि आत्मज्ञानानें सत्त्वगुण शांत करावा. तात्पर्य, वैराग्यानें सत्त्वगुणही नाहींसा करावा. ॥ १ ॥ रजोगुण व तमोगुण नष्ट होऊन सत्त्वगुणाची वाढ झाली असतां जीवाला माझी अनन्य भक्ति प्राप्त होते व मद्भक्ति हाच त्याचा धर्म होतो. विप्र हो ! सात्त्विक पदार्थांची सेवा केली असतां सत्त्वगुण पुष्ट होतो व सद्धर्माची उदयपूर्वक प्रवृत्ति होते ॥ २ ॥ अतिश्रेष्ठ धर्म म्हणजेच सत्त्वाचा परमोत्कर्ष हा परम श्रेष्ठ धर्म रजतमांस बहिष्कार घालतो आणि अधर्माचा प्रसार करणारे हे उभयता नष्ट झाले म्हणजे तज्जन्य अधर्मही नाहींसा होतो ॥ ३ ॥ शास्त्रें, तीर्थें, पुत्रादि समाज, देश, काल, कर्म, जन्म, ध्यान, मंत्र आणि जातकादि संस्कार हे दहा पदार्थ गुणोत्पादक आहेत. तिन्ही गुणांचे कारक हे पदार्थ—विषय—होत ॥ ४ ॥

आतां, जें जें वयोवृद्ध—ज्ञानवृद्ध—तपोवृद्ध लोकांस प्रिय असतें, तें तें सात्त्विक आणि ज्याची ते निंदा करतात तें तामस होय, ज्याची हे लोक उपेक्षा करतात तें राजस होय ॥ ५ ॥ म्हणून शहाण्या पुरुषानें सत्त्ववृद्धि व्हावी यासाठीं सात्त्विक वस्तूंचा मात्र आश्रय करावा. कारण, सत्त्व वृद्धीनें धर्माचा उदय होतो. धर्मोदय होऊन तो वृद्धि पावला म्हणजे ज्ञान प्रगट होतें. आणि स्मृति म्हणजे हें ज्ञान आत्मसाक्षात्कारापर्यंत आणि प्रपंचकारणांचा अस्त होईपर्यंत प्रसृत होतें ॥ ६ ॥ वेळूंच्या एकमेकांवर घासण्यानें उत्पन्न झालेला अग्नि वेळूंचा व वनाचा नाश करून पुढें कांहीं दाह्य उरत नाहीं तेव्हां आपोआप शांत होतो, विझतो; त्याप्रमाणें गुणांच्या वैषम्यामुळें उत्पन्न झालेलें शरीरही गुणसाम्य झाल्यानंतर—देहाचें कारण जें गुणवैषम्य तें नष्ट झाल्यावर नाहींसें होतें ॥ ७ ॥

उद्धव म्हणतो—भगवान् ! अनेक प्रकारांनीं हे दृश्य विषय व त्यांचे उपभोग संकटांवर संकटें आणतात, हें ठाऊक असूल सुद्धां, ( घोडा खेचर वगैरे ) पशूंप्रमाणें मनुष्यें विषयांच्या उपभोग घेत राहतात, हा चमत्कार कसा उद्भवतो बरें ? उडी टाकली तर बुडणार खास, हें माहीत असणारीं माणसें दीनच्या भरल्या पुरांत उडी कां टाकतात ? ॥ ८ ॥

श्रीकृष्ण म्हणतात—सुखलालसेमुळें अविवेकी पुरुषाच्या अंतःकरणांत 'मी हिंदु आहें, ब्राह्मण आहें, मी कर्ता, मी भोक्ता' अशी मीसंबंधानें अयथार्थ बुद्धि उत्पन्न होते. ती भलती बुद्धि मनाला विकृत करते, आणि तें मन भयंकर रजोगुणांचा आश्रय करितें ॥ ९ ॥ मग हें रजोगुणाश्रित मन 'हें भोग्य आहे' 'हें सुखकर आहे' इत्यादि

विशिष्ट प्रकारचे अनेक—अनंत संकल्प करूं लागतें. हें असें गुणध्यान मनाला जडलें कीं त्या मंदबुद्धि पुरुषाचा काम (वासना) अनावर होतो ॥ १० ॥ पुढें हा इंद्रियांचें आकलन न करतां येणारा पुरुष वासनावश होत्साता दुःख मात्र उत्पन्न करणारीं कर्में जाणूनबुजून करूं लागतो. कारण त्याच्यावर रजोगुणाचा पगडा बसलेला असतो ॥ ११ ॥

परंतु रजस्तमामुळें भ्रष्ट झालेल्या बुद्धीच्या पुरुषानेंही जर विवेकाची बळकट कांस धरली, सावधपणानें मनाला डांबून टाकलें, तर 'विषयोपभोग दूषित आहेत' असें त्याला ज्ञान होतें आणि तो विषयांत लिप्त होत नाहीं ॥ १२ ॥ म्हणून सावधपणा ठेवून जितानें आपलें मन मला अर्पण करावें आणि तें तेथें स्थिर ठेवण्याचा अभ्यास हळूहळू करूं लागावें. उत्साहपूर्वक आसनाला स्थिर करून प्राणायाम केला असतां मात्र माझ्या ठायीं मन स्थिर करण्याचा अभ्यास सिद्ध होतो ॥ १३ ॥ उद्धवा ! हाच योग मी माझे सनकादि शिष्यांस उपदेशिला होता. सर्व विषयांतून मनाला बाहेर काढून माझ्या स्वरूपांत त्याला प्रविष्ट कसें करावें, हा योग मीं त्यांस जगताच्या आरंभीं सांगितला ॥ १४ ॥

उद्धव म्हणतो, हे देवा, श्रीकृष्णा, केशवा ! सनकादिकांस तूं केव्हां आणि कोणत्या अवतारीं आणि कशा स्वरूपाचा योग सांगितलास तें तुझें स्वरूप व योगस्वरूप तुझ्या जवळून ऐकण्याची मला इच्छा आहे ॥ १५ ॥

श्रीकृष्ण म्हणतात— हिरण्यगर्भाला, ब्रह्मदेवाला, चार सनकादि मानसपुत्र होते त्यांनीं एकदां स्वजनकाला योगाची अति सूक्ष्म आणि शेवटची गति म्हणजे स्वरूप काय असें विचारलें. त्यांचा प्रश्न असाः– ॥ १६ ॥

सनकादिक म्हणाले, प्रभो ! गुणांस विकारवश अंतःकरण प्रविष्ट होतें आणि गुणच वासनारूप घेऊन अंतःकरणांत शिरतात. तर मुमुक्षु जो आहे, ज्याला गुणातीत व्हावयाची इच्छा आहे, त्यानें या अन्योन्यांस कारक होणारें जें हें गुण व चित्त यांचें जोडपें, त्याचा त्याग कसा करावा ? ॥ १७ ॥

श्रीकृष्ण म्हणालेः—स्वयंभू म्हणजे आदि पुरुष, ब्रह्मांडाचा कर्ता, देवांचा देव जो ब्रह्मा त्यानें एकाग्र दृष्टीनें पुष्कळ विचार केला. परंतु तो कर्मबुद्धीचा असल्यामुळें ज्या अज्ञानामुळें हा प्रश्न उद्भवला त्या अज्ञानाचें ज्ञान नसल्याकारणानें, तात्पर्य, हा ज्ञानैकविषयक प्रश्न असल्याकारणानें त्याला समर्पक असमर्पक कांहींच उत्तर देतां येईना ॥ १८ ॥ तेव्हां हा प्रश्न उलगडण्यासाठीं तो देव माझें ध्यान करता झाला. त्या वेळीं मी हंसस्वरूप धारण करून त्याचेजवळ गेलों ॥ १९ ॥ मला पाहून ते सनकादि, ब्रह्मदेवास पुढें करून मजजवळ आले आणि सर्वांनीं मला वंदन केलें आणि 'तूं कोण ?' असा मला प्रश्न केला ॥ २० ॥ तत्त्वज्ञानाचीं मात्र जिज्ञासा असलेल्या त्या मुनींनीं मला 'तूं कोण ?' असा प्रश्न केला, तेव्हां मी जें काय त्यांना सांगितलें, तें उद्धवा तूं लक्ष देऊन ऐक ॥ २१ ॥

मी म्हणालों, विप्र हो ! तुम्ही ज्ञानीच आहांत. आतां मला सांगा कीं, वस्तुतः एकच एक अद्वितीय, भेदाभेदशून्य असा एकच जर आत्मा असेल, तर 'तूं कोण ?

असा प्रश्न उदयाला तरी कसा येतो ? 'तूं, मी' हा भेदच जेथें नाहीं, तेथें हा प्रश्न उद्भवेल कसा ? बरें, उत्तर देणारा जो मी' हा त्या मला उत्तर देण्याला देह, जाति इत्यादि कांहीं तरी हवें ना ? आत्मा एकच, दुसरें कांहींच नाहीं, तेव्हां निःशरीर जो आत्मा तो उत्तर कसें देणार ? ॥ २२ ॥

बरें ! येथें अनेकत्व वस्तुतः आहे, असें कल्पूं. आतां या अनेकत्वाचे मुख्य एकटें कारण पंचमहाभूतें ना ? तीं जर सर्वत्र समसमान आहेत तर असें एकच अभिन्न कारण विद्यमान असतां 'तूं कोण ?' हा भेदात्मक प्रश्न अर्थशून्यच होतो, तात्पर्य, हा अर्थशून्य म्हणून नुसती वाणीची पोकळ बडबड होय ॥ २३ ॥ तेव्हां तुमचा प्रश्न व्यर्थ आहे, मात्र परम कारण एकच आहे. आतां, मन, वाणी, नेत्र व दुसरीं इंद्रियें यांच्या द्वारा जें जें ग्रहण होतें, तें सर्व आत्माच आहे, अन्य कांहीं नाहीं, हें जाणून घ्या. म्हणजे 'तूं कोण ? याला सहज मिळणारें उत्तर हें कीं, 'सर्वात्मक-आत्मा.' याप्रमाणें तुमच्या 'कोण' या प्रश्नाला उत्तर मिळालें. ॥ २४ ॥

आतां, मुनि हो ! गुणांत चित्त व चित्तांत गुण प्रवेश करतात हें स्पष्ट आहे. परंतु हे गुण आणि चित्त मिळून मदात्मक जो जीव, त्याचा देह होतो. गुणांचा व चेताचा जिवाशीं मुळींच संबंध नाहीं, देहाशीं आहे. जीव देहविलक्षण आहे ॥ २५ ॥ तेव्हां, वारंवार गुणसेवा केल्यामुळें गुणांत प्रवेश करणारें अंतःकरण आणि वासना-रूपानें अंतःकरणांत शिरणारे गुण, या उभय उपाधींचाही त्याग मदात्मक झालेला ज्ञानी जीव करतो, आणि मद्रूप होऊं इच्छिणाऱ्या साधकानेंहि तो करावा ॥ २६ ॥

जागृति, स्वप्न व निद्रा या तिन्ही अवस्था तीन गुणांनीं ( सत्त्वादिकांनीं ) बुद्धींत उत्पन्न होतात. तात्पर्य, या बुद्धीच्या अवस्था होत. या अवस्थांहून जीव अति विलक्षण आहे. कारण, या तीनही अवस्थांचा साक्षी तो जीव आहे. अर्थव नाटक पाहणारा नट नसतो, तसा झोंपेचा द्रष्टा झोंप नव्हे, किंवा स्वप्नाचा द्रष्टा स्वप्न नव्हे. जागृतीचाही द्रष्टा तोच, म्हणून तो जागृति नव्हे त्याच्या या अवस्थाही नव्हत. जागृत्यादि अवस्था बुद्धीच्या मात्र होत ॥ २७ ॥ म्हणून आत्म्याला जागृत्यादि गुणवृत्ति देतोसा वाटणारा ज्या अर्थी हा संसारबंध आहे, त्या अर्थी माझ्या ठिकाणीं तुरीया अवस्थेंत राहावें आणि संसारबंध तोडून टाकावा. संसृतिबंध सुटला असतां गुण व चेत या उभयतांचा त्याग होतो ॥ २८ ॥ हा बंध अहंकारकृत असून आत्म्याला भलतेच स्वरूप देणारा आहे हें जाणावें; आणि सर्वथा निवृत्त होऊन मुमुक्षूनें तुरीयेमध्यें राहावें, म्हणजे संसारचिंता टाकून द्यावी. अहंकार आत्म्याला बद्ध करून दुःख देतो. मुमुक्षूनें हें समजून घ्यावें, तुरीयावस्थेंत असावें आणि अज्ञानजन्य संसृतीचा अभिमान सोडावा ॥ २९ ॥ 'अनेक आहे' ही बुद्धि अनेक युक्तींच्या साहाय्यानें नष्ट झाली नाहीं तोंपर्यंत अनेकत्वाचा अभिमान धरणारा अज्ञ पुरुष जागेपणींच स्वप्नांत

असतो. म्हणजे पदार्थ मुळींच नसतांना पाहातो. स्वप्नांतील पदार्थ पाहणारा स्वप्नस्थही आपण जागें आहों, असेंच समजतो ॥ ३० ॥

आत्मव्यतिरिक्त दुसरे पदार्थ नाहींतच. तेव्हां त्या नसत्या म्हणजे मिथ्या पदार्थांनीं केलेले भेद, त्यामुळें प्रवृत्त झालेलें कर्म, त्या कर्मांचीं फलें, हें सर्व सप्नसृष्टीसारखें खोटें आहे ॥ ३१ ॥ कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें यांच्या द्वारें जो जीव क्षणभंगुर देहादींचा व सुखदुःखांचा बाहेरील सृष्टींतील उपभोगरूपी अनुभव जागेपणीं घेतो, तो जीव तसल्याच भोग्य विषयांचें सुखदुःख स्वप्नांत अनुभवतो. व जो जीव सर्व उपभोग उपसंहृत झाल्यामुळें लय पावले आहेत असा अनुभव घेतो; तो निद्रेंत तसाच अनुभव घेतो; तात्पर्य, या तीनही अवस्थांचा द्रष्टा जो जीव तो सर्वद्रष्टा एकच असतो. हें त्याचें एकत्व स्मरणानें ठरतें. 'जो मी निद्रेंत द्रष्टा होतो असें मला स्मरण आहे, ज्या मी साक्षी होऊन स्वप्न पाहिलें, तो मी मीच असें मला स्मरण आहे आणि जागृतकाळीं सर्व सुखदुःखांच्या उपभोक्त्याचा साक्षी मीच हा प्रत्यक्ष अनुभव आहे. म्हणून तिन्ही अवस्थांचा द्रष्टा एकच असतो असें समजा ॥ ३२॥ गुणांचें साहाय्य घेऊन माझ्याच मायेनें माझ्यामध्येंच मनाच्या सात्त्विक, राजस, तामस, असें अनुक्रमें स्वरूप असणाऱ्या जागृति, स्वप्न, सुषुप्ति, या अवस्था उत्पन्न केल्याश दिसतें असें विचारतः ठरवून पुरुषानें निश्चितार्थ म्हणजे 'ब्रह्म व आत्मा यांचें ऐक्यच' आहे, या सिद्धांताचें निश्चित ज्ञान करून घ्यावें. अनुमानें, आप्तवाक्यें यांच्या मदतीनें प्रकट झालेल्या ब्रह्मात्मैक्यरूप तीक्ष्ण धारेच्या खड्गानें संशयाचें माहेरघर असणाऱ्या अहंकाराचा शिरच्छेद करावा आणि हृदयांत नित्य राहणारा जो मी त्याचें भजन करावें ॥ ३३ ॥

हें अखिल विश्व म्हणजे भ्रमाचा बाजारच आहे. कारण मनानें मात्र निर्मिलेला, नुसता आभास मात्र, क्षणभंगुर, अतिचंचल आणि जसा नाहीं तसा भासणारा हा विश्वपसारा आहे. मुलें कोलीत घेऊन गरगर फिरवितात, तेव्हां एक तेजोवलय--तेजाचें चक्र- दृष्टीस पडतें, पण तें असतें काय ? नाहीं. तसाच म्हणजे अलातचक्रासारखा हा विश्वपसारा आहे. खरोखरच पाहातां एकरूप विज्ञान मनोनिर्मित आहे; पण तेंच अनेक रूपी भासतें. हीच माया अर्थातच तीन गुणाच्या उत्क्रांतीनें उत्पन्न केलेला हा भेद म्हणजे केवळ स्वप्न आहे, हें यथार्थ ज्ञान मुमुक्षूनें करून घ्यावें. श्रुति, सद्गुरु यांच्या साहाय्यानें हें ज्ञान मिळतें व निजरूप प्रगट होतें ॥ ३४ ॥ नंतर मुमुक्षूनें संसाराकडे पाठ फिरवावी, निवृत्ति म्हणजे वैराग्य आदरावें, आशांस-मनीषांस ठार करावें, निष्क्रिय व्हावें आणि निजरूपाच्या आनंदानुभवामध्यें लीन व्हावें. हेंच मनन निदिध्यासन होय. आता केव्हां केव्हां हें दृश्य जगत् ज वन्मुक्ताला दिसेल, त्याला भूक लागेल, झोपही येईल परंतु हें दृश्य वस्तुतः कांहींच नव्हे, असें ज्ञान असल्यामुळें याला भ्रम, शोक, मोह, होणार नाहींत. बाकी यावज्जीव ( अथवा यावद्देह ) त्याला पूर्वसंस्कारामुळें विषयाचें स्मरण होईल; पण हें स्मरण त्याला मोहादि उत्पन्न करणार नाहीं. भाजलेलें बीं उगवत नाहीं हा अनुभव आहेच ॥ ३५ ॥

तात्पर्य, सिद्ध पुरुषाला आत्मसाक्षात्कार झाला असल्यामुळें त्याचा तो नश्वर देह पडला किंवा उभा आहे वगैरेची त्याला जाणीव नसते. दारू पिऊन बेभान झालेल्याला कंबरेचें वस्त्र सुटलें आहे कीं तसेंच आहे याचें भान नसतें. तसें 'ब्रह्मानंदीं लागली टाळी कोण देहातें सांभाळी' अशी सिद्धावस्था असते ॥ ३६ ॥

हा देह जो जिवंत राहतो, तो प्रारब्ध कर्माचा उपभोग पुरा होईपर्यंतच. दैव म्हणजे पूर्वसंचित पुण्यपापसंचय. यांपैकीं जें कर्म फलोन्मुख होतें, त्यालाच प्रारब्ध म्हणतात. हा देह सायुध आणि सशक्तिक असला तरी तो 'स्वप्नांतील अज्ञानविलास मात्र आहे' असें समाधियोग प्राप्त होऊन आत्मसाक्षात्कार झालेल्या पुरुषास ठाऊक असतें; म्हणून तो या मृगजळतुल्य मिथ्या गोष्टींच्या मागें पुनः कधीं जातच नाहीं ॥ ३७ ॥

विप्र हो! तुम्हांला सद्धर्माचें स्वरूप काय आहे, हें समजून द्यावें म्हणून यज्ञस्वरूपी भगवान् जो विष्णु, तोच मी हंसरूपानें आलों आहें असें जाणा. मीं तुम्हांला सांख्याचें म्हणजे जो नित्यानित्यविवेकाचें व त्याचप्रमाणें ब्रह्म आणि जीव यांचा योग कसा समजून घ्यावा हें सांगणाऱ्या योगाचें हें गुप्त रहस्य आतांपर्यंत सांगितलें आहे ॥ ३८ ॥ योग, सांख्य, सत्य, ऋत, तेज, श्री, धी, कीर्ति दम या सर्वांचें आश्रयस्थान मी आहें हीं सारीं शेवटीं माझ्याकडेच येऊन लय पावतात. सत्य = यथार्थ बोलणें, ऋत = श्रुतीनें आज्ञापिलेला नियम. टीकाकार निराळे अर्थ करतात ॥ ३९ ॥ आतांच सांगितलेले सर्व गुण मला निर्गुणाला, सर्वस्वतंत्रालाच भजतात. त्यांतच समता, असंगताप्रभृति गुणही मिळवावे. कारण मी त्या सर्वांचा निरपेक्ष हितकर्ता आहें, सर्वांच्या प्रेमाचें अंतिमस्थान मीं आहें, सर्वांचा आत्मा मीच आहें. माझे आश्रयाला येणारे गुण नित्य आहेत ॥ ४० ॥

ह्या माझ्या अशा तऱ्हेच्या उपदेशानें सनकादिकांचे संशय नाहींसे झाले. त्यांनीं परम भक्तीनें माझें यथासांग पूजन केलें आणि मत्स्तुतिपर स्तोत्रेंही म्हटलीं ॥ ४१ ॥ त्यांच्या पूजेचा व स्तुतीचा स्वीकार करून त्या महर्षींचा मीं निरोप घेतला आणि ब्रह्मदेव पाहात असतां असतां मी निजधामाला गेलों ॥ ४२ ॥

## तेरावा अध्याय समाप्त

# अध्याय १४ वा

उद्धव म्हणतो, हे कृष्णा ! ब्रह्मचर्चा करणारे विद्वान् अनेक प्रकारचे मोक्ष वा त्यांचीं अनेक साधनें सांगत असतात. तेव्हां ते मोक्ष व तत्साधनें विकल्पतः = विकल्पानें सर्वच प्रधान किंवा त्यांतील एक मात्र मुख्य असून बाकीचीं सर्व गौण आहेत. ॥ १ ॥ तूं तर एक निष्काम भक्तियोगच ' मुख्य ' म्हणून सांगितलास. सर्वसंगपरित्याग करून ज्या योगें तुझ्या ठिकाणीं मात्र मन प्रविष्ट होऊन स्थिर होतें असा भक्तियोगच ' मुख्य ' म्हणून तूं सांगितलेंस. म्हणून हे देवा, प्रश्न असा कीं, ब्रह्मचर्चा करणाऱ्यांचा पक्ष खरा, किंवा तुझा खरा ? ॥ २ ॥

श्रीभगवान् म्हणतात उद्धवा ! वेद नांवाची ही वाणी कालाच्या ओघांत प्रलयप्रसंगीं नष्ट झाली. तेव्हां या सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मदेवाला वेदवाणीला अनुरूप असाच उपदेश मीं केला. त्या उपदेशांत ज्या मोक्षदायक शुद्ध धर्माचें मी प्रणयन केले, तोच धर्म केवळ मत्पर आहे ॥ ३ ॥ पुढें तो वेदप्रणीत धर्म ब्रह्मदेवानें आपल्या पुत्राला म्हणजे मनूला सांगितला. मनु हा तुमचा-आमचा म्हणजे सर्व मानव जातीचा पूर्वज आहे, हें तुला ठाऊकच आहे. त्या मनूपासून सप्तर्षि जे भृगुप्रभृति त्यांस हा धर्म प्राप्त झाला. हे सर्व ब्रह्मर्षि होते, प्रजापति होते व पितर होते ॥ ४ ॥ त्यांपासून परंपरेनें देव, दानव, गुह्यक,- मनुष्य, सिद्ध, गंधर्व, विद्याधर, चारण, किंदेव, किन्नर, किंपुरुष, नाग, राक्षस इत्यादींस हा धर्म प्राप्त झाला. पण सत्त्व, रज, तम या गुणांच्या वैषम्यामुळें या सर्वांच्या प्रकृति व स्वभाव भिन्न भिन्न होते हें ध्यानांत ठेव ॥ ५ ॥ ६ ॥

या प्रकृतींच्या व स्वभावांच्या वैचित्र्यामुळें त्यांच्या त्यांच्या बुद्धींतही फेर पडला म्हणून अर्थातच जशी प्रकृति, तशा विचित्र वाणीही उदयास आल्या ॥ ७ ॥ याप्रमाणें प्रकृतिवैचित्र्यामुळें मतिवैचित्र्य परंपरेनें वाढत गेलें. कित्येक पाखंडी म्हणजे नास्तिक बुद्धीचेही झाले व होतात ॥ ८ ॥

नरश्रेष्ठ उद्धवा ! माझ्याच मायेनें मूढ झालेले पुरुष नाना प्रकारचीं श्रेयें सांगतात. कारण त्यांचें कर्म व त्यांच्या आवडीनिवडी भिन्न असतात. अर्थात् त्यांचीं श्रेयेंही कर्मानुसार भिन्न होतात ॥ ९ ॥ पाहा कीं, कोणी सकाम धर्माला, कोणी यशाला, दुसरा वाऱ्नेला, तिसरा सत्याला, दयेला किंवा शमाला, कोणी स्वार्थाला, कोणी ऐश्वर्याला, कोणी संन्यासाला, कोणी विषयांच्या उपभोगाला, तर कोणी यज्ञाला, तपाला, दानाला, व्रताला, नियमांना, यमालाच महत्त्व देतात ॥ १० ॥ परंतु उद्धवा ! ध्यानांत ठेव कीं, आतांच सांगितलेल्या मार्गांनीं उत्पन्न होणारे जे फलप्रद लोक ( स्वर्गादि ) ते नित्य नाहींत, अनाद्यनंत नाहींत. कारण ते कर्मांनें उत्पन्न झालेले, दुःखस्वरूप, अज्ञाननिष्ठ, अल्प आनंद देणारे आणि मत्सरादिकांनीं दूषित असतात ॥ ११ ॥

सच्छिल उद्धवा ! ज्यानें सर्वथा निष्काम होऊन मला आत्मसर्वस्व अर्पण केलें. मदात्मकच जो आनंदरूप झाला, त्याला जें उत्तमोत्तम सुख मिळतें तें विषयोपासकांस केव्हांही मिळत नाहीं ! ॥ १२ ॥ मन व इंद्रियें यांस दास करणारा, समचित्त, मद्भक्तींतच संतोष मानणारा माझा भक्त, जरी दरिद्री असला, तरी त्याला सर्वत्र सर्वदा हें विश्व सुखमयच दिसतें; व तो आनंदी असतो ॥ १३ ॥

माझ्याशिवाय त्याला दुसरें कांहीं नको असतें. तो ब्रह्मदेवाच्या, महेंद्राच्या भुवनांस व तेथील सुखास तुच्छ मानतो. अर्थात् त्याला पृथ्वीचें चक्रवर्तित्व किंवा पाताळाचें आधिपत्य कुच किंमतीचें तो योगसिद्धींकडे ढुंकून सुद्धां बघत नाहीं. फार काय ? जन्ममरण नाहींसें व्हावें असें सुद्धां – याकडे सुद्धां – तो लक्ष देत नाहीं. हाच माझा परमभक्त होय. मीच त्याला श्रेयस्व वाटतों. त्याचा निश्चयही तसाच असतो ॥ १४ ॥ उद्धवा ! जो तूं परमभक्त म्हणून मला जसा प्रिय आहेस, तसा माझा मित्र शंकर नाहीं, माझा पुत्र ब्रह्मदेव नाहीं, माझा बंधु बलराम नाहीं, माझी अर्धांगी लक्ष्मीही नाहीं. फार काय, माझा आत्माही मला तुझ्याइतका प्रिय नाहीं ॥ १५ ॥

बा उद्धवा, निष्काम ( कांहीं न मागणारा ) शांत, अद्वेष्टा, समदृष्टि अशा माझ्या भक्ताच्या मागें मी नित्य असतों. हेतु हा कीं, त्याच्या चरणधूलीनें मी स्वतः पवित्र व्हावें ॥ १६ ॥ अत्यंत दरिद्री परंतु मच्चित्त असणारे शांत, निरभिमानी उदार, लोकहितरत, वासनातीत अशा माझ्या अनन्य भक्तांस जें माझें निरपेक्ष-स्वतंत्र सुखसर्वस्व मिळतें, तें इतर बापुड्यांस काय ठाऊक ? ॥ १७ ॥

माझा भक्त इंद्रियवश असलाच तर त्याला प्रथम विषय पीडा देऊं इच्छितील, व दुःखही होईल परंतु मद्विषयक भक्ति जशी जशी प्रगल्भ होत जाईल तसतसें त्याला दुःख देणारें विषयसामर्थ्यही नष्ट होत जाईल ॥ १८ ॥ अग्नि चांगला पेटला म्हणजे जसा सर्पणाची राखरांगोळी करतो, त्याप्रमाणें मद्विषयक भक्ति सर्व पापांची सर्वथा राखच करते ॥ १९ ॥

निष्काम व ज्ञानयुक्त अशी माझी उज्ज्वल भक्ति जशी मद्भक्ताला माझें स्वरूप प्रकट करून त्याला मद्रूप करते, तसें सामर्थ्य योगाला नाहीं, सांख्याला नाहीं, धर्माला स्वाध्यायाला, तपाला, त्यागाला, यज्ञालाही नाहीं ॥ २० ॥ संतांचा प्रिय आत्मा-जो मी, तो एका श्रद्धायुक्त भक्तीला मात्र वश होतो. माझी एकनिष्ठ भक्ति जन्मानें चांडाळ असणाऱ्याला सुद्धा शुद्ध करते ॥ ॥२१ ॥ परंतु माझी भक्ति ज्याला नाहीं, त्याला सत्य व दया यांनीं अलंकृत असलेला धर्म म्हण, किंवा तपःसिद्ध विद्या म्हण, ह्यांपैकीं दोघीही सर्वथा शुद्ध करीत नाहीं ॥ २२ ॥ उद्धवा ! भक्तीच्या उत्कर्षानें उत्पन्न होणारा सर्वांगावर रोमहर्ष, चित्ताचें विरघळणें नेत्रांतून अश्रुप्रवाह वगैरे अंतःकरण प्रेमार्द्र झाल्याचीं चिन्हें असतात, त्याची भक्तिविना चित्तशुद्धि होणार तरी कशी ? ॥ २३ ॥

वाणी सद्गदित झाली आहे, चित्त प्रेमार्द्र झालें आहे, जो प्रेमातिशयानें पुष्कळसा रडत आहे, केव्हां हंसत आहे, लज्जा फेंकून दिली आहे, गात आहे, नाचत आहे, उडत आहे, असा माझा एकनिष्ठ भक्त, उद्धवा! सर्व जगाला शुद्ध करतो; मग त्याच्या शुद्धीची गोष्ट काय सांगावी ? ॥ २४ ॥ अग्नींत तावलेलें सुवर्ण आपला अगंतुक मळ टाकून देतें आणि आपलें स्वरूप पुनः धारण करतें, त्याप्रमाणें माझ्या भक्ताचा आत्मा मद्भक्तिरूप अग्नीमध्यें आपली वासनाजन्य कर्मसंचयानें दूषित झालेली चित्तवृत्ति होमून टाकतो आणि मत्स्वरूपास म्हणजे आत्मस्वरूपाला प्राप्त होतो ॥ २५ ॥ कारण, माझ्या पवित्र कथांच्या अखंड श्रवणानें व मननानें माझ्या भक्ताचा आत्मा जसजसा शुद्ध होत जातो, तसतसें त्याच्या आत्म्याचें सूक्ष्म स्वरूप प्रकट होत जातें. अंजन मिळालें म्हणजे डोळ्यांस अदृष्ट वस्तु दिसतात, तसेंच ज्ञानयुक्त भक्तीचें अंजन मिळालें म्हणजे मनाला व डोळ्यांनीही अज्ञेय आत्मदर्शन प्रत्यक्ष होतें ॥ २६ ॥

विषयचिंतकांचें चित्त विषयासक्त होतें. मच्चिंतकांचें चित्त नित्य मजमध्यें लीन होऊन मद्रूप होतें ॥ २७ ॥ म्हणून स्वप्नगत मनःकल्पित पदार्थांप्रमाणें मिथ्या असणाऱ्या विषयांचें ध्यानभजन सोडून दे; आणि माझीच भावना केल्यामुळें पवित्र झालेलें तुझें मन माझ्या ठिकाणीं स्थिर कर ! ॥ २८ ॥ स्त्रियांची व स्त्रैणांची संगती अजीबात सोडून देऊन बुद्धिवंतानें ( मनोजय केलेल्या मद्भक्तानें ) सुरक्षित अशा एकांतस्थळीं उत्साहपूर्वक माझें ध्यान करावें ॥ २९ ॥ स्त्रियांचा व स्त्रैणांचा समागम पुरुषाला जितके क्लेश देतो व जसा बद्ध करतो, तसे क्लेश व तशी बद्धकता दुसऱ्या कोणत्याही संगतीनें होत नाहीं. म्हणून स्त्रीसमागम भक्ताला वर्ज्य होय. तात्पर्य, ज्ञानपूर्वक भक्ति हेंच मुख्य साधन होय ॥ ३० ॥

उद्धव म्हणाला, हे कमलनेत्र श्रीकृष्णा ! तुझ्या मुमुक्षु भक्तानें तुझें ध्यान कशा पद्धतीनें, कोणतीं विशेषणें आदरून, कोणात्या आत्मस्वरूपानें कसें करावें, हें कृपा करून मला सांग ॥ ३१ ॥

श्रीकृष्ण म्हणतात उद्धवा अतां तुला ध्यानपद्धतीचा प्रकार सांगतो, तो ऐक. एकाच पातळीच्या सुखासनावर बसून, शिर, नेत्र व छाती एका रेषेंत आणावीं. हात मांडीवर ठेवावे, दृष्टि नासिकाग्रीं लावावी ॥ ३२ ॥ नंतर पूरक, कुंभक, रेचक करून अथवा रेचक, कुंभक व पूरक करून प्राणाच्या गमनाचा मार्ग शुद्ध करावा; जितेंद्रिय असावें ॥ ३३ ॥ नंतर हृदयामध्यें ॐकाराचा—घंटेच्या नादाप्रमाणें—जो अखंड नाद होत असतो, त्याला शुद्ध मार्गानें वर चढणाऱ्या प्राण प्रकट करावें, ॐ ध्वनि स्पष्ट करावा आणि वर आज्ञाचक्रापर्यंत प्राण नेऊन ( कमलनालाप्रमाणें ) तेथें ॐकाराला स्वरयुक्त करावें ॥ ३४ ॥ अशा प्रकारें प्रणव म्हणजे ओंकारयुक्त प्राणायामाचा चांगला अभ्यास करावा. चांगला म्हणजे प्रत्येक संधिकाळीं ( प्रातःकाल, मध्यान्ह आणि

( सायंकाळीं ) दहा वेळ ॐसह प्राणायाम ( पूरककुंभक आणि रेचक आणि फिरून रेचक , कुंभक आणि पूरक मिळून एक प्राणायाम होतो ) करावा; एक महिन्याच्या आंतच ह्या दृढ प्राणायामानें प्राण आपल्या ताब्यांत येईल ॥ ३५ ॥

याप्रमाणें प्राण ताब्यांत आल्यावर आपल्या देहांत जें हृत्कमल आहे, त्याचा नाल म्हणजे दांडा ऊर्ध्वगामी आहे आणि तें कमल अधोमुख आहे, अथवा नाळ अधोगामी आहे व कमळ ऊर्ध्वमुख असून तें पूर्ण उमललेलें आठ दळांचें आणि सकर्णिक आहे व असें पीठाचें ध्यान ठरवून ॥ ३६ ॥ त्या कमलाच्या कर्णिकेंत सूर्य सोम, अग्नि, यांची क्रमशः स्थापना करावी. नंतर तेथें माझ्या मंगलस्वरूपाचें ध्यान करावें. वन्हींच्या मध्यस्थानीं असलेल्या प्रकाशाप्रमाणें जें स्वरूप दैदीप्यमान आहे व जें समप्रमाण अवयवी, प्रशांत, प्रसन्नमुख असून ज्यास चार हात आहेत, ज्याची ग्रीवा रम्य असून ज्याच्या दोन्ही कानांत सुंदर मकरकुंडलें स्वतेजानें तळपत आहेत, ज्यानें सुवर्णासारखा पिंवळा पीतांबर धारण केला असून ज्याचा वर्ण मेघलाप्रमाणें श्याम आहे, आणि ज्याची छाती श्रीवत्स चिन्हानें शोभत असून रमा ज्याच्या मांडीवर बसली आहे, शंखचक्रगदापद्म इत्यादि आयुधें ज्यानें आपल्या चार हातांत धारण केलीं आहेत, ज्याच्या चरणामध्यें नूपुरें रुणझुणत आहेत, ज्यांचे कंठांत कौस्तुभ मणि विलसत असून तेजस्वी मुकुट, कडी, कटिसूत्र पोची इत्यादि भूषणांनीं ज्याचें सर्वांग भूषित झालें आहे, ज्याचे मुखावर हास्य विलसत असून ज्याची दृष्टि प्रसन्न आहे, अशा प्रकारचें तें ध्याजस्वरूप असावें ॥ ३७–४१ ॥ उद्धवा ! अशा या कोमल, सुकुमार ' बाल-वयस्क स्वरूपांतील प्रत्येक अवयवावर मनःस्थापना करावी. पण प्रथम इंद्रियांच्या विषयांपासून इंद्रियें निवृत्त करून घ्यावीं. नंतर बुद्धीला सारथी करून तिच्या साहाय्यानें हें आपलें मन, योगीभक्तानें सर्वथा माझ्या स्वरूपाचे ध्यानांत स्थिर करावें ॥ ४२ ॥

वरील प्रकार दृढ झाल्यानंतर तें सर्वांगव्यापक चित्त त्या त्या अंगापासून निवृत्त करून म्हणजे त्यांचें, चिंतन न करतां एकाच अवयवाचे – विशेषतः सुहास्य-वदनाचे–ठिकाणीं स्थापन करावें ॥ ४३ ॥ हें मुख ध्यानांत ठीक ठसलें म्हणजे त्यावरून चित्त काढावें आणि शून्याकाशाचें ध्यान करावें. नंतर सर्वकारण जें आकाश तेंही मागें टाकून द्यावें आणि मी जो शुद्धस्वरूपी निर्गुण, केवल परमात्मा, त्या ठिकाणीं आरूढ झालेल्या ज्ञानपूर्ण भक्तियोगग्यानें कांहीं सुद्धां चिंतू नये. हीच समाधि योग ॥ ४४ ॥

याप्रमाणें समाधिस्थितीतील योग्याला ' मी परमेश्वर व जीवात्मा हे सर्वात्मक परमात्मस्वरूपामध्यें समरस झालें आहे असें दिसेल. येथें ज्योतींत ज्योति

---

टीप —याप्रमाणें मन समाधींत स्थिर झालें असतां द्रव्यासंबंधीं म्हणजे आधि-भौतिक भ्रम, ज्ञानासंबंधीं म्हणजे आधिदैविक भ्रम आणि क्रियेसंबंधीं आध्यात्मिक

मिळाली, समरस झाली कीं ब्रह्मात्मैक्य झालें ।। ४५ ।। अशा प्रकारच्या शुद्ध व कडकडीत ध्यानानें आपलें मन युक्त केलें म्हणजें लवकरच द्रव्य, ज्ञान, याग, कर्म यां विषयी संसारस्थितींत जो भ्रम असतो, तो निर्वाण पावतो * ।। ४६

---

भ्रम या सर्वांचा निरास होतो किंवा द्रव्यादि विषय दृश्य, तत्संबंधीं ज्ञान असणारास तो द्रष्टा आणि कियादर्शन आशाही प्रकारचा त्रिप्रकारक भ्रम निरस्त होतो. निर्वाण = शांति समाधान, भ्रमशून्य शांतता संयात्यति = सम्यक् म्हणजे 'उत्तम तऱ्हेनें यात्यति म्हणजे जातो· माझा एकनिष्ठ भक्त शांतीप्रत उत्तम तऱ्हेनें जातो हें तात्पर्य.

---

**एकनाथः**—सकळ योगांचें योगद्वार । वेदांत निजभांडार ।।
सकळ सिद्धीचें परम सार । भक्ति साचार हरीची ।।( ४६ )

## चौदावा अध्याय समाप्त

# अध्याय १५ वा

श्री भगवान् म्हणतात— इंद्रियें, मन व प्राण या सर्वांस ज्यानें योगबळानें आकलन करून घेतलें आहे आणि जो माझें ध्यान करून मच्चित्त झालेला आहे, असा जो योगी, त्याच्याकडे अनेक सिद्धि धांवत येतात ॥ १ ॥

उद्धव म्हणतो, अच्युता ! योग्यांस सिद्धि प्राप्त करून देणारा तूंच आहेस म्हणून-कोणत्या धारणेनें कोणती सिद्धि प्राप्त होते, सिद्धि कशी असते, आणि सिद्धींची संख्या किती आहे, हें सर्व मला सांग ॥ २ ॥

श्री भगवान् म्हणतात, योगांत निपुण असलेले पंडित म्हणतात कीं सिद्धि अठरा असून, त्यांच्या धारणाही अठरा आहेत. या सर्व सिद्धि माझ्या आश्रयानें चालणाऱ्या आहेत. यांपैकीं ८ प्रधान व १० गौण आहेत ॥ ३ ॥ त्यांत अणिमा, महिमा, लघिमा या तीन सिद्धि देहासंबंधीं होत. ४ विशिष्ट इंद्रियांची तद्विषयांसह प्राप्ति, ५ अदृष्टाचें दर्शन, ६ नैसर्ग शक्तींचें प्रेरकत्व-प्रभुत्व, ७ वशिता आणि ८ कामपूर्तता; अशा या ८ प्रधान सिद्धि त्या माझ्या सिद्धि होत. या माझ्या म्हणून निसर्गसिद्ध आणि सर्वश्रेष्ठ आहेत ॥ ४ ॥ ५ ॥

आणि १ देहांत ऊर्मिशून्यत्व ( क्षुधा-तृषादिकांची अबाधकता आणणें, २ दूरचें पाहणें, ३ दूरचें ऐकणें, ४ शीघ्रगति, ५ वाटेल तें रूप घेणें, ६ परकायाप्रवेश, ७ स्वच्छंदमरण, ८ स्वर्गांगनाप्राप्ति, ९ संकल्पसिद्धि आणि १० निरंकुश आज्ञा, या १० गौण म्हणजे गुणजन्य सिद्धि होत ॥ ६,७ ॥

१ त्रिकालज्ञान, २ शीतोष्णादि द्वंद्वांवर सत्ता, ३ दुसऱ्याचें मन जाणणें, ४ अग्नि-सूर्य-उष्ण-जल-विष इत्यादिकांचें स्तंभन ( त्यांचें परिणाम थांबविणें ), आणि ५ अजिंक्यता या पांच क्षुद्र सिद्धि होत. योगधारणांनीं प्राप्त होणाऱ्या अनंत सिद्धींपैकीं या ८ + १० + ५ सिद्धि केवळ उदाहरणादाखल होत. आतां ज्या धारणेनें जी सिद्धि प्राप्त होते तिचें विवेचन ऐक ॥ ८,९ ॥

पंचमहाभूतांचीं अतिसूक्ष्म रूपें म्हणजे तन्मात्रा असतात त्यांचा आत्मा जो मी, त्या माझ्या ठिकाणीं अधिष्ठानरूपी माझें तन्मात्र रूप ध्यान केलें असतां त्या माझ्या तन्मात्रोपासकाला ‘ अणिमा ’ सिद्धि प्राप्त होते ॥ १० ॥

विश्वरूपाचा जो मी आत्मा त्या माझ्या म्हणजे महदत्म्याच्या ठिकाणीं मन ठेवून एकाग्र ध्यान करतो त्यास पंचमहाभूतांतील महत्स्वरूपरूपी ‘ महिमा ’ सिद्धि मिळते ॥ ११ ॥ भूतांचा परमाणु जो मी त्या माझ्या ठिकाणीं मनाची धारणा केली म्हणजे कालसूक्ष्मत्वाचें स्वरूप अशी ‘ लघिमा ’ सिद्धि मिळते ॥ १२ ॥

मनाचा विकार जें अहंकारत्व त्या ठिकाणीं ध्यान ठेविल्यानें मच्चित्त योगी सर्व इंद्रियांचा आत्मा, नियंता होतो. ही 'प्राप्ति' नामक सिद्धि होय ॥ १३ ॥ जो योगी आपलें मन क्रियाशक्तिप्रधान जें 'महत्' तत्त्व अथवा अव्यक्त 'सूत्रात्मा' तो मीच परमेश्वर आहें असें जाणून, अहंकारोपाधिक जो मी सूत्रात्मा त्याचे ठिकाणीं—आपलें मन—ठेवतो, सूत्रात्म्याची धारणा करतो, त्याला सर्वोत्तम 'प्राकाश्य' सिद्धि ( भोग्य विषयांचें ज्ञान ) मिळते ॥ १४ ॥ कालस्वरूपी जो त्रैलोक्याधीश विष्णु त्याच्या ठिकाणीं मनोधारणा केली म्हणजे 'प्रभुता' सिद्धि मिळते. या सिद्धीनें जीव आणि जड यांवर योग्यांची सत्ता प्रतिष्ठापित होते ॥ १५ ॥ 'भगवान्' हें ज्याचें नांव त्या नारायणाचे 'तुरीय' नांवाचें जें स्वरूप तेथें म्हणजे या माझ्या तुरीय स्वरूपाचे ठिकाणीं मनाची धारणा केली म्हणजे तो योगी मद्धर्मा—मद्रूप होतो आणि तो 'वशिता' नामक ९ वी सिद्धि प्राप्त करून घेतो ( वशी = सर्वांस ताब्यांत ठेवून आपण स्वतंत्र असणारा ) ॥ १६ ॥ शेवटीं निर्गुण ब्रह्म जो मी त्या माझ्या निर्गुण स्वरूपाचे ठिकाणीं स्फटिकासारखें शुद्ध झालेलें आपलें मन जो योगी ठेवतो, त्याला परम आनंदाची प्राप्ति होते. त्याच्या सर्व कामना नष्ट होतात. या सिद्धीला 'कामपूर्ति' 'यत्काम' 'पर्याप्त कामता म्हणतात. या महासिद्धि होत ॥ १७ ॥

आतां गौण सिद्धि सांगतों त्या ऐक. श्वेतद्वीपाचा स्वामी जो शुद्ध व धर्मस्वरूप मी, त्या माझे ठिकाणीं जो मन ठेवील, त्या स्वरूपाचें ध्यान करील, तो क्षुधातृषाप्रभृति ऊर्मींच्या पलीकडे जातो; शुद्ध सत्त्वाचा होतो. या सिध्दीला 'श्वेतता' किंवा ऊर्मिशून्यता म्हणावें ॥ १८ ॥ आकाशात्मा जो प्राणरूप मी ( हा समष्टि प्राण होय ) त्याचे ठिकाणीं जो नाद आहे त्याचें चिंतन करणाऱ्या हंसाला म्हणजे जीवाला, आकाशांत असणाऱ्या भूतांचे आवाज ऐकण्याचें सामर्थ्य येतें. ही 'दूरश्रवण' नामक सिद्धि होय ॥ १९ ॥ सूर्याचे ठिकाणीं नेत्र आणि नेत्रांत सूर्य, असा संयोग करून तेथें माझें ध्यान मनानें करणारा योगी सर्वद्रष्टा होतो. ही 'सूक्ष्मदृक्' सिद्धि ॥ २० ॥ मन आणि देह व त्यांचा अनुचर प्राणवायु हीं मत्संयुक्त करून जे माझी धारणा करतात त्यांस त्या धारणेच्या सामर्थ्यानें जेथें मन जातें तेथें स्वदेहालाही वायुगतीनें नेतां येतें. ही 'शीघ्रगति' नामक सिद्धि होय ॥ २१ ॥ माझ्या ठिकाणीं राहून योग करण्याचा ज्यानें अभ्यास दृढ केला त्या योग्याच्या मनाला मद्योगसामर्थ्याच्या आश्रयानें इष्ट वाटेल तें तें मनास आवडणारें रूप घेतां येतें. येथें मन हेंच उपादान आहे. 'रूपसिद्धि' हीच होय ॥ २२ ॥ इतरांच्या शरिरांत शिरण्याची इच्छा करणारा जो सिद्ध योगी, त्यानें त्या दुसऱ्या शरीरांत प्रविष्ट झालों आहों अशी भावना दृढ केली म्हणजे आपलें शरीर सोडून तो आपला वायुभूत प्राण त्या इतर शरीरांत प्रविष्ट करतो. जसा भ्रमर या पुष्पाला सोडून दुसऱ्या पुष्पांत शिरतो तसा. या सिद्धीला 'परकायाप्रवेश' म्हणतात ॥ २३ ॥

'इच्छामरण' सिद्धि अशी-टांचेनें मलद्वार दाबून बंद करावें म्हणजे अपान वायु ऊर्ध्वगति होतो. तेथें त्याची व प्राणाची गांठ पडून ते एकस्वरूप होतात. मग त्या प्राण-वायूस हृदय, वक्ष, कंठ, शिर यांमधून ऊर्ध्वगतीनें ब्रह्मरंध्रापर्यंत न्यावें. हे प्राण म्हणजे जीवाच्या उपाधि. या उपाधींसह जीव ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन यथारुचि ब्रह्म होऊं इच्छील किंवा इतर कांहीं स्वरूप इच्छील. याला 'इच्छा मरण' सिद्धि म्हणतात ॥ २४ ॥ देवांच्या क्रीडेसारखी क्रीडा करतां यावी, अशी इच्छा असेल त्यानें मन्मूर्तिरूप जें शुद्ध सत्व त्याचें चिंतन योगपूर्वक करावें. म्हणजे सत्त्ववृत्ति असणाऱ्या देवांगना विमानें घेऊन येतात व त्या योग्याची सेवा करतात. ही 'संकल्पप्राप्ति' नामक सिद्धि ॥ २५ ॥ ज्यांनीही मद्भक्तानें सत्यस्वरूप जो मी त्या माझे ठिकाणीं मन युक्त केलें तर त्यानें बुद्धि-पूर्वक जे संकल्प जसे केले असतील ते ते संकल्प त्याच स्वरूपानें त्याला मिळतात ॥ २६ ॥ सर्वनियंता व सर्वस्वतंत्र जो मी, त्या माझे भक्तियोगानें नियंतृ-स्वतंत्रस्वरूप ज्याला प्राप्त झालें आहे त्या पुरुषाचा कोणीही. आज्ञाभंग करूं शकत नाहीं. कारण त्याची आज्ञा ती मीच केलेली आज्ञा असते ॥ २७ ॥ आतां क्षुद्रसिद्धि कोणत्या त्या सांगतों. माझ्या भक्तीच्या सामर्थ्यानें शुद्ध सात्त्विक गुणी झालेला धारणाचतुर जो योगी, त्याला त्रिकालज्ञान होतें. आपलें जन्ममरणादिकांचें व जनतोत्पत्त्यादिकांचें ज्ञान त्याला होतें. या त्रिकालज्ञत्वांतच परचित्तज्ञानाचा अंतर्भाव करावा ॥ २८ ॥

पाणी जलचरांना इजा करूं शकत नाहीं, त्याप्रमाणेंच अत्यंत श्रम करून ज्यानें मद्योग साधला त्या मुनीच्या योगस्वरूपाला अग्निप्रभृति भुतें कसलाही अपकार करूं शकत नाहींत. कारण, मद्योगानें तो मुनि त्या अपकारकांचा आत्मा म्हणजे नियंता होतो. ही 'स्तंभन, नामक सिद्धि. द्वंद्वादीचा अंतर्भाव या सिद्धींतच होतो ॥ २९ ॥ उद्धवा श्रीवत्स, तसेंच शंख, गदा, चक्र, प्रभृति शस्त्रास्त्रें यांनीं युक्त त्याचप्रमाणें गरुडांकित ध्वज छत्र, चामर इत्यादि चिन्हांनीं सुभूषित असलेलें माझें अखंड ध्यान करणारा सदैव अजिंक्यच होतो ॥ ३० ॥ या अशा योगधारणेनें माझी एकनिष्ठ उपासना करणाऱ्या मुनीच्या आश्रयाला या मागें सांगितलेल्या सर्व ऋद्धि-सिद्धि प्राप्त होतात व त्या मुनीची उल्हासानें सेवा करतात ॥ ३१ ॥ जो जितेंद्रिय आहे, दमनशील आहे, प्राणायामांत परम श्रेष्ठत्व पावला आहे आणि जो मनानें मत्स्वरूपाची धारणा नित्य करतो, त्याला दुर्लभ अशी सिद्धिच नाहीं. ऋद्धि सिद्धी त्याच्या अंकित असतात. ॥ ३२ ॥ परंतु आत्म-योग नांवाच्या उत्तमोत्तम योगांत ज्याचें मन अभिरत झालें आहे, त्याच्या मार्गांत ह्या सिद्धी म्हणजे मोठमोठ्या धोंडीच होत. मद्योगानें मत्स्वरूप-प्राप्ति होण्याला या सिद्धी आड येतात आणि मोक्षकाल लांबणीवर टाकतात, म्हणून या सिद्धींच्या नादीं मुमुक्षूनें लागू नये ॥ ३३ ॥

कोणाला पूर्वसंस्कारामुळें जन्मतः, कोणाला औषधांनीं, तपानें, मंत्रांनीं सर्व सिद्धि प्राप्त होतात. योगानेंही या मिळतात; परंतु माझी धारणा अखंड करणें हा जो

योग आहे, त्याशिवाय इतर कोणत्याही योगानें अथवा सर्व कामुक योगांनीं मत्स्वरूपाची प्राप्ति होणार नाहीं. ' म्हणून अमकें मला हवें ' असा संकल्प करून योगाभ्यास करूं नको. ही कामुकताच मोक्षाच्या आड येते. म्हणून ही कामुकता व तत्सिद्धींपैकीं कोणतीही सिद्धी तुला नको ॥ ३४ ॥

उद्धवा ! मी सर्व सिद्धींचा प्रवर्तक पालक व पोषक आहें. मी त्यांचा स्वामी आहें. योग, सांख्य, धर्म, ब्रह्मज्ञान यांचा हेतु यांचा पति यांचा प्रभु मी आहें ॥ ३५ ॥ सर्व जगताच्या व जगतांतील पदार्थांच्या आंत व बाहेर पंचमहाभूतें असतात. तसा मी स्वतः सर्व देहधारी जीवांचा ( जडाचाही आहेच ) नियंता, त्यांच्या आंत व बाहेर राहून त्यांचें नियमन करणारा मी, आंत, बाहेर, सर्वत्र असतो. आंत आहें म्हणून अंतर्यामी व बाहेर आहें म्हणून सर्वव्यापी आसून मायेनें आवृत असणाऱ्यांहून विलक्षण आहें ॥ ३६ ॥

पंधरावा अध्याय समाप्त

# अध्याय १६ वा

उद्धव म्हणाला, कृष्णा, तूं प्रत्यक्ष परब्रह्म आहेस, तूं अनादि, अनंत, मायेचें आवरण नसणारा, स्वतंत्र आहेत. तूंच सर्व विश्वाचें व विश्वगत पदार्थांचें जन्मकारण, स्थितिकारण आणि संहारकारण आहेस ॥ १ ॥

जे अकृतात्मे म्हणजे अज्ञानी व मलीन चित्ताचें लोक आहेत, त्यांस तूं लहान-मोठ्या पदार्थांत कोठेंही गोचर होत नाहींस; परंतु जे श्रुतींचा इत्यर्थ जाणणारे ज्ञानी असतात, ते मात्र तुझी उपासना तुझें यथार्थ स्वरूप जाणून करीत असतात. असल्या ज्ञानी उपासकांस तूं कोठेंही गोचर होतोस ॥ २ ॥

म्हणून ज्या ज्या स्वरूपांमध्यें तुझी भक्ति करणारे महर्षि तुझी उपासना करून संसिद्धि म्हणजे मोक्ष मिळवितात व शुद्धचित्त होऊन जन्माचें सार्थक करतात, तीं तीं स्वरूपें, त्या तुझ्या विभूति मला सांग ॥ ३ ॥

हे भूतभावन म्हणजे जीवांस ( जडांसही ) उत्पन्न करून त्यांचें कल्याण करणाऱ्या भगवंता ! तूं प्रत्येक भूताचा नियंता आहेस. तूं भूतांमध्यें नित्य वागतोस; तथापि अज्ञानी भूतें तुला ओळखीत नाहींत. अर्थात् तुझी उपासनाही करीत नाहींत. तथापि तूं मात्र सर्वांस पाहतोस, जाणतोस आणि त्यांचें कल्याण करतोस ॥ ४ ॥ म्हणून या लोकीं, स्वर्गांत व पाताळांत, सारांश दाही दिशांमध्यें ज्या ज्या तुझ्या विभूति ( स्वरूपें ) प्रकट झाल्या आहेत, त्या विभूति व त्यांचे विशेष मला सांग. तूं प्रत्यक्ष महाविभूति—अतिश्रेष्ठ भगवन्मूर्ति आहेस. सर्व पुण्यतीर्थांचें माहेरघर असणारें हें जें तुझें चरणकमल त्याला मी सर्व भावांनीं नमस्कार करतों ॥ ५ ॥

श्रीकृष्ण म्हणतातः— उद्धवा ! संशयांचा उच्छेद करणारे प्रश्न कोणते व ते कसे करावे, हें जाणण्यांत कुशल असणाऱ्या जिज्ञासूंत तूं श्रेष्ठ आहेस. उद्धवा, दुष्टांचा व उन्मत्तांचा संहार करणाऱ्या—विनशन म्हणजे कुरुक्षेत्रांत—' जीवच कर्ता भोक्ता होय ' असा अभिमान धरणाऱ्या अज्ञानी अर्जुनानें कौरवांच्या विरुद्ध युद्ध सुरू होण्यापूर्वी हाच प्रश्न मला विचारला होता ॥ ६ ॥ स्वजातीचा म्हणजे बंधुबांधवांचा — केवळ राज्य मिळविण्याच्या हेतूनें—वध करणें निंद्य आहे अधार्मिक आहे, असें अर्जुनास वाटलें आणि तो युद्धापासून पराङ्मुख झाला. उद्धवा ! अर्जुन त्या वेळीं लौकिकी म्हणजे सर्वसाधारण अज्ञानामध्यें मग्न झाला होता. आणि ' माझा आत्मा इतर आत्म्यांस मारणारा व इतरांचे आत्म्ये मरणारे ' असें अज्ञान घेऊन बसला होता. तात्पर्य, आत्मा कर्ता-भोक्ता आहे अशी त्याची समजूत असल्यामुळें या युद्धानें आपणांस पाप लागेल असें त्यास वाटलें व तो युद्धपराङ्मुख झाला होता ॥ ७ ॥ त्या प्रसंगीं त्या नरश्रेष्ठाची समजूत मीं अनेक युक्तिप्रयुक्तींनीं घालून त्याचें अज्ञान दूर केलें ॥ ८ ॥

उद्धवा ! मी या सर्व स्थावरजंगम भूतांचा आत्मा आहें, त्यांचा उपकारक मित्र आहें, त्यांचा नियंता—स्वामी आहें. मीच हीं सर्व भूतें आहे आणि त्यांच्या उत्पत्ति स्थिति–लयांचें कारणही मींच आहें ॥ ९ ॥

ध्वनि, वायु, प्रकाश, विद्युत्प्रभृति व गरुड, मारुति–नारदादि जे वेगवान् आहेत, त्यांचा वेग मीं आहें. कालादि सर्व सत्ताधाऱ्यांचा स्वामी मीच आहें. सत्त्वादि गुणांत साम्य असणारा व गुणवंतांचा स्वाभाविक गुणहि मींच आहें ॥ १० ॥ या गुणवंतांमधील सूत्र ( हिरण्यगर्भ प्राण ) मी, महत्तत्त्वांतील महान् मी, सूक्ष्मांतील अतिसूक्ष्म जीव मी, आणि अजिंक्य श्रेष्ठ मनही मीच ॥ ११ ॥ तसेंच श्रुतींचा उत्पादक व अध्यापक जो हिरण्यगर्भ तो मी, मंत्रांतील श्रेष्ठ ॐ मी, अक्षरांतील श्रेष्ठ अक्षर 'अ' मी व वेदांतील श्रेष्ठ त्रिपाद गायत्री मीच आहें ॥ १२ ॥ सर्व देवांमधील इंद्र मी, अष्टवसूंमधील श्रेष्ठ जो अग्नि तो मी, बारा आदित्यांतील श्रेष्ठ विष्णु व अकरा रुद्रांमधील श्रेष्ठ शंकरही मीच ॥ १३ ॥

ब्रह्मर्षींमधील ब्रह्मयास शापून विष्णूस लाथ मारणारा भृगु मी, राजर्षींमधील श्रेष्ठ मनु मी, देवर्षिश्रेष्ठ नारद मी, व यज्ञोपयोगी धेनुश्रेष्ठ कामधेनुहि मीच आहें ॥ १४ ॥ सिद्धश्रेष्ठांतील श्रेष्ठ कपिल मी, पक्षिश्रेष्ठ गरुड मी, प्रजापतिश्रेष्ठ दक्ष मी व पितृश्रेष्ठ अर्यमाहि मीच आहें ॥ १५ ॥ दैत्यश्रेष्ठ जो असुरपति प्रल्हाद तो मी, नक्षत्रें आणि वनस्पति यांस जीवन देऊन पालन करणारा चंद्र मी व यक्षराक्षसश्रेष्ठ कुबेरहि मीच. गजेंद्रश्रेष्ठ ऐरावत, जलचरांचा ईश्वर वरुण, उष्णता व प्रकाश देणाऱ्या भूतांचा श्रेष्ठ सूर्य आणि मनुष्यांचा राजाहि मीच आहें ॥ १६ ॥ १७ ॥ अश्वश्रेष्ठ, उच्चैःश्रवा धातुश्रेष्ठ सुवर्ण, श्रेष्ठ दंडधारी यम, सर्वोत्तम वासुकि, नागोत्तम अनंत, श्वापदपति सिंह आणि आश्रमश्रेष्ठ संन्यास, वर्णांतील प्रथम ब्राह्मण वर्ण मीच आहें. पवित्र नद्यांत गंगा, सरोवरांचा पति सागर, आयुधश्रेष्ठ धनुष्य, श्रेष्ठ धनुर्धारी त्रिपुरघ्न म्हणजे शंकर, वास्तव्याचें उत्तम स्थान मेरु, अत्यंत दुर्गम हिमाचल वृक्षश्रेष्ठ पिंपळ ( अश्वत्थ ) उत्तम अन्न यव हीं सर्व माझींच रूपें आहेत ॥ १८–२१ ॥ त्याचप्रमाणें पुरोहिताग्रणी वसिष्ठ, ब्रह्मिष्ठ बृहस्पती उत्कृष्ट सेनापति स्कंद ( षडानन ) नायकोत्तम अज ( ब्रह्मा , यज्ञश्रेष्ठ ब्रह्मयज्ञ, उत्तम व्रत अहिंसा आणि वायु, अग्नि, सूर्य, जल, वाणी या शुद्ध करणाऱ्या पदार्थांचा आत्मा जी शुद्धता, ती मीच होय ॥ २२ ॥ २३ ॥

अष्टांगयोगामध्यें समाधि, विजयाकांक्षींचें रहस्य जो मंत्र ( मसलत ) तो, विवेक्यांच्या विवेकाचा राजा आन्वीक्षिकी नामक विवेक (आत्मानात्मविवेकविद्या ) आणि अख्याति, अन्यथाख्याति इत्यादिक संशयवाद करणारांमध्यें विकल्प मीच होय ॥ २४ ॥ स्त्रीश्रेष्ठ शतरूपा ( सरस्वती किंवा मनुपत्नी अथवा विद्युत् ), पुरुषश्रेष्ठ स्वायंभुव मनु, मुनिश्रेष्ठ नारायण ब्रह्मचाऱ्यांमध्यें सनत्कुमार, धर्मश्रेष्ठ संन्यास, निर्भयरहस्य आत्मश्रद्धा, गुह्यांमध्यें प्रियवचन व मौन, दांपत्याग्रणी ब्रह्मा, अप्रमत्तांचा संवत्सर, ऋतुपति वसंत

( मधु व माधव हीं अनुक्रमें चैत्र व वैशाख या महिन्यांचीं नांवें ), मासपति मार्गशीर्ष आणि नक्षत्राग्रणी अभिजित् मीच आहें ॥ २५ ॥ २६ ॥ २७ ॥ तसेंच युगांत कृतयुग, बुद्धिवंतांत देवल व असित, व्यासांत द्वैपायन व्यास, कवींमध्यें सूक्ष्मबुद्धि काव्य-( शुक्र ) ॥ २८ ॥ भगवंतांत वासुदेव, भागवतांत उद्धव, किंपुरुषांत हनुमान, व विद्याध्रांतील ( विद्याधरांतील ) सुदर्शन मीच होय ॥ २९ ॥

त्याचप्रमाणें रत्नांत पद्मराग, सुंदर कोशांत पद्मकोश दर्भांत कुश, हवींमध्यें गाईचें तूप, व्यावहारिकांचें रहस्य लक्ष्मी; लबाडांतील छलग्रह ( खोट्या फाशांनीं खेळणारा किंवा खोटा फांसा ), तितिक्षूंची सहनशीलताशक्ति, सात्त्विकांचें सत्त्व, बलवंतांचें ओज व सह ( ओजस् = चढाईची शक्ति, सहस् = बचावाची शक्ति ), आणि सात्त्वत म्हणजे भगवद्भक्त भागवत त्यांची भक्ति व नऊ सात्वतांचा आदि व सर्वश्रेष्ठ मीच आहें ॥ ३०, ३१, ३२ ॥

गंधर्वश्रेष्ठ विश्वावसु, अप्सराश्रेष्ठ पूर्वचित्ति स्थैर्य, भूमीचा गुण गंध, जलांचा रस, तेजतत्त्वाचा अग्नि किंवा सूर्य, सूर्यचंद्रतारा यांची प्रभा, आकाशांतील परा वाणी, ब्रह्मण्यांतील ( पवित्र वस्तूंतील ) बलि = हव्यद्रव्य अथवा दानशूरांतील शुक्रशिष्य बलि, वीरांत अर्जुन, भूतांची उत्पत्ति, स्थिति, संहार करणारी शक्ति मी; हस्तपादादि कर्मेंद्रियांचें गति – उक्तिप्रभृति व ज्ञानेंद्रियांचें श्रवण – दर्शनादि, इंद्रियांचें इंद्रिय ( मन ? ), पंचमहाभूतांच्या तन्मात्रा, अहंकार महत् ( महाभूतांच्या तन्मात्रा, अहंकार व महत् हे प्रकृतीचे विकार असून हे सात महाभूतांच्या ज्ञानकर्मेंद्रियांच्या प्रकृति होतात ), विकार ( ५ महाभूतें , ११ इंद्रियें = १६ विकार ) मी, जीव मी प्रकृति मी, सत्त्वदि गुण मी व परब्रह्म मी होय ॥ ३३–३७ ॥ या गुणांचें परिगणन, ज्ञान आणि तत्त्वनिश्चय मीं आहें. मी जो सर्वात्मा तद्व्यतिरिक्त जीव-शिव, गुण-गुणी वगैरे कांहीं नसतें. मी आहें म्हणून सर्व आहे ॥ ३८ ॥

त्याचप्रमाणें परमाणूंची संख्या मला कांहीं तरी वेळानें करितां येईल, मी परमाणू मोजू शकेन. परंतु माझ्या विभूतींची संख्या मलाही करतां येणार नाहीं. अनंत कोटि ब्रह्मांडें ज्याचे पोटीं आहेत त्या माझ्या विभूति मला सुद्धां कशा मोजतां येणार ? त्या अनंत आहेत ॥ ३९ ॥ तथापि तेज, शोभा, कीर्ति ' ऐश्वर्य – ही ( मर्यादा प्रकट करणारा गुण ) सौंदर्य, भाग्य, वीर्य, विज्ञान, तितिक्षा हे धर्म जेथें दिसतात, ते ते माझेच अंश आहेत असें समज. ते अनंतच. यावरून तुला माझ्या अनंत विभूतींची कल्पना येईल ॥ ४० ॥ उद्धवा, याप्रमाणें संक्षेपतः सर्व विभूति तुला सांगितल्या. ह्या विभूति म्हणजे मनाचे अथावा मनानें उत्पन्न केलेले विकार आहेत. कारण, वाणी मात्र ह्या विकारांस प्रकट करूं शकते. हा सर्व वाणीचा खेळ आहे. इंद्रियांस गुण दिसतात व त्यांचा उच्चार वाणी करते. गुणापलीकडे राहणारी वस्तु इंद्रियांस अगोचर आहे म्हणून वाचअगोचरही आहे. परंतु गुण ही स्वरूपतः परमार्थस्तू नव्हे म्हणून या विभूतिही परमार्थ

नव्हत ॥ ४१ ॥ म्हणून वाणी, मन, प्राण, इंद्रियें, बुद्धि, अहंकार हें सर्व बिचारपूर्वक संयमद्वार टाकून दे, म्हणजे तुझें जन्ममरण संपेल ॥ ४२ ॥ जो यति सद्बुद्धिपूर्वक वाणी व मन यांचा संयमरूपी त्याग करीत नाहीं, त्याचें व्रत ( दीक्षा ), त्याची तपश्चर्या, त्याचें ज्ञान हीं सर्व नाहींशींच होतात मातीच्या कच्चा घागरींत सांठवून ठेवलेलें पाणी गळून जातें व शेवटीं तो घट कोरडा राहतो, तसा सर्वसंन्यास न करणाऱ्या असंयमी यतीचें जपतपादि सर्व सत्कृत्य विनष्ट होतें ॥ ४३ ॥ म्हणून माझा जो अनन्य भक्त आहे, त्यानें मद्भक्तीनें प्रेरिलेली जी बुद्धि तिच्या साहाय्यानें अर्थात् बुद्धिपूर्वक मनाचा, वाणीचा व प्राणांचा संयम करावा. हा सिद्ध होऊन ब्रह्मात्मैक्य झालें कीं तो मद्भक्त कृतकृत्य होतो ॥ ४४ ॥

सोळावा अध्याय समाप्त

# अध्याय १७ वा

उद्धव म्हणालाः—श्रीकृष्णा ! तुझी भक्ति हेंच लक्षण आहे ज्या धर्माचें, तो सर्व वर्णांस सर्व आश्रमांस व त्याचप्रमाणें वर्णाश्रम ज्या लोकांत नाहीं त्या लोकांस सुद्धां अत्यंत कल्याणकारी धर्म पूर्वीं इतरांस आणि आतां मला दोन तीन वेळां सांगितला आहेस ॥ १ ॥ तथापि तो प्रत्येक जीवाचा धर्म कोणत्या पद्धतीनें आचरिला असतां त्या त्या जीवाला तुझी आत्यंतिक भक्ति उत्पन्न होईल, ती पद्धति कृपा करून मला स्पष्ट समजेल अशा रीतीनें सांग ॥ २ ॥ माधवा ! सृष्टीच्या प्रारंभीं हंसस्वरूप घेऊन तूं ब्रह्मसभेमध्यें ब्रह्मदेवाला सनकादिकाला अत्यंत कल्याणावह असा धर्म सांगितला आहेस हें खरें आहे ॥ ३ ॥ तथापि, हे शत्रुंजया ! पूर्वीं ब्रह्मलोकीं तो धर्म विहित केला त्यास अनेक सहस्त्र वर्षें झालीं असल्यामुळें तो धर्म सद्यःकालीं व या लोकीं फारसा अथवा मुळींच उपयोगी पडणार नाहीं कारण आतांची परिस्थिति फारच निराळी आहे ॥ ४ ॥ हे अच्युता ! प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्या सभेंत सर्व विद्या मूर्तिमंत विद्यमान असतां, जरतुझ्याशिवाय धर्म-प्रवचन करणारा, त्यची स्थापना करणारा व त्याचें संरक्षण करणारा सांपडला नाहीं, तर या मर्त्यलोकीं असा तुझ्यासारखा ज्ञानसंपन्न, दयासंपन्न आणि सत्संपन्न महापुरुष सांपडणें अशक्यच आहे ॥ ५ ॥ आणि हे मधुसूदना ! धर्मसंस्थापक, धर्मोद्धारक आणि धर्मसंरक्षक असा तूं अनाद्यनंत महापुरुष, ही पृथ्वी सोडून निजधामाला गेल्यानंतर तो नष्टप्राय झालेला त्वत्स्थापित धर्म मग कोण सांगणार ? ॥ ६ ॥

म्हणून हे जगदीशा ! सर्व धर्मांचें पूर्ण ज्ञान असणाऱ्या देवा ! तुझ्या भक्तीनेंच विशिष्ट असणारा जो सर्वमंगलकारक धर्म नित्य आहे, त्याचें अनुष्ठान कोणत्या मनुष्यानें कोणत्या पद्धतीनें करावें, हे मला सांग. म्हणजे तें ज्ञान हल्लींच्या अनेक प्रकृतींच्या लोकांस उपयोगी पडेल ॥ ७ ॥

श्रीशुकाचार्य म्हणतात, राजा ! याप्रमाणें भगवत्सेवकांमध्यें मुख्य अशा उद्धवानें विचारलें असतां संतुष्ट होत्साता भगवान् श्रीकृष्ण मनुष्यांच्या कल्याणाकरिता पुरातन धर्म सांगूं लागला ॥ ८ ॥

श्रीकृष्ण म्हणाला, उद्धवा फार उत्तम प्रश्न विचारलास. उद्धवा ! हा तुझा प्रश्न धर्माला अनुकूल असून सर्व जीवांस व विशेषतः वर्णाश्रमी आर्थात कल्याणावह होणारा आहे. असो ॥ ९ ॥ पूर्वीं कृतयुगांत सर्व मनुष्यें एकच वर्णाचीं होतीं. त्या वर्णाचें नांव हंस. उद्धवा ! त्या वेळीं विद्यमान असणारा प्रत्येक पुरुष कृतकृत्य असे. त्याला आशा हि कांहीं नसत. म्हणून त्या युगाला ' कृतयुग ' असें नांव मिळालें. जीव समाधनी होते, [illegible] नव्हतें, म्हणून ' कृतयुग ' हें नांव त्या युगाला मिळालें ॥ १० ॥ त्या वेळीं

वेद केवळ ॐ कारस्वरूप मात्र होते. वृक्षस्वरूप ( गोस्वरूप. वृष = वृषभ ) धारण करणारा जो मी धर्म, तो त्या वेळीं चतुष्पाद म्हणजे सत्यादि चारी अंगांनीं परिपूर्ण असा होतो. त्या काळीं एकाग्र तपश्चर्येनें परिशुद्ध झालेले ऋषि माझी सत्य, दया, प्रभृति सर्व अंगांनीं उपासना करीत ॥ ११ ॥ महाभाग उद्धवा ! पुढें त्रेतायुगामध्यें माझ्या हृदयांतूनच प्राण म्हणजे निःश्वास या रूपानें कर्म विहित करणारी वेदत्रयी ( ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद ही त्रयी ) प्रकट झाली. तेव्हां तीन भाग आहेत ज्याचें असें यज्ञरूपी कर्म सुरू झालें. हौत्र म्हणजे ऋग्वेदांतर्गत होत्याचें कर्म, यजुर्वेदांतील अध्वर्यूचें कर्म आणि सामवेदप्रणीत उद्गात्यचें कर्म, अशा तीन मुखांनीं मीच प्रकट झालों. तीन कर्म स्वरूपी मी म्हणून त्रेतायुग हें नांव ॥ १२ ॥ तसेंच, विराटस्वरूपी जो मी, त्या माझ्या मुखापासून विप्र, बाहूपासून क्षत्रिय , उरूंपासून वैश्य आणि माझ्या चरणांपासून शूद्र असे चार वर्ण निर्माण झाले. त्या प्रत्येक वर्णाचे स्वाभाविक गुण भिन्न होते तदनुसार त्यांचा अनुष्ठानादि धर्माचारही निराळा झाला ॥ १३ ॥

त्याप्रमाणें माझ्या जघनापासून ( कटिपश्चाद्भागापासून ) गृहस्थाश्रम झाला. माझ्या हृदयापासून ब्रह्मचर्याश्रम झाला व माझ्या वक्षःस्थलापासून वानप्रस्थाश्रम आणि माझ्या मस्तकापासून संन्यास उत्पन्न झाला. फार काय, संन्यासाश्रमाला विराट् पुरुषानें मस्तकीं धारण केलें आणि त्याची प्रस्तावना करणारे जें ब्रह्मचर्य त्याला हृदयांत जागा दिली ॥ १४ ॥

उद्धवा ! या चार वर्णांच्या व चार आश्रमांच्या प्रकृति—स्वाभाविक गुणधर्म—जन्मभूमीच्या क्षेत्रानुसार म्हणजे आनुवंशिक संस्कारानुसार प्रगट होत. नीच जन्मभूमि असेल तर नीच व उत्तम क्षेत्रांतून उत्तम प्रकृति, असे भेदभाव उत्पन्न होऊन वर्णाश्रम ठरले ॥ १५ ॥ ब्रह्मप्रकृतीचे—ब्राह्मणांचे गुणधर्म—शम, दम तप, अंतर्बाह्य शुद्धि, समाधान क्षमा, ऋजुता, ईशभक्ति, दया आणि सत्य—हे होत. ब्राह्मणाचे हे स्वाभाविक गुण किंवा हे गुण उत्कर्षानें असतील ती प्रकृति विप्राची ॥ १६ ॥ तेज ( प्रताप ); बल, धैर्य, शौर्य सहनशीलता, औदार्य. उद्योगप्रियता, अचंचलता ( चिकाटी ) ब्रह्मण्यता ( वेद व ब्राह्मणयांवर श्रद्धा ) आणि प्रभुता ह्या क्षत्रियाच्या प्रकृति होत ॥ १७ ॥ आस्तिक्य बुद्धि (श्रद्धा) दानशूरता, विचारानुसारच उच्चार व आचार ( ढोंग नसणें ) वेदब्राह्मणांचीं सेवा, संपत्तिसंग्रहासंबंधानें असमाधान ( जास्ती मिळविण्याची हांव व तत्प्रीत्यर्थ उद्योग ) ह्या पांच, गुणधर्मांची प्रकृति वैश्याची असते ॥ १८ ॥

द्विज, देव आणि धेनु यांचीं निष्कपट सेवा करणें आणि या सेवेचा मोबदला मिळेल त्यांत संतुष्ट असणें हीं शूद्राचीं लक्षणें होत ॥ १९ ॥ हें वर्णाचें वैशिष्ट्य दाखविणारे धर्म झाले. आतां सर्व वर्णांस सर्वदा पूज्य असणारे गुण सांगण्याच्या आधीं अतिशूद्रांचे बहिष्कृत लोकांचे गुण सांगतों ते ऐक. आंत बाहेर मलिनपणा, खोटें बोलणें व चोरी करणें यांची आवड, सर्व ठिकाणीं वेदादि धर्मांवर अविश्वास, उकरून भांडण काढण्याची हौस, काम, क्रोध, लोभ यांचा उत्कर्ष हे गुण ज्या पुरुषांत दिसतील त्याला

अति शूद्र म्हणावें ॥ २० ॥ हिंसाशून्यता, सत्यप्रीति, अपहार-बुद्धीचा अभाव, काम क्रोध, लोभ या समाजघातक मनोवृत्तींचा अभाव आणि लोकांचें प्रिय व हित करण्याकडे लक्ष हा सर्व वर्णांस योग्य असणारा धर्म आहे ॥ २१ ॥

गर्भाधानादि संस्कारानंतर उपनयन ( गुरुकुलांत जाण्याला अधिकार देणारा संस्कार; मौंजीबंधन ) झालें म्हणजे दुसरा जन्मच जणों होतो. म्हणून ज्यांचें उपनयन होतें त्यांस द्विज ( याच देहीं दोन जन्म असणारा ) म्हणतात. या ब्रह्मचाऱ्यानें गुरुगृहीं राहावें, इंद्रियनिग्रही असावें आणि गुरूंनीं बोलावल्यानंतर ते वेदपाठ देतील त्याचें अध्ययन करावें ॥ २२ ॥ त्यानें मेखला ( मुंज = गवताचें वगैरे वर्णानुसार कटिसूत्र ) मृगासन, दंड—काठी, माळ, यज्ञोपवीत, कमंडलु वगैरेंनीं युक्त असावें. त्यानें जटा वाढवाव्या, ब्रह्मचारी असतांना दांत व कौपीन ( वस्त्र ) यांच्या शुद्धीकडे लक्ष देऊं नये, आसन रंगवूं नये आणि नेहमीं हातामध्यें दर्भाचें पवित्रक घालावें ॥ २३ ॥

स्नान, भोजन, होम, जप, मलविसर्ग इ. करतांना मौन ठेवावें. नखें, केश ( खांकेंतील व गुह्यभागांतील सुद्धां ) काढूं नयेत. तात्पर्य नखें केश वाढूं द्यावे. मौन आणि सौंदर्यविषयीं उदासीनता असावी ॥ २४ ॥ ब्रह्मचाऱ्यानें केव्हांही बुद्धिपुरःसर वीर्याचा नाश करूं नये. यदाकदा वीर्यस्खलन कधीं आपोआप झालेंच, तर लगेच स्नान करून प्राणायाम करावा आणि त्रिपदा गायत्रीचा जप करावा. ॥ २५ ॥ होमकुंडांतील अग्नीची, गुरुजीची, गोमातेची, ब्राह्मणांची, ज्ञानवृद्धांची, देवाची उपासना शुचिर्भूत राहून नित्य एकाग्र मनानें ( समाधान वृत्तीनें ) करावी. सकाळची व सायंकाळची संध्या करतांना मौन धरावें व गायत्रीचा जप नेमानें करावा ॥ २६ ॥

आचार्य ( उपदेष्टा गुरु ) प्रत्यक्ष परमेश्वर आहे अशी दृढ भावना ठेवून केव्हांही व कोठेंही त्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष अपमान करूं नये. तो केवळ मनुष्य आहे असें समजून त्याच्या मान्यतेसंबंधानें द्वेष किंवा असूया असूं नये. कारण गुरु म्हणजे सर्व देवांचें आश्रयस्थान असतें. तो देवमयच असतो ॥ २७ ॥ सकाळीं व संध्याकाळीं आणलेली भिक्षा गुरुजींना अर्पण करावी आणि जेवढा भाग आपल्यास गुरुजी देतील, तेवढ्यावरच निर्वाह करावा. मात्र त्यांची आज्ञा झाल्यास इतर पदार्थांचा स्वीकार करावा आणि नेहमीं मन स्वाधीन ठेवून इंद्रियांचा निग्रह करावा ॥ २८ ॥

आचार्यांची सेवा करीत असतां अत्यंत नम्र वृत्ति धारण करावी. नेहमीं हात जोडून असावें. गुरुजी बाहेर फिरण्यास गेले, शयनारूढ झाले किंवा आसनावर बसले असतील तेव्हां ब्रह्मचाऱ्यानें त्यांच्यापासून फार लांब नाहीं अशा स्थानीं असावें. हे सामान्य ब्रह्मचाऱ्यांचे धर्म होत ॥ २९ ॥

या प्रकारचें भोगविरहित आचरण मनःपूर्वक ठेवून विद्या संपेपर्यंत ब्रह्मचर्य अखंडित ठेवून गुरुगृहीं वास्तव्य करावें ॥ ३० ॥ आतां एखाद्या विद्यार्थ्याला वेदांच्या

भुवनांत किंवा ब्रह्मभुवनांत जाण्याचा दृढ इच्छा असेल तर त्यानें नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याची दीक्षा घेऊन पुढील अध्यापनासाठीं गुरुजींस आपला सर्व देहच अर्पण करावा । ३१ ॥ वस्तु अनेक आहेत असा भ्रम उत्पन्न करणारी बुद्धि या नैष्ठिक आणि म्हणून वेदोनारायण झालेल्या शुद्धस्वरूपी ब्रह्मचाऱ्यानें टाकून द्यावी, आणि अग्नि, गुरु आपला जीवात्मा व इतर सर्व भूतें या सर्व ठिकाणीं सच्चिदानंद श्रीपरमेश्वर आहे अशी भावना ठेवावी आणि माझें म्हणजे परमेश्वराचें सर्व ठिकाणीं आराधन करावें ॥ ३२ ॥

ह्या ब्रह्मचाऱ्यानें ( अगृहस्थानें ) स्त्रियांचें दर्शन, त्यांचा स्पर्श, त्यांच्याशीं भाषण अथवा इतर प्रकारचा विनोद करूं नये आणि एकत्र झालेल्या नरमाद्यांचे विलास पाहण्याचें तर पहिल्याप्रथम टाकून द्यावें ॥ ३३ ॥ इतर ब्रह्मचाऱ्यांप्रमाणें नैष्ठिकानें नियमतः मलविसर्जन, आचमन , स्नान, संध्योपासन, ऋजुता, तीर्थाटन आणि गायत्री-जप हीं कर्में नियमित करावीं आणि अस्पृश्यांस स्पर्श करूं नये, अभक्ष्यभक्षण करूं नये, अथवा गप्पागोष्टी, चकाट्य पिटीत बसूं नये ॥ ३४ ॥ सर्व भूतांचे ठायीं मी परमेश्वर नांदत आहें, अशी भावना ठेवून, मन, वाणी आणि शरीर हीं सर्व स्वाधीन ठेवावीं. हा नियम सर्व आश्रमांस विहित आहे. हे कुलदीपक उद्धवा ! हें तूं विसरूं नको अर्थात् हा निधि नैष्ठिकानेंही पाळला पाहिजे ॥ ३५ ॥ असें हें कडकडीत व्रत नैष्ठिकानें मद्भक्तिपूर्वक एकाग्र मनानें चालविलें म्हणजे त्याच्या तीव्र तपःप्रभावानें त्याचा कर्मवासनाजनक सूक्ष्म देह शुद्धतम होतो. तो निर्मळ एकनिष्ठ वेदाध्ययनानें अग्नीसारखा तेजस्वी होतो. तात्पर्य, तो मुक्त होण्याच्या मार्गाला लागून पुढें मुक्त होतो ॥ ३६ ॥

ब्रह्मचर्याश्रम सोडून दुसऱ्या कोणत्या तरी आश्रमांत वेदार्थज्ञानाच्या प्रेरणेनें शिरूं इच्छिणाऱ्या ब्रह्मचाऱ्यानें ( यालाच उपकुर्वाण म्हणतात. ) गुरूला दक्षिणा द्यावी आणि त्याची आज्ञा घेऊन मंगलस्नान करावें. ( याला समावर्तन संस्कार अथवा प्राकृत भाषेंत सोडमुंज ' म्हणतात. ) ॥ ३७ ॥ ज्ञानप्रेरणेनुसार या द्विजश्रेष्ठ सोडमुंज्यानें गृहस्थाश्रम किंवा वानप्रस्थाश्रम किंवा संन्यासाश्रम यापैकीं कोणता इष्ट असेल तो आश्रम घ्यावा अथवा प्रथम गृहस्थ, नंतर वनस्थ आणि मग संन्यस्त अशा क्रमानेंही जावें. उलट क्रम वर्ज्य आहे. कोणत्याही आश्रमांत द्विज असो, त्यानें मत्पर म्हणजे भगवत्पर असावें आणि आश्रमोचित सर्व कर्में ईश्वरासच अर्पण करावीं ॥ ३८ ॥ गृहस्थाश्रमी होऊं इच्छिणारानें कुलीन, आपल्या वर्णाची, आपल्यापेक्षां वयानें लहान, अशी भार्या निवडावी. कामशांत्यर्थ दुसरी हवीच असेल तर प्रथम क्षत्रिय, मग वैश्य व मग शूद्र असा क्रम तरी ठेवावा ॥ ३९ ॥

यजन अध्ययन, दान हीं कर्में करण्याचा सर्व द्विजांना अधिकार आहे परंतु दान घेणें ( प्रतिग्रह ), शिकविणें ( अध्यापन ) आणि याज्ञिक कर्म चालविणें ( याजन ) ह्या कर्मांचा अधिकार ब्राह्मणांस मात्र आहे ॥ ४० ॥ आतां दान घेतलें असतां तपाचा, तेजाचाच यशाचा भंग होतो, असें ज्या ब्राह्मणास वाटतें त्यानें शिक्षण

याजन हीं कर्में करून कुटुंबनिर्वाह करावा; पण हीं कर्मेंहि दूषित वाटत असतील तर शेतकऱ्यांनीं सर्व पीक नेल्यानंतर शेतांत शिल्लक राहिलेले दाणे टिपावे. या टिपण्याला ' शिल ' म्हणतात ॥ ४१ ॥

ब्राह्मणाचा देह फार महत्त्वाचा आहे. यासाठीं क्षुद्र इच्छा धरून तत्पूर्तीप्रीत्यर्थ, त्या देहाला खर्चीं घालूं नये. अत्यंत कठिण तपामध्यें मात्र त्याचा विनियोग करावा आणि परोपकार करून समाजाला सुख झालेलें पाहावें व परलोकीं अनंत शुद्धसुख भोगावें एतदर्थच ब्राह्मणदेहाची योजना आहे. ॥ ४२ ॥ आतां सांगितलेली शिलवृत्ति आणि उंछ ( बाजारांत दाणे विकतात तेथें सांडलेलें धान्य टिपणें हें उंछ ) या दोन वृत्ति आदरून समाधानानें उदरनिर्वाह करणारा आणि आतिथ्यादि गृहस्थधर्म पाळून शुद्ध धर्माचें अनुष्ठान करणारा गृहस्थ, माझा एकनिष्ठ भक्त असला म्हणजे तो गृहस्थाश्रमांत असला तरी अनासक्त असतो व त्याला उत्तम प्रकारची शांति मिळते ॥ ४३ ॥ आतां ज्या गृहस्थांस धनसंपन्नता असते, त्यांनीं जर माझ्या विप्रभक्ताला दारिद्र्याच्या संकटांतून सोडविण्याचें व्रत ठेवलें, तर समुद्रांतून नाव जशी तारून नेते त्याप्रमाणें त्या संपन्न गृहस्थावर आलेलीं संकटें मी लगोलग नाहींशीं करतों व त्यास तारतों ॥ ४४ ॥ राजानें सर्व प्रजाजनांचीं संकटें नाहींशीं करून लोकांचा उत्कर्ष करावा. राजा प्रजेचा पिता म्हणून त्यानें प्रजेचीं सर्व संकटें निवारावीं व आपल्यावरील संकट आपण स्वतःच वारावें. असा प्रजासंकटनिवारक आणि आपला आपण तारक जो राजा, त्याला ' धीर ' हें विशेषण शोभतें. हत्तीचा नायक जसा इतर हत्तींवर आलेल्या आपत्तींचें निवारण करून स्वसंरक्षणहि करितो, तसेंच त्याचें वर्तन असावें ॥ ४५ ॥

अशा वर्तनाचा राजा इहलोकींच्या आपत्ती नष्ट करतो. असल्याच राजाला स्वर्गलोकीं नेण्यास सूर्यासारखें तेजस्वी विमान येतें व तो इंद्रासह स्वर्गलोकचें सुख भोगतो. तात्पर्य प्रजापालन व प्रजेच्या संकटाचें निवारण, हीं राजाचीं मुख्य कर्तव्यें होत ॥ ४६ ॥ योगक्षेम चालविण्याची आपदा प्राप्त झाल्यास ब्राह्मणानें वणिग्वृत्ति स्वीकारून क्रयविक्रयाचें दुकान मांडावें, किंवा शस्त्रधर होऊन उपजीविका चालवावी. परंतु नीचसेवा करून श्वानाची लांगूलचालनवृत्ति केव्हांहि पतकरूं नये ॥ ४७ ॥ विपत्कालीं राजानें अथवा क्षत्रियांनीं वैश्याची वृत्ति धारण करावी किंवा मृगयेवर पोट भरावें. प्रसंगीं अध्यापनाचेंहि काम घ्यावें, पण नीचसेवा करूं नये ॥ ४८ ॥ वैश्याला आपत्प्रसंग आलाच तर शूद्रवृत्ति आदरावी आणि शूद्रानें संकटकाळीं कारूंचा धंदा ( चटया विणणें वगैरे ) करावा. ही केवळ आपत्ति टाळण्याची तोड आहे. आपत्ति संपली कीं ज्याची त्यानें आपली वृत्ति घ्यावी. ( योगक्षेमासाठीं श्रुतिस्मृतींनीं विहित केलेलें स्वकर्म पुनः हातीं घ्यावें ) ॥ ४९ ॥

वेदाध्ययन ( स्वाध्याय ), पितरांसाठीं स्वधाकर्म, देवांच्या तर्पणासाठीं स्वाहाकर्म, भूतांसाठीं बलिदान आणि मनुष्ययज्ञांसाठीं अन्नादींचें संतर्पण यथाशक्ति करावेंच करावें. उद्धवा ! देव, ऋषि, पितर, भूतें हीं सर्व माझींच स्वरूपें आहेत अशी श्रद्धा ठेवून हे पंचमहायज्ञ प्रतिदिवशीं करावे ॥ ५० ॥

आपल्यास दुसरीकडून मिळालेलें असो, किंवा आपण स्वतः कमावलेलें असो, त्या धनाचा विनियोग पंचमहायज्ञांमध्यें सावधपणें करावा. मात्र या यज्ञांनीं आपल्या आश्रितांची आबाळ होईल असें करूं नये ॥ ५१ ॥

कुटुंबांतील मंडळीवर केव्हांहि आसक्त नसावें. कुटुंबी असूनहि माझें ध्यान, भजन हा मुख्य धर्म सोडूं नये. हें दृष्ट जसें नश्वर, नाशवंत आहे, असेंच अदृष्टहि ( कर्म-कलापाच परिणाम फळ असल्यामुळें ) नाशवंत आहे असा शहाण्या पुरुषानें निश्चय ठेवावा ॥ ५२ ॥ पुत्र, कलत्र, मित्र, आप्त, बंधुबांधव यांचा समागम आणि वाटेंतील वाटसरूंचा संबंध एकसारखाच उभयतांहि आळूसोबती ! निद्रा संपली म्हणजे निद्रा-कालांतील स्वप्न जागरांत नाहींसें होतें तसेंच या देहांतील ओळखीने दारा, पुत्र, स्नेही दुसऱ्या लोकांत नसावयाचेच ॥ ५३ ॥ असा विचार करून तो जीवन्मुक्त पाहुण्या-सारखा वागतो; म्हणून तें गृह त्याला बद्धक होत नाहीं. सारांश तो निर्मम आणि निरहंकार असतो. ' मी ' व माझें ' हे बंध त्यानें तोडून टाकलेले असतात ॥ ५४ ॥

असो; याप्रमाणें गृहमेध, अग्निहोत्र इत्यादि कर्मांनीं जो माझा भक्त माझेंच भजन करतो, तो पुरुष माझी भक्ति करूनच मोक्षमार्गाला लागतो. पुत्र कर्ते झाले म्हणजे हा माझा भक्त वानप्रस्थ आश्रम स्वीकारतो अथवा चौथा संन्यासाश्रम स्वीकारतो किंवा घरींहि पाहुण्यासारखा राहतो ॥ ५५ ॥ परंतु जो मानव देह, गेह, पुत्र, धन असावें अशी आशा धरून तदर्थच कर्म करतो, त्यांत आसक्त राहून, स्त्रैण आणि मंदमति बनतो, तो बिचारा ' मी व माझें ' या दृढ रज्जूंनीं संसाराच्या जन्ममरणात्मक चक्राला बांधला जातो ॥ ५६ ॥ " माझीं वृद्ध-मातापितरें, माझ्या बाळांची तरुण आई, माझीं लहान बालकें माझ्याव्यतिरिक्त अनाथ होतील, दीन होतील, माझ्या मागें त्यांचें आयुष्य कसें जाईल. जगलींच तर खातील काय ? देवा ! मला जगलेंच पाहिजे ! " ॥ ५७ ॥ याप्रमाणें विवळणारा हा मंदमति गृहस्थ गृहपाशांनीं बांधला जाऊन भ्रष्टमति होतो, ' मी व माझें ' हें त्याचें ध्यान असल्यामुळें तो नेहमीं असंतुष्टच राहतो आणि मेला म्हणजे घोर नरकलोकांत जाऊन पडतो ! काय हा आसक्तीचा भयंकर परिणाम ! ॥ ५८ ॥

सतरावा अध्याय समाप्त

# अध्याय १८ वा

---

भगवान् श्रीकृष्ण म्हणतात, वानप्रस्थ आश्रम घेऊं इच्छिणाऱ्या पुरुषानें आपल्या पत्नीसह वनांत जावें अथवा तिच्या संरक्षणाची जबाबदारी पुत्राकडे देऊन नंतर वानप्रस्थाश्रम घ्यावा आणि तेथें शांत वृत्तीनें आपल्या आयुष्याचा तिसरा भाग म्हणजे ५० ते ७५ वर्षें वनांतच घालवावीं ॥ १ ॥ तेथें वनांत मिळणारीं पवित्र फळें किंवा मुळ्या आणि कंद यांवरच आपला उदारनिर्वाह करावा. आच्छादनासाठीं झाडांच्या साली म्हणजे वल्कलें, तृण म्हणजे गवताचीं तागाचीं वस्त्रें अगर झाडाचीं पानें अथवा मृगांचीं कातडीं, यांचा वस्त्रांप्रमाणें उपयोग करावा ॥ २ ॥ अंगावरील मळ, गुह्य मार्गावरील रोम, तोंडावरील मिशा अगर दाढी, तात्पर्य हे सर्व केश व नखेंही काढूं नयेत; दांत घासूं नयेत. तिन्ही काळीं पाण्यांत डुंबावें, पण अंग घासूं नये ! भूमीवर अंथरूण करावें ॥ ३ ॥ उन्हाळ्यांत पंचाग्निसाधन करावें, पावसाळीं धो धो पाऊस पडत असतां पाण्यांत निर्विकार उभें राहावें आणि थंडीच्या दिवसांत गळ्याइतक्या पाण्यांत असावें. याचेंच नांव शारीरिक तप होय ॥ ४ ॥

अग्नीनें भाजलेलें अथवा झाडांवरच पिकलेलें ( उन्हांत वाळलेलें ) अन्न ( कंद, मुळें इत्यादि ) खावें. कंद वगैरे कठीण असतील तर उखळांत कांडावे, दगडांनीं ठेचावे अथवा दांतांचेंच उखळ करून बारीक करून खावें ॥ ५ ॥

आपल्या शरीरधारणासाठीं जीं काय कंदमुळें वगैरे लागतील अथवा आच्छादनाला कांहीं हवें असेल, तें सर्व आपण स्वतः श्रम करून जमा करावें. आपण राहतों तो प्रदेश, ऋतु व आपलें सामर्थ्य जाणून योग्य पदार्थ स्वतः मिळवावे; दुसऱ्यानें दिलेलें कांहीं उपयोजूं नये ॥ ६ ॥

आग्रयणादि ( आश्विन अगर मार्गशीर्षांत कर्तव्य असणारे धार्मिक विधि ) कर्मांत वन्य पदार्थांचेंच पुरोडाश करून अग्निसमर्पण ( ईशसमर्पण ) करावें. श्रौतामध्यें सांगितलेली पशुहिंसा करून वानप्रस्थानें माझें यजन करूं नये. ॥ ७ ॥ पूर्वीप्रमाणेंच ( पशुहिंसा न करितां ) अग्निहोत्र, दर्श, पूर्णमास चातुर्मास्यें हीं श्रुतिविहित कर्में वानप्रस्थ-मुनीनें करावीं ॥ ८ ॥ अशा रीतीनें आचरलेल्या दीर्घ तपश्चरणानें शरीरावर केवळ शिरांचें जाळें असलेला मुनि, जर तपद्वारा माझें ( तपोमय असणाऱ्या माझें ) आराधन करील, तर तो ऋषिलोकास जाऊन तेथून माझ्या म्हणजे ब्रह्मलोकास येऊन पोहोंचतो ॥ ९ ॥ या प्रकारें अत्यंत कष्ट सोसून आचरलेलें, मोक्षाला योग्य असें, मोक्षदायक जें तप, त्याचा विनियोग, तुच्छ अशा विषयप्राप्तीकडे करणाऱ्या पुरुषाला जास्त मूर्खावस्थाही मिळणार नाहीं ! ॥ १० ॥ म्हातारपणामुळें हात, पाय, मान इत्यादि

कांपूं लागल्यामुळें वानप्रस्थाचीं कर्तव्यें मुनीला उरकतां येईनाशीं झालीं तर त्यानें जिवंत ठेवलेल्या अग्नीचा समारोप आपल्या प्राणांत करावा, आणि माझे म्हणजे परमेश्वराचे ठिकाणीं चित्त ठेवून अग्नींत प्रवेश करावा, अग्निकाष्ठें भक्षावीं ॥ ११ ॥ परंतु कर्माचें फल भोगण्यासाठीं जे बरेवाईट लोक ( भुवनें ) मिळतात, ते सर्व अत्यंत दुःखरूप—प्रत्यक्ष नरकवासच—आहेत, असें ज्ञान झाल्यामुळें विषयांचा, विषय प्राप्त करून देणाऱ्या कर्मांचा व त्या त्या कर्मांच्या फलाचा तिरस्कार उत्पन्न होऊन वानप्रस्थाला वैराग्य प्राप्त झालें असेल, तर शास्त्रोक्त पद्धतीनें अग्नींचा त्याग करून नंतर त्या विरक्त वानप्रस्थानें चतुर्थाश्रमांत शिरावें—संन्यास घ्यावा ॥ १२ ॥

या विरक्तानें शास्त्राज्ञेनुसार आठ श्राद्धें व प्राजापत्य नामक इष्टीचे विधि प्रथम करावे व करून तीं कर्में मला अर्पण करावीं, आपल्याजवळ जें काय असेल तें आचार्याला देऊन टाकावें, अग्नीस प्राणरूपी आत्म्यांत ठेवावें आणि मग सर्वथा निरिच्छ होऊन संन्यासी व्हावें ॥ १३ ॥ संन्यास घेण्याच्या प्रसंगीं भार्यादिरूपानें देवच आडवे येतात व विघ्नें उत्पन्न करतात. कारण त्यांस भीति वाटते कीं, हा विरक्त आम्हांस ओलांडून परमात्म्याला गांठील व आम्हांस हव्य मिळणार नाहीं ॥ १४ ॥ संन्याशास दुसरें वस्त्र हवेंसें वाटलें तर लंगोटीशिवाय नितंबयाच लांबीरुंदीचें वस्त्र घ्यावें. कारण आश्रम घेतांना सर्वस्वाचा त्याग केलेला असतो म्हणून त्यानें शरीरस्वास्थ्य असतांना दंड-कमंडलूशिवाय दुसरें कांहीं जवळ ठेवूं नये ॥ १५ ॥

पुढें अपवित्र कांहीं नाहीं, असें पाहून नेहमीं पाऊल टाकावें, वस्त्रानें गाळून पाणी प्यावें शुद्ध — सत्य तेंच बोलावें आणि विवेकानें शुद्ध आचरावें ॥ १६ ॥

वाणीचा निग्रह करणारा मौनरूपी दंड, शरिराला नियमित रीतीनें वागण्यास लावणारा वासनांचा अभावरूपी दंड व चित्ताला दाबांत ठेवणारा प्राणायामरूपी दंड हे तीन दंड, जो बाळगीत नाहीं त्यानें कितीहि वेळूचे दंड बाळगिले, तरी त्याला यतित्व प्राप्त होत नाहीं. सारांश, प्रत्येक यति मौनी, निष्काम आणि प्राणायामी असलाच पाहिजे, हेच तीन दंड होत ॥ १७ ॥ पतित लोक वर्जून चारी वर्णांत भिक्षा मागावी. अकल्पित अशा सात घरीं मात्र भिक्षा मागावी व जें काय मिळालें असेल, त्यांत संतोष मानावा ॥ १८ ॥ नंतर गांवाबाहेर असणाऱ्या जलाशयावर ( नदी, ओढा, विहीर, तळें इ. ) जाऊन ती भिक्षा जलांत बुडवून शुद्ध करावी, अथवा मंत्रानें प्रोक्षावी. त्या शुद्ध भिक्षेचे चार भाग करावे आणि एक भाग विष्णूला व एक भूतांस अर्पून दोन भागाचें सेवन करावें ॥ १९ ॥ एकट्यानें पर्यटन करावें, निःसंग असावें, इंद्रियें निग्रहावीं; आत्म्याशींच क्रीडा करावी. आत्म्यावरच सर्वस्व प्रेम ठेवावें, आत्मचिंतनांतच निमग्न असावें आणि सर्वत्र समदृष्टि असावें. उच्चनीच ही भावना नसावी ॥ २० ॥ नेहमीं एकांत असणाऱ्या निर्भय स्थानीं असावें. माझ्या चिंतनानें अंतःकरण

शुद्ध करावें. एकच आत्मा आहे व तो परमात्म्याहून भिन्न नाहीं, ब्रह्मात्मैक्यच आहे, असें ध्यान मुनीनें अखंड करावें ॥ २१ ॥

आत्म्याला बंध कसा प्राप्त होतो व तो मुक्त कसा होतो, याचा विचार ज्ञाननिष्ठाच्या साहाय्यानें अखंड करावा. उद्धवा ! इंद्रियें, मन बुद्धिप्रभृति तत्त्वें जोरावर झालीं कीं, तीं विक्षेप उत्पन्न करतात. त्यायोगें जीवात्मा बद्ध होतो. परंतु तींच निग्रहांत होऊन विवेकाधीन असलीं म्हणजे जीवात्मा मुक्त होतो ॥ २२ ॥

म्हणून या षड्वर्गाचा ( काम क्रोधादि षड्रिपूंचा ) संयम माझें स्वरूप ध्यानात धरून करावा, तुच्छ कामना टाकून देऊन त्यानें विरक्त व्हावें. मोठा जो आत्मानंद त्यांत निमग्न होऊन जीवयात्रा कंठावी ॥ २३ ॥ नगरें, खेडेगावें, गोकुळें, यात्रास्थानें, येथें इच्छेनुसार जाऊन भिक्षा मागावी. पुण्यक्षेत्रें, गंगासारख्या नद्या, हिमाचलासारखे पर्वत, अद्वैतवनासारखीं तपोवनें, ऋषींचे आश्रम इत्यादि स्थानांनीं पवित्र झालेली भूमि संचारार्थ उपयोजावी. सर्वदा पर्यटन करीत असावें ॥ २४ ॥ भिक्षा मागणें ती विशेषतः वानप्रस्थां-च्या आश्रमांत मागावी, कारण शिलोंछ वृत्तीनें संपादलेलें वानप्रस्थांचें अन्न भिक्षूला पवित्र करतें, मोह निरस्त करतें आणि चित्तशुद्धिनामक जी सिद्धि ती लवकर प्राप्त करून देतें ॥ २५ ॥ हें विश्व व या विश्वांतील सर्व पदार्थ इंद्रियांस गोचर होणारे म्हणून ते नश्वर अर्थात् असत् = मिथ्या आहेत, असें अंततः समजून घ्यावें. आणि हें दृश्य विश्व मिथ्या आहे, हें जाणून त्यावर केव्हांहि आसक्ति ठेवूं नये. इतकेंच नव्हे तर ऐहिक व स्वर्गीय भोगांपासून व भोगाच्या इच्छांपासूनहि निवृत्त व्हावें. तात्पर्य, भोग व भोगाशा सोडून द्यावी ॥ २६ ॥

मन, वाणी व प्राण यांच्यासह असणारें हें विश्व म्हणजे आत्म्याच्या आश्रयानें दिसणारी माया आहे असें प्रमाणशुद्धतर्कानें ठरवावें आणि आपल्या आत्मस्वरूपांत स्वस्थ राहावें. अर्थात् यतीनें विश्वत्याग करावा. फार काय ? त्याचें स्मरण सुद्धां ठेवूं नये ॥ २७ ॥ तो यति ज्ञाननिष्ठ असून विरक्त असो अथवा माझा अनन्य भक्त असल्यामुळें निष्काम असो, (ब्रह्म व आत्मा एकच अशी ज्ञानविज्ञानपूर्वक निष्ठा असणारा यति वैराग्यसंपन्न असतो, तसाच ईश्वराचा जो अनन्य भक्त असतो तोही निष्काम म्हणजे विरक्त असतो. तात्पर्य, ब्रह्मज्ञान व परमेश्वरभक्ति कांहींही असो, तें तें परमोत्कर्षाप्रत गेलेलें असल्यानें दृश्याविषयीं दृढ व निःसीम वैराग्य उत्पन्न झालेंच पाहिजे. ) तात्पर्य, नैष्ठिक-ज्ञानी व नैष्ठिकभक्त यांनीं आश्रमांचा त्याग खुशाल करावा. श्रुतीनें सांगितलेल्या विधींची मातब्बरी ज्ञान्यापाशीं किंवा भक्तापाशीं नाहीं ॥ २८ ॥ प्रौढ असतांहि हे ज्ञानी भक्त अर्भकांचे ( लहान मुलांचे ) खेळ खेळतील, संकटें टाळतां येत असतांहि जडाप्रमाणें ( दगडधोंड्याप्रमाणें ) तीं तीं संकटें सहन करतील, कळत असूनहि भलतीच बडबड करतील व वेदवेत्ते असून स्वैर वर्तन करतील ! सारांश, त्यांना विधिनिषेध नसतोच ॥ २९ ॥ काय करावें, काय नाहीं, या वेदवादांच्या फंदांत ते पडत नाहींत. ते

नास्तिक नसतात ' व तर्कादिकांचे दासहि नसतात. निरर्थक वाद न करितां कोणताही ' अस्ति, नास्ति ' पक्ष स्वीकारीत नाहींत असे ते असतात अथवा त्यांनीं असावें ॥ ३० ॥

हे बुद्धिमान् समाजाला कंटाळत नाहींत अथवा समाज कंटाळेल असेंही वागत नाहींत. कोणी त्यांस शिव्या दिल्यास त्याचा अपमान करीत नाहींत किंवा देहबुद्धि ठेवून पशूप्रमाणें कोणाचें वैरही करीत नाहींत ॥ ३१ ॥ कारण सर्व भूतांच्या ठिकाणीं, व आपल्या जवळच्यांतही एकच एक अद्वितीय परमात्मा अखंड वास्तव्य करीत आहे, तसेंच सर्व भूतें आत्मनिर्मित आहेत, असें ज्ञान असल्यामुळें, ते द्वेषापासून अलिप्त राहतात. अनेक जलपात्रांत प्रतिबिंबलेला चंद्र एकच असतो; परंतु निरनिराळ्या पात्रांतील त्याचीं प्रतिबिंबें कधीं तरी एकमेकांचा द्वेष करतात काय ? ॥ ३२ ॥ भिक्षा मिळणें न मिळणें हें दैवाधीन आहे असें समजून धीरवंत ज्ञानी कधीं पुष्कळ भिक्षा मिळाली म्हणून हर्षित–आनंदित–नाहींत किंवा मुळींच मिळाली नाहीं म्हणून खिन्नहि होत नाहींत. हर्षविषादांच्या पलीकडे हे साधू गेलेले असतात ॥ ३३ ॥ तथापि शरीर जिवंत राहावें म्हणून मात्र भिक्षा मागण्याचा प्रयत्न करावा. कारण या मनुष्यदेहामध्यें मात्र जिवाला मोक्ष मिळवून देण्याचें सामर्थ्य असतें. अर्थात् प्राणधारणाची युक्तता अवश्य आहे ॥ ३४ ॥

मत्स्वरूपीं लीन असलेले ज्ञानवंत अन्न गोड का कडू इकडे लक्ष देत नाहींत. या आत्मरतांचें लक्ष तिकडे असतच नाही. जें काय अन्न, वस्त्र व निजण्याचें ठिकाण यदृच्छेनें प्राप्त होईल, त्यावर ते संतुष्ट असतात ॥ ३५ ॥ शौच, आचमन, स्नान, जप, ध्यान, उपासना वगैरे ते करतात; पण श्रुति तें तें कर्म करावयास सांगते म्हणून मात्र नव्हे. कारण श्रुतीनें सांगितलेल्या फळांची आशाच त्यांना नसते. तर परमेश्वर जसा लीलेनें व स्वतंत्रपणें वागतो व कर्म करतो, तसेंच हे ज्ञानी स्वतंत्रतः कर्म करीत असतात ॥ ३६ ॥ हे ज्ञानी माझेंच चिंतन व ध्यान करीत असल्यामुळें, त्यांची भेदबुद्धि नष्टच झालेली असते. विकल्प अथवा भेद त्यांच्या गांवीं सुद्धां नसतो. देह आहे तोंवर इंद्रियें त्यांस भेद दाखवतात; पण हे भेद मिथ्या आहेत, असें कळल्यामुळें त्यांच्या चित्तांत मुळींच गडबड होत नाहीं. देह पडला कीं हे ज्ञानी मद्रूपच होतात. सारांश, ज्ञान्यांचें परोक्ष व भक्तांचें ऐकांतिक हें लक्षण होय ॥ ३७ ॥

आतां ज्यांस ब्रह्माचें परोक्ष वा अपरोक्ष ज्ञान करून घ्यावयाचें आहे, त्या जिज्ञासूंनी प्रथमतः येथील व स्वर्गांतील सर्व भोग व भोगेच्छा दुःखपूर्ण आहेत, आत्मा त्या दृश्याहून निराळा आहे, असें समजून व पटवून घ्यावें आणि नंतर ज्ञानी व साक्षात्कारी गुरूला अनन्य शरण जावें ॥ ३८ ॥ तेथें राहून या जिज्ञासूनीं पूर्ण श्रद्धेनें व निर्मत्सर बुद्धीनें गुरुसेवा करावी. गुरु म्हणजे परमात्मा अशी भावना आदरानें ठेवावी आणि ते सांगतील त्याचें

मनन व निदिध्यासन अखंड करावें. या सेवेनें व एकनिष्ठ श्रवणानें गुरु प्रसन्न होऊन तो ब्रह्माचा साक्षात्कार करून देईतोंपर्यंत त्याच्या आश्रमांत राहावें ॥ ३९ ॥

भगवान् म्हणतात, उद्धवा ! परंतु ज्याचे कामक्रोधादि अनावर आहेत, इंद्रियें स्वैर असून विवेकसारथ्याच्या लगामीं नाहींत, ज्याला ना ज्ञान ना वैराग्य, त्याचा त्रिदंडी संन्यास केवळ पोट भरण्याचा धंदा होय ॥ ४० ॥ असा हा धर्मघाती भोंदू. यज्ञसंबंधीं देवांचा, स्वतःच्या जीवात्म्याचा व तेथेंच नित्य राहणाऱ्या माझा म्हणजे परमात्म्याचा तिरस्कारच करतो, आणि या सर्वांस 'धाब्यावर' बसवितो, अर्थात् असा हा अपक्वकषायी ( म्हणजे रागी, द्वेषी, लोभी, मत्सरी, उन्मादी व मूढ संन्यासी ) आपलें ऐहिक व पारमार्थिक नुकसान करून घेतो ॥ ४१ ॥ शांति (मनाचें स्थैर्य) आणि अहिंसा हे भिक्षूचे संन्याशाचे धर्म होत. तप आणि अग्निहोत्रादि कर्मरूपांनीं यजन हे वानप्रस्थाचे धर्म व भूतांचें पालन–पोषण व अग्निहोत्रादि यज्ञ हे गृहस्थाचे आणि गुरूची एकनिष्ठ सेवा आणि श्रवणादि हे ब्रह्मचाऱ्याचे धर्म ( कर्तव्यें ) होत ॥ ४२ ॥

ब्रह्मचर्यवृत्ति, तपश्चरण, अंतर्बाह्य शुद्धि, संतोष, सर्वांशीं जिव्हाळ्याची मैत्री, हे गुणधर्म गृहस्थानें संपादावे. ऋतुकाळीं मात्र भार्यासमागम करणें, हें गृहस्थाचें ब्रह्मचर्यच होय. चारी आश्रमांतील लोकांनीं माझें आराधन श्रद्धापूर्ण भक्तीनें करावें ॥ ४३ ॥ याप्रमाणें स्वस्ववर्णांचीं व आश्रमाला विहित असणारीं कर्तव्यें करीत असतांनाच जो माझी अनन्यभक्तीनें उपासना करतो, सर्व स्थिरजंगमामध्यें मीं परमात्मा अखंड असें आहें पाहतो, त्याला लवकरच माझी 'परमाभक्ति' प्राप्त होते ॥ ४४ ॥

उद्धवा ! अशी ही अखंड परमश्रेष्ठ भक्ति उत्पन्न झाली म्हणजे सर्व ब्रह्मांडाची उत्पत्ति व संहार करणारा, सर्वकारण असणारा, सर्व भुवनांचा नियामक जो मी परमात्मा तोच सर्व आहे, भक्ताचा आत्माही तोच आहे, असें ज्ञान होऊन माझा साक्षात्कार होतो व तो अनन्य भक्त ज्ञानविज्ञानी होऊन मद्रूप होतो, मुक्त होतो ॥ ४५ ॥ तात्पर्य, याप्रमाणें स्वधर्माचरणामुळें शुद्धचित्त झालेला, माझी भक्ति केल्यामुळें माझें म्हणजे भगवंताचें ऐश्वर्य साक्षात् जाणणारा निष्काम भक्त ज्ञानविज्ञानसंपन्न होतो आणि शेवटीं माझ्या स्वरूपांत मिळून मत्स्वरूप, परमात्मरूप प्राप्त करून घेतो ॥ ४६ ॥ हा जो वर्ण आणि आश्रम यांस विहित असणारा आचारस्वरूपी धर्म तुला एवढा वेळ सांगितला, त्यालाच माझ्या भक्तीची जोड मिळाली. प्रत्येक कर्म ईश्वरार्पण बुद्धीनें होऊं लागलें, म्हणजे तोच विहित आचार उत्तमोत्तम पदप्राप्तीचा मार्गदर्शक होतो ॥ ४७ ॥ असो. या प्रकारें, हे लोकसंग्राहक उद्धवा ! हे साधो ! तू जे जे काय प्रश्न केलेस त्यांचीं उत्तरें मीं दिलीं आणि हीं उत्तरें देतांना असेंही स्पष्ट सांगितलें कीं, माझ्या भक्तीचें रसायन जर स्वधर्माचरणाच्या पाकांत घातलें तर मोक्ष सुकर होतो. माझी भक्ति व स्वधर्माचरण यांचें मिश्रण कसें करावें, हेंही तुला सांगितलेंच ॥ ४८ ॥

**अठरावा अध्याय समाप्त**

# अध्याय १९ वा

श्रीभगवान् म्हणतात, उद्धवा ! ज्या मुमुक्षु भक्तानें श्रुतींचें श्रवण, मनन, निदिध्यासन करून साक्षात्कारापर्यंत आपला आत्माभ्यास आणिला व प्रत्यक्ष साक्षात्कार करून घेऊन 'मीच परब्रह्म आहें' असा निश्चय स्वानुभवानें संपादिला, त्यानें 'हें सर्व दृश्य मायामय म्हणजे मिथ्या होय' असें जाणावें आणि 'ही माया व मी त्या मायामय विश्वाचा ज्ञाता, तसेंच ब्रह्मज्ञाता' हें ज्ञानही मला समर्पण करावें. तात्पर्य 'अहं'च्या अस्तित्वाचा, ज्ञातेपणाचा व मुक्तीपणाचाही त्याग करावा ॥ १ ॥ परमार्थज्ञात्याला मी परमेश्वरत्व, पूर्ण ब्रह्मस्वरूपच अत्यंत प्रिय. तोच त्याचा स्वार्थ म्हणजे परम पुरुषार्थ असतो; परब्रह्मज्ञान हेंच त्याचें ज्ञानसाधन असतें. त्याचा 'स्वर्ग' पाहणें, त्याचा मोक्षही परब्रह्मच. सारांश, आत्मज्ञान्याला [illegible] प्रिय असतोच ॥ २ ॥ याप्रमाणें आत्मज्ञानी [illegible] माझें, परब्रह्माचें स्थान म्हणजे स्वरूप समजतें. अर्थात् [illegible] अत्यंत प्रिय असतो आणि तो ज्ञानी, ज्ञानस्वरूपानें माझें [illegible] करतो ॥ ३ ॥ उद्धवा ! अशा ब्रह्मज्ञानाच्या एकाच अंशांत जें मोक्षसामर्थ्य आहे त्या अंशाच्या अंशाचें सुद्धां सामर्थ्य नुसत्या तपांत, तीर्थाटनांत, दानांत किंवा इतर पवित्र म्हणून मानलेल्या कोणत्याही कर्मांत नाहीं. म्हणून ज्ञानाव्यतिरिक्त सर्व कर्म फोल, कुचकिंमतीचें असतें ॥ ४ ॥ म्हणून उद्धवा ! परब्रह्माच्या ज्ञानासहित तूं आपल्या जीवात्मस्वरूपाचें ज्ञान संपाद; आणि याप्रमाणें ज्ञान-विज्ञानसंपन्न झालास, परमात्मा व जीवात्मा यांचें ज्ञान तुला झालें म्हणजे तीं दोन्हीं स्वरूपें एकात्मकच आहेत, अभिन्न आहेत, असें ज्ञान प्राप्त होईल. याकरितां एकनिष्ठ भक्तीनें तूं माझें भजन कर ॥ ५ ॥ भक्तोत्तम उद्धवा ! आतांच सांगितलेल्या ज्ञानविज्ञानयज्ञानें मी आत्मस्थ जो परम आत्मा, त्याचें जीवात्म्याच्या स्वरूपांत, जीवात्मस्थानांत यजन करून अनेक मुनि मुक्त झाले आहेत. मी जो सर्व यज्ञांचा स्वामी, त्याची एकांतिक भक्ति ज्ञानरूपानें करणारा व ती त्यालाच अर्पण करणारा ज्ञानी भक्त मुक्त झालाच पाहिजे ॥ ६ ॥

उद्धवा ! भौतिक, दैविक व मानसिक विकार तुझ्या आश्रयानें मात्र राहतात, ते तुझें स्वरूप नव्हेत. कारण ते तुझ्या देहाच्या व सृष्टीच्या जन्माच्या पूर्वी नसतात, देह किंवा सृष्टि संपल्यानंतरही नसतात. म्हणून ते तुझें स्वरूप नव्हेत. अर्थात् ते अनात्मकाचे, मायेचे राज्यांत राहणारे असतात. तेव्हां हे भौतिकादि विकार जन्मास आले किंवा कांहीं वेळ राहिले, अथवा यांचा नाश झाला, तरी तूं जो निर्विकार, त्या तुला त्यासंबंधानें हर्षखेद मानण्याचें कांहींच कारण नाहीं. शिवाय, जें जन्मापूर्वी नसतें, मेल्यावर नसतें, तें मधील स्थितींतही स्वरूपतः नसतेंच. जें दिसतें, तो नुसता भास मात्र आहे ॥ ७ ॥

उद्धव म्हणतो--हे विश्वनायका, विश्वरूपा, भगवान् श्रीकृष्णा ! वैराग्य आणि विज्ञान यांनीं संयुक्त असलेलें शुद्ध व सनातन आत्मज्ञान मला पूर्णपणें समजेल अशा रीतीनें कृपा करून सांग. त्याचप्रमाणें मोठमोठ्या ब्रह्मदेवादिकांसही हुडकून काढावा लागतो, तो भक्तियोगही मला सांग ॥ ८ ॥ प्रभो ! भौतिकादि त्रिविध तापांनीं मला बतावून सोडलें आहे, भयंकर असा हा जो संसाराचा मार्ग त्यावरून जातां जातां मी होरपळून निघालों आहें. देवा ! अमृताचा नित्य वर्षाव करणारें जें तुझें चरणकमलद्वय, त्याच्याशिवाय मला तारक होणारा दुसरा आश्रय दिसत नाहीं ॥ ९ ॥ हे अत्युदार मनाच्या पुराणपुरुषा ! या संसाराच्या विवरांत--बाळांत--पडलेल्या मला काळरूपी सर्पानें अनेक चावे घेतले आहेत, तरी पण क्षुल्लक सुखाची तीव्र आशा करणें ही आमची जीवांची खोड जातच नाहीं. म्हणून कृपा कर, आणि मोक्ष देणाऱ्या उपदेशामृताचा वर्षाव करून माझ्या विकृत जखमा बऱ्या कर, माझी क्षुद्र सुखतृष्णा शांत कर, तात्पर्य माझा उद्धार कर ॥ १० ॥

श्रीभगवान् म्हणतात, उद्धवा ! सद्धर्माचें ज्ञान पूर्ण असून तदनुसार आचरण करणारांमध्यें श्रेष्ठ असणारा जो वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध पितामह भीष्म त्याला निर्वैर असणाऱ्या राजा धर्मानें आमच्या सर्वांच्या समक्ष अशाच प्रकारचा प्रश्न विचारला होता ॥ ११ ॥ भारती महायुद्धांत घडून आलेल्या आप्तेष्टांच्या निधनानें सारखी तळमळ लागलेल्या धर्मानें शेवटीं मोक्षधर्मासंबंधानें भीष्मास प्रश्न केला; कारण मोक्षेतर धर्मांनीं त्याचें समाधान मुळींच झालें नव्हतें ॥ १२ ॥ त्या वेळीं देवव्रत जो भीष्म त्यानें आत्मकल्याणार्थ व धर्मराजाच्या समाधानार्थ जे धर्म ( जें ज्ञान व जीं कर्तव्यें ) सांगितले तेंच तुला सांगतों. उद्धवा ! भीष्मानें केलेला उद्धारक उपदेश, ज्ञान, वैराग्य, विज्ञान, श्रद्धा, भक्ति या सर्वांनीं ओतप्रोत भरलेला होता ॥ १३ ॥ पुरुष, प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार आणि पांची भूतांच्या पांच तन्मात्रा मिळून नऊ; मन, पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें मिळून अकरा; पांच पृथ्वीप्रभृति महाभूतें आणि सत्त्व, रज आणि तम मिळून तीन; याप्रमाणें ९ + ११ + ५ + ३ = २८ अठ्ठावीस तत्त्वें या आब्रह्मस्तंबपर्यंतच्या ( ब्रह्मदेवापासून तों थेट गवताच्या काडीपर्यंतच्या ) कार्यांत सदैव आहेत, असें ज्या ज्ञानानें समजतें आणि या सर्वांत अठ्ठावीस तत्त्वांतही एकच परमात्म वस्तु सदैव विद्यमान असते, असें ज्यामुळें ज्ञात होतें, तेंच ज्ञान होय, असा माझा निःसंदेह निश्चय आहे. सृष्टीची घटना २८ तत्त्वांनीं झाली आहे व या अठ्ठावीस तत्त्वांची विद्यमानता एका परमात्मस्वरूपाशिवाय नसते, असें ज्या ज्ञानानें समजतें, तेंच तत्त्वज्ञान होय ॥ १४ ॥ आणि ज्या ज्ञानानें हा अवघा प्रपंच परमात्मस्वरूपच आहे असें समजतें, तें ज्ञानही अनेकात्मक नसून केवळ परमात्मरूपच आहे, एकच एक आहे, असें स्वानुभवानें कळतें म्हणजे त्या ज्ञानाला विज्ञानाचें रूप येतें. उद्धवा ! त्रिगुणात्मक जे यच्चयावत् पदार्थ आहेत, त्यांची उत्पत्ति, स्थिति व लय ही सर्व घटना त्या परब्रह्मरूपी कारणापासून

मात्र होते. सारांश, एकच परम तत्त्व आहे. त्याच्या लीलेनें अनेकत्वाचा आभास होतो. इतकेंच ॥ १५ ॥ उद्धवा ! भाव म्हणजे त्रिगुणांनीं उत्पन्न केलेले जड पदार्थ व मानसिक भावना. या उत्पन्न होण्याच्या पूर्वी यांचा नाश झाल्यानंतर व यांचीं रूपांतरें (मातीपासून कपाळ, कपालापासून घट अशीं) होत असतांनाही जें सर्वदा विद्यमान असतें आणि घटाचें कपालांत (खापरांत) व कपालाचें मातींत असा उलट क्रम झाल्यानंतरही जें अवशिष्ट राहतें, तें सत् होय. अविकृत स्वरूपानें जें नित्य व सर्वव्यापी असतें, तें सत् होय ॥ १६ ॥

भगवान् म्हणतात, उद्धवा, प्रमाणें चार प्रकारचीं आहेत. श्रुति म्हणजे आप्तवाक्यें, प्रत्यक्ष, ऐतिहासिक आणि अनुमान हीं तीं चार प्रमाणें होत. या चार प्रमाणांना गोचर नसणारा किंवा या प्रमाणांनीं खंडित न होणारा भेदबुद्धीपासून विरक्त असतो. बाधित तें सर्व नश्वर होय असा त्याचा निश्चय असतो. ॥ १७ ॥ कर्म व कर्मफलें नश्वर होत. ब्रह्मदेवापर्यंत सर्व उत्पन्नजात नश्वर, दुःखकारक होय असें अनुमान करणारा पुरुष पंडित होय ॥ १८ ॥ उद्धवा, तूं माझा सखा. तेव्हां तुझ्या मनाचें समाधान व्हावें, म्हणून भक्तियोग सांगितला आहेच ! तथापि माझ्या भक्तीचें जें परम कारण तें सांगून भक्तियोगाची पूर्णता करतों ॥ १९ ॥ माझ्या मोक्षदायी कथांवर श्रद्धा ठेवणें, त्यांचें श्रवण करणें, नेहमीं माझ्या गुणांचें संकीर्तन करणें, माझी पूजा करण्यांत एकनिष्ठता ठेवणें व अनेक स्तोत्रें म्हणून माझी स्तुति करणें ॥ २० ॥ माझ्या सेवेंत परम आदरभाव ठेवणें, मला सादर साष्टांग नमस्कार करणें, माझ्या भक्तांचें प्रेमानें पूजन करणें, सर्व भूतांत माझें अस्तित्व आहेच असें ज्ञान असणें, माझ्या सेवेसाठीं व मला प्रिय असणारीं कर्मे करण्यासाठीं मात्र कर्म करणें, माझे गुणानुवाद गाणें, आपलें मनच मला अर्पण करणें, अर्थात् सर्व इतर वासनांचा त्याग करणें, माझ्यासाठीं सर्व उपभोगांचा व भोगसुखांचा धिक्कार करणें, जें काय यजन, दान, हवन, जप, व्रताचरण व तपश्चरण करणें तें माझ्या प्रीत्यर्थच करणें. सारांश वीसपासून तेवीस पर्यंत सांगितलेलें सर्व प्रतिक्षणीं करणें ॥ २१, २२, २३ ॥

उद्धवा, असें धर्माचरण करून मुमुक्षूंनीं मला आत्मार्पण केलें म्हणजे माझ्या ठिकाणींच त्याला प्रेमळ भक्तीचा लाभ होतो. नंतर त्या प्रेमळ व मत्स्वरूप झालेल्या भक्ताला दुसरा पुरुषार्थच राहात नाहीं. अर्थात् भक्तिव्यतिरिक्त इतर साधनांची त्याला अपेक्षाही नसते. तात्पर्य, त्याला दुसरें इष्ट असें कांहीं असतच नाहीं ॥ २४ ॥ असा हा अनन्य भक्त आपलें शांत झालेलें व सात्त्विक गुणांनीं परिपूर्ण झालेलें शुद्ध चित्त आत्म्याला म्हणजे मला अर्पितो, तेव्हां त्याला शुद्ध धर्माचा, अंतिम ज्ञानाचा, उत्कृष्ट वैराग्याचा व भगवंताच्या ऐश्वर्याचा लाभ सहजच होतो ॥ २५ ॥ परंतु याच्याच उलट जेव्हां जीवाचें चित्त विषयभोगी होऊन इंद्रियांच्या पाठीमागें धावतें, रजोगुणी होतें, अनात्मकांतच आसक्त होतें, तेव्हां तेंच चित्त अनात्मक होतें. अर्थात् त्या पुरुषाचें सर्व आचरण अधार्मिक होतें ॥ २६ ॥

याप्रमाणें धर्म = माझ्या भक्तीनें निर्माण होणारें आचरण, ज्ञान = ऐक्यात्मज्ञान-विज्ञान, वैराग्य = गुणांवर अनासक्ति, ऐश्वर्य = अणिमादि सिद्धि हें समज ॥ २७ ॥

उद्धव म्हणतो, हे शत्रुंजया ईश्वरा कृष्णा! यम किती, नियम किती, शम काय, दम काय, तितिक्षा कशाला म्हणतात, धृति कोणती ? ॥ २८ ॥ तसेंच दान, तप, शौर्य, सत्य व ऋत, त्याग, इष्टधन, यज्ञ, दक्षिणा यांचीं लक्षणें सांग ॥ २९ ॥ श्रीमन् केशवा ! पुरुषाचें बल, त्याचें भाग्य, त्याचा लाभ यांचीं स्वरूपें व विद्या आणि विनय काय, परम श्रीमंती कोणती, सुख काय, दुःखस्वरूप काय हें सांग ॥ ३० ॥ तसेंच पंडित कोण ? मूर्ख कोण ? सन्मार्ग कोणता, विपथ कोणता, स्वर्ग—नरकाचें लक्षण काय, बंधु कोण, गृह कशाला म्हणावें ? ॥ ३१ ॥

श्रीमंत कोण, दरिद्री कोण, कृपण कोण, ईश्वर कोण ? सत्प्रभो ! या प्रश्नांचा व यांच्याविपरीत जे पदार्थ त्यांचीं उत्तरें मला कृपा करून सांगा ॥ ३२ ॥

श्रीभगवान् म्हणतातः— बा उद्धवा, निरुपद्रवीपणा, यथार्थ भाषण, प्रसिद्ध वा अप्रसिद्धपणें परापहार न करणें, विषयादिकांवर अनासक्ति, मर्यादा ठेवणें, संग्रह न करणें, वेदांवर विश्वास ठेवणें, ब्रह्मचर्य पाळणें, मूक असणें, मनाला स्थिर करणें, क्षमा आणि सर्वांस अभय देणें हें बारा यम होत ॥ ३३ ॥ शरीर स्वच्छ ठेवणें, मन निर्मळ ठेवणें, मंत्राचा जप करणें, तप आचरणें, हवन करणें, श्रद्धा - धर्माविषयीं आदर असणें, अतिथीचा सत्कार करणें, माझें भजनपूजन करणें, तीर्थास जाणें, परोपकार अथवा परलोकसाधक कर्म करण्याची इच्छा असणें, संतोष, गुरूची सेवा करणें हे बारा नियम होत ॥३४ ॥

उद्धवा ! हे बारा नियमांसह बारा यम ह्या ३३ व ३४ श्लोकांत सांगितले आहेत. मुमुक्षूला यम महत्त्वाचे व संसाऱ्याला नियम महत्त्वाचे असतात. यांच्या अर्थाप्रमाणें आचरणरूप यांची सेवा झाली म्हणजे हे कल्पवृक्षाप्रमाणें उपासकांच्या सर्व इच्छा पूर्ण करतात ॥ ३५ ॥ माझ्या ठिकाणीं एकाग्र बुद्धि ठेवणें हाच शम, इंद्रियांचा निग्रह करणें हाच दम, दुःख किंवा तिरस्कार सहन करणें हीच तितिक्षा, जीभ व कामदंड यांवर प्रभुत्व गाजविणें हेंच धैर्य, असें म्हणावें ॥ ३६ ॥ दंड टाकणें (अपकार न करणें ) हाच त्याग म्हणजे परमश्रेष्ठ दान, आशेचा नाश हेंच तप होय. असें स्मृति म्हणते. आपल्या स्वभावावर जय मिळविणें — स्वभाव ताब्यांत ठेवणें हेंच शौर्य; उच्चनीचभाव नसणें हेंच सत्य होय ॥ ३७ ॥ मधुर व सत्य भाषण हेंच ऋत असें विद्वान् लोक म्हणतात. कर्मामध्यें आसक्त नसणें हीच शुद्धि, संन्यास हाच त्याग होय असें म्हणतात. ॥ ३८ ॥ धर्म पाळणें हेंच उत्तम धन, मी भगवान हाच यज्ञ, ज्ञानाचा उपदेश करणें हीच उत्तम दक्षिणा, प्राणाचा निग्रह करणें हेंच श्रेष्ठ बल होय ॥३९ ॥ माझे जे धर्म-यश-ऐश्वर्यादि सहा गुण त्यांचे ठिकाणीं श्रद्धा ठेवून त्या त्या परमेश्वरी गुणांचें अनुकरण करणें हेंच भग म्हणजे भाग्य, माझी भक्ति हाच उत्तम लाभ होय. आत्मस्वरूपांत भेद नाहीं, या

निश्चयाला विद्या म्हणावें आणि अकर्माविषयीं (कर्म अवश्य असतां न करणें व वाईट कर्म करणें याविषयीं ) तिरस्कारबुद्धि हीच न्ही होय ॥ ४० ।

तसेंच निरपेक्षतादि गुण संपादणें (कशाची आशा नसणें, स्वतंत्र असणें वगैरे सात्त्विक गुणांचें संपादन करणें ) हीच संपत्ति, दुःखाच्या व सुखाच्यापलीकडे जाणें ( विषयसुखदुःखातीत होणें ) हेंच परम सुख, इष्ट भोगांपासून सुख मिळावें ही इच्छा असणें हेंच दुःख होय. बंध वा मोक्ष जाणणारा ( बंधाचें व मोक्षाचें स्वरूप जाणून वागणारा ) तोच पंडित होय ॥ ४१ ॥ देह-गेहप्रभृति मी न होय असें म्हणणारा तोच मूर्ख, माझी प्राप्ति करून देणारा तोच पंथ म्हणजे सन्मार्ग. चित्त विक्षिप्त होणें, विषयांत गुंतणें हा उत्पथ कुमार्ग आणि सत्त्वगुणांचा उदय होणें, उत्कर्ष होणें, हा स्वर्ग होय ॥ ४२ ॥ तमोगुणाचा ( आळशीपणा वगैरेचा ) उत्कर्ष होणें, हाच नरक होय. गुरु = आचार्य म्हणजे वस्तुतः मीच खरा बंधु (हितकर्ता) होय. मोक्ष मिळणें ज्यांत संभवनीय तें मानवी शरीर हेंच गृह होय. गुणसंपन्न असतो तो श्रीमंत होय ॥ ४३ ॥ जो सदा असंतुष्ट, असमाधानी, रडतोंड्या, तोच दरिद्री. आणि इंद्रियें ज्याच्या आधीन नाहींत तोच कृपण = दीन होय. गुणांमध्यें ( पदार्थांच्या गुणधर्मांमध्यें व इंद्रियांमध्यें ) जो आसक्त नसतो, तोच खरा ईश्वर = प्रभु, आणि गुणांत मन आसक्त तो परतंत्र होय ॥ ४४ ॥ याप्रमाणें सख्या उद्धवा ! तुझ्या प्रश्नांचीं सर्वांचीं उत्तरें मीं तुला सांगितलीं आहेत. फार काय सांगावें ? गुणदोषांचें लक्षण म्हणजे गुण - दोष पाहणें ह्याचेंच नांव दोष होय; आणि गुणदोषातीत सर्व आत्मरूप आहे असें ज्ञान व आचरण असणें, हा गुण होय ! ॥ ४५ ॥

## एकोणिसावा अध्याय समाप्त

# अध्याय २० वा

उद्धव म्हणतो, कमलनयना वासुदेवा ! तूंच वेद प्रकट करून त्या तुझ्या वेदांत विधि ( अमुक कर्मे केलींच पाहिजेत अशा आज्ञा ) आणि निषेध म्हणजे अमुक कर्म निषिद्ध आहे असे प्रतिषेध सांगितले आहेस ना ? तात्पर्य, देवा ! कर्माचें. कर्तव्या-कर्तव्यांचे गुण ( चांगलेपणा ) व दोष ( वाईटपणा ) यांचें तूंच निरूपण केलेंस आणि मला मात्र गुणदोष बघणें हा दोष होय, असें सांगतोस हें काय ? ॥ १ ॥ प्रतिलोमामुळें म्हणजे श्रेष्ठवर्णीतील स्त्रीचा व निकृष्टवर्णी पुरुषाशीं विवाह होऊन संतति झाली अथवा अनुलोमामुळें म्हणजे श्रेष्ठ वर्णी पुरुषाचा कनिष्ठवर्णी स्त्रीशीं विवाह होऊन संतति झाली असतां वर्णा-श्रमांमध्यें भिन्न भेद उत्पन्न होतात, वर्णसंकर होतो. पुण्य क्षेत्रें, सुपीक प्रदेश, निष्पाप बालवय चांगलें; कामासक्त तारुण्य व कुत्सित वार्धक्य वाईट, इत्यादि प्रकारें चांगलें--वाईटपणा तुझाच वेद सांगतो ना ? स्वर्ग चांगला, नरक वाईट, हें तुझेंच तारतम्य ना ? ॥ २ ॥ विधिनिषेध सांगणारे तुझेच वेद विधिनिषेधांची दृष्टि ठेवल्याशिवाय समजणार कसे व ही दृष्टि ठेवलीच नाहीं, तर वेदांत सामंजस्य येणार कसें ? आणि त्यांचा विवेक करतां आला नाहीं तर मोक्षप्राप्ति कशी होणार ? ॥ ३ ॥ अदृष्ट अशी पुण्यात्मक अथवा पापात्मक असणारीं फलें, त्यांचीं साध्यें व साधनें हीं आम्हांस तर काय, पण प्रत्यक्ष पितरांस व देवांसही समजावून देण्यास एक तुझा गुणदोषद्रष्टा वेदच समर्थ साधन आहे. आणि गुणदोषज्ञान वर्ज्य करा असें म्हणतोस हें काय ? एवंच, ही गुणदोषदृष्टि तुझ्या वेदाची आहे, आमची नव्हे. कृष्णा ! गुणदोषज्ञानाची प्रतिष्ठापना करणारा वेदच आम्ही गुणदोषदृष्टि कशी नाहींशी करूं शकेल ? तेव्हां भेददृष्टि जी आहे ती भ्रमात्मकच आहे कीं काय हेंही मला समजेना. हा माझ्या मनांतील गोंधळ नाहींसा कर ॥ ४-५ ॥ श्रीभगवान् म्हणतात, उद्धवा ! जीवांचें कल्याणच करण्याच्या सदिच्छेनें मी ज्ञानयोग, कर्मयोग व भक्तियोग असे तीनच योग सांगितले आहेत. मोक्षाला अवश्य असणारी जी चित्तशुद्धि ती सिद्ध होण्याला चौथा कोणताही दुसरा उपाय नाहींच ॥ ६ ॥

कर्मांचा व तत्फलांचा वीट आल्यामुळें कर्म टाकून देणाऱ्या जीवासाठीं मी ज्ञान-योग सांगितला आहे. तसेंच, जे सकामवृत्तीचे जीव कर्मांतच आसक्त असतात, ज्यांना कर्में व कर्मफलें नकोशीं झालेलीं नसतात, त्यांच्यासाठीं कर्मयोग सांगितला आहे ॥ ७ ॥ परंतु ज्या पुरुषाच्या चित्तांत माझ्या इच्छेनें अथवा अन्य अज्ञातकारणानें माझ्या चरित्रा-त्मक कथांवर श्रद्धा उत्पन्न होऊन ती स्थिर होऊं लागली आहे, पण जे कर्माला पूर्णतः कंटाळले नाहींत किंवा कर्मामध्येंच फारसे आसक्त नसतात त्यांच्या कल्याणासाठीं सर्व मनःकामना पूर्ण करणारा भक्तियोग सांगितला आहे ॥ ८ ॥ उद्धवा ! जोंपर्यंत कर्मापासून

चित्त पराङ्मुख झालेलें नसतें, अथवा माझ्या कथांचें श्रवणमननच करावें अशी श्रद्धा उत्पन्न झालेली नसते, तोंपर्यंत त्या त्या पुरुषानें विहित कर्मांचें आचरण करणें हेंच इष्ट आहे ॥ ९ ॥

उद्धवा ! जो निष्काम पुरुष स्ववर्णाश्रमधर्मानें सांगितलेलीं कर्तव्यें करून यज्ञद्वारा माझें यजन करतो, तो जर विहित आचरणाचें उल्लंघन आणि अविहित आचरण करणारा नसेल, तर तो निष्काम असल्यामुळें स्वर्गालाही जात नाहीं; व अकर्म आणि विकर्म करणारा नसतो म्हणून नरकालाही जात नाहीं. विहित कर्माचरणानें त्या निष्कामाचें चित्त शुद्ध होतें ॥ १० ॥ जो स्ववर्णाश्रमाचीं स्वकर्तव्यें करतो, जो निष्पाप व शुद्धचित आहे तो या भूलोकींच राहतो. चित्तशुद्धि झाली असल्यामुळें त्याला तदिच्छेनुसार शुद्ध ज्ञान प्राप्त होतें किंवा माझ्या भक्तीचा तरी लाभ होतो ॥ ११ ॥ उद्धवा ! दुःखानें पोळलेले नरकवासी लोक व सुखोपभोगाला कंटाळलेले स्वर्गवासी लोक म्हणजे देव, हे सुद्धां भूलोकीं जन्म व्हावा, अशी इच्छा करीत असतात. कारण ज्ञानाची काय, भक्तीची काय, या भूलोकांत राहणाऱ्या मनुष्यांस मात्र सिद्धि होते. ज्ञान अथवा भक्ति (किंवा दोन्ही) यांचा इच्छेनुसार लाभ ह्याच भूलोकीं होतो हा लाभ स्वर्गस्थ दैवी शरीराला व नरकस्थ शरीराला होत नाहीं ॥ १२ ॥ असो; उद्धवा ! बुद्धिवंत पुरुषानें नरकलोकास साधक होतील अशीं कर्में व आशा हीं तर करूं नयेतच; पण स्वर्गाची सुद्धां इच्छा करूं नये. फार काय ? पण ज्ञानभक्तिसाधकानें मनुष्यलोक प्राप्त व्हावा अशी सुद्धां इच्छा करूं नये. कारण, मनुष्यदेह प्राप्त झाल्यास तो तो जीव सकाम कर्मांतच आसक्त होण्याचा फार संभव आहे ॥ १३ ॥ हें सर्व मानवी देहाचें कर्तृत्व ज्याला सकारण ठाऊक आहे, त्यानें मृत्यूची गांठ पडण्यापूर्वीच पुनः जन्म येणार नाहीं असा प्रयत्न ज्ञानद्वारा वा भक्तिद्वारा सावधपणें करावा. यद्यपि मानवदेहच मोक्ष मिळवून देण्याला समर्थ असला तरी तो देह मर्त्य आहे, केव्हां तरी त्याची सोबत तुटणार आहे हें त्यानें ध्यानांत ठेवावें ॥ १४ ॥ उदाहरण, ज्या झाडावर आपण आपलें घरटें बांधलें आहे, तें झाड यमतुल्य अरण्यवासी तोडीत आहेत, असें पाहतांच झाडावर आसक्ति न ठेवतां पक्षी आपलें घरटें सोडतो आणि निर्भय स्थानीं जाऊन राहतो ॥ १५ ॥ त्याचप्रमाणें निष्करुण असणाऱ्या दिवस-रात्रि आपल्या आयुष्याच्या दोऱ्या प्रतिक्षणीं तोडीत आहेत, हें लक्षांत घेऊन मृत्युभयानें सकंप होणाऱ्या पुरुषानें देहादिकांवरील आसक्ति सोडून परात्मतत्त्व समजून व पटवून घ्यावें. हें ज्ञान साध्य झालें म्हणजे जीव निर्भय होतो, निष्कर्मी होतो आणि भयकंपादि नष्ट होऊन तो शांत व स्वस्थ होतो ॥ १६ ॥

उद्धवा ! ही नरदेहनौका म्हणजे एक सर्वश्रेष्ठ, यदृच्छेनें प्राप्त झालेली, दीर्घ प्रयत्न केला तरी न मिळणारी, तारणाऱ्या सर्व अवजारांनीं सज्ज असलेली, सद्गुरुरूपी उत्तम नावाड्यानें वल्हविलेली आणि परमेश्वरानुग्रहरूपी अनुकूल वारा साहाय्य करीत असलेली उत्तमोत्तम

नौका होय. ही प्राप्त झाली असतांही जो पुरुष भवसागर तरून जाण्याची दृढ इच्छा करीत नाहीं तो खरोखर स्वयंघात करणारा आत्मवैरी होय ॥ १७ ॥ ज्या वेळीं कर्मांचा कंटाळा व वीट येतो व त्यामुळें कर्मवैराग्य उत्पन्न होतें. त्या वेळीं स्वकल्याणेच्छु पुरुषानें आत्मयोग सिद्ध होण्यासाठीं इंद्रियनिग्रह करावा आणि अभ्यास करकरून मनाला निश्चल करण्याचा प्रयत्न झटून करावा व तें निश्चल करावें ॥ १८ ॥ मनाची प्रयत्नानें धारणा करीत असतांही तें मर्कटी चांचल्य असणारें मन नेहमींच्या संवयीमुळें लवकरच भटकूं लागतें. तेव्हां निरलसपणें व सावधपणें त्या मनाला आवडणाऱ्या विषयावर स्थिर करावें व तेथें लक्ष ठेवावें. नंतर हळूहळू त्या मनाला जीवानें स्ववश करून आत्मपदीं स्थिर करण्याचा उद्योग निष्ठेनें करावा ॥ १९ ॥ हें वशीकरण चाललें असतां मनाला एकटेंच भटकूं देऊं नये. त्याजवर सारखी दृष्टि ठेवावी आणि आपण स्वतः प्राणवायूला व इंद्रियांना आपल्या स्वाधीन ठेवावें. नंतर आपली बुद्धि सत्त्वसंपन्न करून ( सत्त्वगुणांनीं सबल करून ) त्याला (मनाला) आत्मवश करावें ॥ २० ॥ मनाला स्वाधीन करून घेऊन त्याचा संग्रह करण्याचा हा मनोवशीकरण योग अति महत्त्वाचा आहे असें श्रुतिस्मृति म्हणतात. पहा कीं, एखाद्या चपळ वारूला स्ववश करणें असेल तर चतुर चाबुकस्वार त्या वारूच्या अंतःकरणाचा कल पाहून त्याच्या कलाप्रमाणेंच वागवितो, व याप्रमाणें त्या वारूचा विश्वास संपादून शेवटीं त्याला आत्मवश करतो व शर्यत जिंकतो. सारांश, वारूचें वशीकरण शर्यत जिंकण्याला उपकारक होतें म्हणून महत्त्वाचें, त्याप्रमाणेंच मनाचें वशीकरण मोक्षसंपादनाला उपकारक म्हणून महत्त्वाचें आहे ॥ २१ ॥

याप्रमाणें योगाभ्यासद्वारा मनाला कांहींसें वळविल्यावर त्याला सांख्यदर्शनाचें म्हणजे सदसद्विवेचक ज्ञानाचें खाद्य द्यावें. प्रकृतीशीं, मूळ कारणाशीं आरंभ करून देहापर्यंतच्या सर्व कार्यांचा कार्यकारणाच्या अन्वयानें जन्म कसा होतो आणि देहासारख्या अंतिम कार्यापासून आरंभ करून मूळ कारण जी प्रकृति तेथपर्यंत उलट मार्गानें–कार्यांतून कारणांत प्रवेश करणाऱ्या मार्गानें कर्मांचा लय कारणांत कसा होतो, हें पाहावें. कारणांत लय हा मृत्यु अथवा नाश होय. असो. हा कारणकार्य नुरून होणारा नाश व कारणकार्यानुसार होणारा जन्म या जन्ममरणरूपी भावांचें चिंतन करूं लागलें म्हणजे मन हळूहळू निवळूं लागतें, त्याची भटकण्याची आवड कमी होऊन कार्यकारणाच्या शृंखलेंत तें सांपडूं लागतें ॥ २२ ॥ असो. याप्रमाणें निर्विण्ण, विरक्त आणि गुरूपदेशानुसार ज्ञान झालेल्या पुरुषाच्या मनाला चिंतन केलेल्यानेंच पुनःपुनः चिंतन करण्याची आवड उत्पन्न होते. अर्थात् तें आपला दुष्ट स्वभाव, अभिमान, वासना-प्रभृति सर्व खोडी टाकतें ॥ २३ ॥ यमनियमांचें प्रणयन करणारा योगमार्ग, जड व अजडांचा विवेक करून त्यांची शुद्धि करणारी आन्वीक्षिकी विद्या किंवा माझी उपासना हीं त्रि साधनें घेऊन मन योग्याचें ( योग = संयम करून घेण्यास अत्यंत उचित असा जो परमात्मा त्याचें) स्मरण करतें. योग, आन्वीक्षिकी व उपासना या तीन साधनांनीं मात्र परमात्म्याचें अनुसंधान राखणें शक्य आहे ॥ २४ ॥

मार्गभ्रष्ट होऊन योगी ज्ञान्यानें निंद्य आचरण एखादे वेळीं केलेंच, तर त्या योग्याला प्रायश्चित्त देण्याला ज्ञान किंवा भक्ति हींच समर्थ असतात. तेथें तुमचीं कृच्छ्रादि प्रायश्चित्तें व्यर्थ होत ॥ २५ ॥ स्ववर्णाश्रमानुसार कर्तव्यें करण्याचा जो अधिकार तद्द्वारा आपलीं विहित कर्तव्यें करणें हा परम उपकारक गुण होय, असें आप्तवचन आहे. वस्तुतः कोणतेंही कर्म असो, तें स्वभावतः अशुद्धच आहे. तेव्हां जीवांनीं कर्मासक्तीचा त्याग करावा ही सदिच्छा धारण करूनच श्रुतिमाउलीनें गुणदोषांचीं विधानें केलीं आहेत, म्हणजे अनासक्त राहून ' अमुकच कर्म करा ' ' तमुक करूंच नका ' असे गुणदोष सांगून कर्माचा संकोच केला आहे. या संकोचरूपी स्वधर्माचरणानेंच पापांची निवृत्ति होत असते, म्हणून दुसऱ्या प्रायश्चित्तांची अपेक्षाच नाहीं. ( येथें ज्ञानयोग संपविला ) ॥ २६ ॥ माझ्या, सगुणस्वरूपी जो मी त्याच्या कथांवर श्रद्धा बसूं लागली म्हणजे भक्तिव्यतिरिक्त इतर कर्माविषयीं वैराग्य उत्पन्न होतें. तो भक्त इतर कर्में टाकतो; परंतु कामना तेथून सर्व दुःखात्मक असें ठाऊक असूनही त्याला त्या टाकण्याचें सामर्थ्य प्रथमतः असत नाहीं ॥ २७ ॥ म्हणून त्या भक्तानें श्रद्धापूर्वक, निश्चयपूर्वक आणि प्रेमपूर्वक माझें भजन करूं लागावें. आणि त्या त्या वासनांचा उपभोग घेत असतानाच, त्या सर्व निंद्य आहेत, त्याज्य आहेत, दुःखमूलक आहेत, अशी मनापासून निंदा करावी ॥ २८ ॥

उद्धवा ! मी तुला पूर्वी जो उत्तम भक्तियोग सांगितला आहे, त्या भक्तियोगमार्गानें माझें अखंड भजन करावें. हें भजन शास्त्रोक्त होऊन त्याला अखंडत्व भक्ताच्या ज्या मनानें दिलें, तेथें कामांचें, वासनांचें, विषयाभिलाषाचें वास्तव्यच अशक्य होतें. ते नष्ट होतात. कारण, त्या भक्ताच्या हृदयांत मी परमात्मा राहूं लागतो. आप्तकाम जो मी त्या माझें व कामांचें नेहमींचें हाडवैर आहे. जेथें मी तेथें काम नसावयाचाच ॥ २९ ॥

निखिल जीवांचा आत्मा जो मी त्या माझें ऐकांतिक भक्तियोगानें साक्षात् अपरोक्ष दर्शन झालें कीं हृदयाची ग्रंथि तुटते, सर्व संशय फिटतात. सर्व संचितें सुटतात ॥ ३० ॥ म्हणून माझी अनन्य भक्ति करणाऱ्या व माझें मात्र चिंतन करणाऱ्या मद्भक्तियोग्याला ज्ञानाचा किंवा वैराग्याचा उपयोग येथें होण्याचा फारसा संभवच नाहीं. अनन्य भक्तीनेंच तो कृतार्थ होतो ॥ ३१ ॥

सारांश, जें कर्मांनीं साध्य असतें. जें तपानें, ज्ञानानें, वैराग्यानें, योगानें, दानानें किंवा अन्य कल्याणावह उपायांनींच मिळणें शक्य असतें ॥ ३२ ॥ तें सर्वच्या सर्व माझा भक्त भक्तियोगद्वारा अनायासानें मिळवितो. फार काय, पण स्वर्ग मोक्ष अथवा प्रत्यक्ष वैकुंठ सुद्धां त्याला हवासा वाटला तर तो मिळतो ॥ ३३ ॥ अरे ! जे साधु निष्काम असतात, धैर्यधर असतात, माझे एकनिष्ठ भक्त असतात, त्यांना मुळींच कसलीही वांछाच नसते. मीं त्यांना कैवल्यरूप मोक्ष दिला, जन्ममरणशून्यता दिली, तरी त्यांना ती नकोच असते. ' नलगे मुक्ति, धन, संपदा । संतसंग ( तुझा संग ) देईं सदा ' हाच त्यांचा पुरुषार्थ होय ॥ ३४ ॥ ही त्यांची निष्फल निरपेक्षता ( कांहीं नको असणेंपणा ) हेंच परम श्रे

निःश्रेयस्, हेंच अति महत्त्वाचें फल आहे. म्हणून निरपेक्ष भक्ताची भक्ति हीच निरपेक्ष असणाऱ्या मला अत्यंत प्रिय आहे. ' इतर मज कांहीं, भक्तीविण प्रियतम नाहीं ' हाच दैवी सिद्धांत होय ॥ ३५ ॥ उद्धवा ! माझे जे अनन्य भक्त असून साधुवृत्तीचे, समत्वाची दृष्टि ठेवणारे व बुद्धीच्या पलीकडचा जो मी त्या माझ्याप्रत प्राप्त झालेले असतात, त्यांना विधिनिषेधांपासून ( विधि हा गुण व निषेध हा दोष ) उत्पन्न होणाऱ्या पुण्यपापांचा स्पर्शच नसतो. तुला ' गुणदोषदृष्टि असणें हा दोष व ती दृष्टि टाकणें हा गुण ' हें जें मीं सांगितलें, तें हेंच होय ॥ ३६ ॥ असो. मी आतांपर्यंत जो मार्ग दाखविला, तदनुसार एकनिष्ठेनें जे माझे भक्त वर्तन करतात, त्यांना अत्यंत निर्भय असें जें माझें स्थान वैकुंठ तें निःसंशय प्राप्त होतें. या वैकुंठालाच ' परब्रह्म ' असें म्हणतात ॥ ३७ ॥

**विसावा अध्याय समाप्त**



# अध्याय २१ वा

श्रीभगवान् म्हणाले, उद्धवा ! भक्ति, ज्ञान व कर्म हींच त्यांचीं स्वरूपें आहेत. असे जे मी प्रणीत केलेले उत्तम पंथ तुला सांगितले, ते सोडून देऊन आपल्या क्षणभंगुर आयुष्यांत जे लोक क्षुद्र आशांची सेवा करण्यांत निमग्न होतात, त्यांना जन्ममरणात्मक संसारांत पडावेंच लागतें. ॥ १ ॥ आपला जो वर्ण व जो आश्रम आहे, त्याला योग्य असणाऱ्या कर्तव्यांवर निष्ठा ठेवून मी सांगितल्याप्रमाणें व तदनुसार आचरण करणें हा गुण होय आणि त्याच्या उलट वागणें हा दोष होय. सारांश, वर्णाश्रमानुसार वागणें हा गुण आणि उलट वागणें हा दोष, असें गुणदोषांचें निश्चित लक्षण आहे ॥ २ ॥ एकच पदार्थ किंवा एकच आचरण असलें तरी तें योग्य किंवा अयोग्य असा संशय उत्पन्न होतो, त्याचें निराकरण, शुद्धीचे म्हणजे योग्यत्वाचे व अशुद्धीचे म्हणजे अयोग्यत्वाचे नियम ( हे मीं म्हणजे श्रुतीनें सांगितले असतात ) करतात, त्या नियमाप्रमाणें वागणें हा गुणाच्या स्वीकाराचा परिणाम मंगलदायक होतो व दोषाचा परिणाम अशुभ ( घातक ) होतो ॥ ३ ॥ हे शुद्ध मनाच्या उद्धवा ! धर्म , ऐहिक व्यवहार व यात्रा यांसाठींच धर्माप्रमाणें चालणाऱ्या लोकांस हा धर्माचार व व्यवहाराचार मीं सांगितला ॥ ४ ॥

पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश या पांच महाभूतांच्या सूक्ष्म तन्मात्रांनींच ब्रह्मदेवापासून वृक्षपाषाणादि स्थावरापर्यंत सर्व चराचर–शरीरें घडविलीं आहेत. या शरिरांतच आत्मा जीवरूपानें राहतो ॥२ ॥ शरीरें पांच भौतिक आणि जीव परब्रह्म असे सर्व प्राणी समसमान आहेत, तरी त्या त्या प्रत्येकाच्या कल्याणकारी पुरुषार्थसिद्धीसाठीं दयाळु वेदानें जीवांच्या आत्मिक योग्यतेनुसार भिन्न वर्ण व भिन्न आश्रम यांची विषमता उत्पन्न केली आहे ॥३ ॥

हे श्रेष्ठ भक्ता, वैषम्याप्रमाणेंच देश, काल व वस्तु यांच्या संबंधानेंहीं जे विषमता-रूप गुणदोष सांगितले आहेत, तेही कर्माचें नियमम करण्यासाठींच मीं ठरविले ॥ ७ ॥ देशांपैकीं अकृष्णसार म्हणजे काळ्या पाठीचीं हरिणें ज्यांत असत नाहींत असा देश अब्रह्मण्य म्हणजे वेदोक्त कर्माला अयोग्य म्हणून अशुचि असतो, आणि कृष्णसार देशांत सुद्धां, कीकटप्रभृति प्रांत संस्कारशून्य व जमीन नापीक म्हणून कर्माला अयोग्य होत ॥८॥ तसेंच कालासंबंधानें होय. पर्वकाल असेल अथवा कर्मसामग्री सिद्ध असेल तेव्हां विहित कर्म करणें योग्य होतें, म्हणून तो काळ गुणवंत होय; पण जेव्हां सामग्रीच नसते, अवर्षण वा अतिवृष्टि झालेली असते असा काल, तसेंच सुएरसुतक असतें तो काल दोषवंत होय ॥ ९ ॥

त्याचप्रमाणें कोणत्याही वस्तूची शुद्धि–योग्यता व अशुद्धि–अयोग्यता ही जलादि प्रोक्षक द्रव्यांनीं, वेदवचनानें, संस्कारांनीं, काळानें आणि त्या वस्तूच्या लहान-मोठेपणावरून ठरवितां येते ॥१०॥

त्याचप्रमाणें द्रव्याची शुद्धि जीवाच्या सामर्थ्यासामर्थ्यावर; बुद्धीवर, संपन्नतेवरच ठरविणें प्राप्त होतें. तसेंच, सामान्यतः ज्याला ' अशुद्ध ' म्हणतात, तें आत्मविरुद्ध पातकही द्रव्याच्या व जीवाच्या अवस्थांचा मगदूर पाहून ठरवितात ॥ ११ ॥ आणि द्रव्यशुद्धि–धान्य, ,काष्ठें काष्ठपात्रें, अस्थी, तंतु, घृतादिरस, सुवर्णादि धातु, मृगासनादिकांचें चर्म व विटा वगैरे पार्थिव वस्तु यांची शुद्धि–काळ, वायु, अग्नि, पवित्र जल हीं प्रत्येकीं स्वतः अथवा इतरांशीं सहकार्य करून करतात ॥ १२ ॥ तसेंच; जें पीठ, पात्र या वस्त्र अशुद्ध झालें असेल तें विशेष द्रव्यांकरवीं ( उदाहरणार्थ तासणें, क्षार लावणें वगैरेनें) शुद्ध करतां येईल व पीठादिकांस पूर्वस्वरूप येईल, असें शुद्धिकरण इष्टच आहे ॥ १३ ॥ स्नान, दान, तप, अवस्थाविशेष, सामर्थ्य, संस्कार यांच्या व ईश्वरस्मरणाच्या साहाय्यानें आत्मशुद्धि झाल्यानंतर द्विजानें विहित कर्म करावें ॥ १४ ॥ मंत्राची शुद्धि गुरूकडून कर्माची शुद्धि ईश्वरार्पण करून करावी. याप्रमाणें शुद्ध देश, शुद्ध काल, शुद्ध द्रव्य, शुद्ध मंत्र, शुद्ध कर्ता व शुद्ध कर्म या सहा साधनांनीं धर्माचरण होतें. याच्या उलट तो अधर्म ॥१५॥

केव्हां केव्हां दैवबलानें गुणाला दोषस्वरूप आणि दोषालाच गुणस्वरूप येतें ! याप्रमाणें गुणदोषांचें नियामक जें शास्त्र तेंच त्यांच्यामधील भेदांचा मात्र बाध करतें ॥१६॥ एकच आचरण दोन पुरुषांनीं केलें असें समज; जर तें सुरापानासारखें वाईट असेल, तर जो पतित मद्यपि असेल त्याला मात्र त्या आचरणापासून जास्त पातक लागत नाहीं. त्याप्रमाणें स्त्रीसंग यतीला घातुक; पण गृहस्थाला कर्तव्यात्मकच होतो ॥ १७ ॥ विषयनिवृत्ति जसजशी वाढते, तसतसा जीव मोक्षाजवळ जातो. विषयांपासून पराङ्मुख होणें हाच निर्भय करणारा आणि शोक, मोह आणि भय यांचा नाश करणारा धर्म होय. ॥ १८ ॥ विषयांवर गुणांचा अध्यास केला कीं विषयासक्ति उत्पन्न होते. आसक्तीपासून काम ( अभिलाष ) आणि अभिलाषानेंच पुरुषापुरुषांत भांडणें उत्पन्न होतात ॥ १९ ॥ भांडणांमुळे क्रोधाचा जन्म ! क्रोधाचा पुत्र मोह क्रोधाबरोबर असतो आणि ज्याची बुद्धि मोहग्रस्त होते, त्याला कार्य काय आणि अकार्य काय याची विस्मृति होते ॥ २० ॥ स्मृतिनाश म्हणजेच जीवाची शून्यावस्था होय. स्मृतिशून्यता म्हणजे मरणाची धाकटी बहीण मूर्च्छा. अर्थात् असल्या मोहग्रस्त पुरुषाच्या पुरुषार्थाची हानि होते. विषयध्यान, विषयासक्ति, विषयकामना, कलह, क्रोध, मोह, स्मृतिनाश, मूर्च्छा आणि पुरुषार्थहानि ही परंपरा विसरूं नये ॥ २१ ॥

एकदां जीव विषयासक्त झाला म्हणजे त्याला आपलें हिताहित समजेनासें होतें. आत्मा व अनात्मा, जीव व ईश यांची जाणीव नष्ट होते. वृक्षासारखा बुद्धिहीन होऊन तो

पुरुष व्यर्थ जगतो. त्याचें जगणें म्हणजे लोहाराच्या भात्याप्रमाणें नुसतें श्वसन, श्वास आंत बाहेर जाणें इतक्याच किंमतीचें असतें ॥ २२ ॥ रोग्यानें औषध घ्यावें म्हणून औषधाबरोबर वैद्य कांहीं मध, साखर वगैरे रोचक देतो, त्याप्रमाणें मोक्षमात्र उद्दिष्ट ठेवणारी श्रुति 'विहित केलें असतां स्वर्गादि फलें मिळतात' अशी रोचक फलश्रुति सांगते. स्वर्ग जीवांचें प्राधान्य नव्हे. केवळ जीवांस विहित कर्मांची आवड उत्पन्न व्हावी म्हणून स्वर्गादिसुखाचें आमिष श्रुति सांगते ॥ २३ ॥ कारण जन्मतःच जीवांस विषयांची, प्राणांची, पुत्रदारादिकांची लालसा उत्पन्न झालेली असते. ही लालसा आत्मघात करणारी आहे हें खरें; तथापि ती दृढ असते. ही कमी कमी होत शेवटीं समूळ नष्ट व्हावी म्हणून श्रुति स्वर्गसुखाची आशा दाखवून जीवांकडून विहित कर्म करविते. तिची इच्छा ही कीं, कर्तव्याच्या मार्गें जीवानें मोक्षास जावें ॥ २४ ॥ विषयवश झाल्यामुळें आपला पुरुषार्थ कोणता हेंच त्यांस समजत नाहीं, जे कामाच्याच वाटेनें भ्रमण करतात, त्यांची जर वेदवाक्यांवर निष्ठा बसली, तर हा आपला सर्वज्ञ व सर्वकल्याणकारी वेद त्या आपल्या भक्तांस स्वर्गादि सुखांचें आमिष दाखवितो, तें रुच्युत्पादक आहे, इतकेंच समजावें. वेदाचें ध्येय मोक्ष आहे. तेव्हां हाच वेद स्वभक्तांस वृक्षादि योनींत घालविणारें कर्म करण्यात सांगेल, हें संभवनीय नाहींच नाहीं ॥ २५ ॥

वेदाचें मनोगत माहीत नसतें म्हणून कित्येक दुर्बुद्ध लोक फलश्रुति सांगणाऱ्या वेदाचीं फलद मनोहर वेदवाक्यें मात्र मान्य करतात. अर्थात् व्यासादि श्रेष्ठ मुनींस मान्य झालेलें वेदाचें मनोगत त्यांस समजत नाहीं. आंब्याच्या फळाची वाट न पाहतां ते आंब्याचा मोहरच खुडतात आणि मुख्य व नित्य सुख देणाऱ्या आम्रफलाचा नाश करतात ॥५३॥

हे विषयासक्त वैदिक कामुक, मंदमति म्हणून कंजूष, फुलांसच फळ मानणारे, यज्ञयागांत उत्पन्न होणाऱ्या धुरावरच प्रसन्न होणारे, धूममार्गानें जाऊन पितृलोकांत पडणारे असतात, म्हणून त्यांस 'स्वलोक'=सत्यलोक—परमात्मलोक=आत्मलोक ठाऊकच असत नाहीं ॥२७ ॥ उद्धवा ! त्यांच्या अतिसंनिध असणारा ' त्यांच्या हृदयांतच राहणारा जो मी त्या माझी त्यांस ओळख नसते. हें दृश्य विश्व मीच परमेश्वर आहें, हे म्यांच उत्पन्न केलें आहें, याची वार्ताही त्यांस नसते. कर्म हेंच स्वर्ग देणारें त्यांचें शस्त्र किंवा मंत्रस्थान ! प्राणसंतोष हाच त्यांचा पुरुषार्थ ! खरेंच आहे. ज्यांचे डोळे म्हणजे बुद्धि स्वर्गसुखात्मक धूमानें अंध झाली, त्यांस त्या धुरापलीकडे काय आहे, हें कसें समजावें ? ॥५८॥ त्या या विषयलोलुप लोकांस वेदामध्यें अप्रत्यक्ष रीतीनें सांगितलेला ईश्वराचा अभिप्राय समजतच नाहीं. ज्या पुरुषाला हिंसेची आवड जन्मतःच असेल त्यानें यज्ञामध्यें मात्र पशुवध करावा, ही जी मी वेदद्वारा केवळ हिंसानियामक परवानगी दिली, तिलाच कुबुद्धि लोक 'हिंसा करावी, अशी वेदाज्ञा आहे, म्हणतात ! ॥ २९ ॥ अशा अज्ञानामुळें स्वसुखासाठीं मात्र हे हिंसाप्रिय लोक यज्ञ करतात आणि पशुहिंसा

करून फिर, उग्रदेवता यांस बली देतात; पण त्यांचे हे यज्ञ वस्तुतः मांसाशनासाठींच असतात ॥ ३० ॥

उद्धवा ! श्रवणमनोहर असा जो स्वर्गलोक तो केवळ स्वप्नांतील सृष्टीप्रमाणें अवास्तव असतांही त्याचीच प्राप्ति व्हावी असा संकल्प करून हे अज्ञ लोक प्राप्त झालेले विषयही टाकून देतात. पुढें भाव येईल या आशेवर सट्टे करणारा मूर्ख वैश्य जसा गांठचा पैसाही घालवितो, तसाच या विषयासक्तांचा कर्मव्यवहार असतो ॥ ३१ ॥ रजोगुणादि मायाविकारांची सेवा करणारे हे लोक त्या गुणत्रयांवर निष्ठा ठेवून त्रिगुणात्मक इंद्रादि देवतांची उपासना करतात; पण निर्गुण जो मी त्या माझी आराधना निष्काम एकनिष्ठ भक्तीनें ( त्याच इंद्रनिष्ठ भक्तीनें ) करीत नाहींत ॥ ३२ ॥ ' आम्ही यज्ञद्वारा इंद्रादि देवतांस प्रसन्न करूं, स्वर्गांत जाऊन उत्तमोत्तम भोग भोगूं, नंतर पुनः भूलोकीं येऊन कुलीन व श्रीमंत होऊं , अशा रीतीच्या यांच्या वेदोक्त वल्गना असतात ॥ ३३ ॥ अशा परोक्षवादी वेदाच्या आलंकारिक वाणीनें ज्यांचीं मनें भ्रष्ट होऊन विक्षिप्त झालीं, जे मोठे मानी म्हणजे परोपदेश न घेणारे व हट्टी म्हणजे सुदुपदेश न स्वीकारणारे असतात, त्या विक्षिप्त, मानी व हट्टी लोकांस माझ्या—परमेश्वराच्या वार्ता सुद्धां सहन होत नाहींत, मग उपासना तर लांबच ! ॥ ३४ ॥ उद्धवा ! कर्म, भक्ति आणि ज्ञान हेच ज्यांचे विषय आहेत, ते वेद केवळ ब्रह्मात्मपर, ' ब्रह्म व आत्मा एकच होत ' असें सांगणारे आहेत. वेदमंत्रांचे द्रष्टे म्हणजे ऋषि परोक्ष म्हणजे अप्रत्यक्ष रीतीनें उपदेश करणारे आहेत. कारण परोक्षपद्धतीच मला प्रिय आहे ॥ ३५ ॥

शब्दब्रह्म म्हणजे सर्व वेदांची राशि. तो यथार्थ समजण्यास अति कठीण आहे. प्राण, इंद्रियें व मन यांचें तो अधिष्ठान आहे. तो अनंत, अपार व गूढ असून तरून जाण्यास महासमुद्रासारखा अत्यंत दुःसाध्य आहे ॥ ३६ ॥ अनंत व अचिंत्यशक्ति असा जो मी सर्वव्यापक निर्विकार अंतर्यामी परमात्मा, त्या मींच ही स्फुरद्रूप वाणी प्रकट केली आहे. उद्धवा ! कमलाच्या देठामध्यें जसे मऊ मऊ लोकरीवजा तंतू असतात, त्याप्रमाणें प्रत्येक भूताच्या अंतर्यामीं राहून जो अखंड अनाहत ध्वनि घुमत असतो, त्यावरूनच ही वेदवाणी आत्याला लक्षित होत असते ॥ ३७ ॥ ज्याप्रमाणें ऊर्णनाभि आपल्या हृदयांत असणारे ऊर्णातंतू आपल्या मुखांतून बाहेर काढतो, त्याचप्रमाणें नित्य घोष करणारा माझा अंश जो हिरण्यगर्भ प्रभु तो, शब्दच गुण आहे ज्या ॐस्वरूपी आकाशाचा; त्या आकाशातील अस्पष्ट वर्णांस मनोमार्गानें स्पर्शरूपी वर्णांचें ( क पासून म पर्यंतचें २५ वर्णांचें ) स्वरूप देऊन त्यांस प्रकट करतो. वेदवाणी ती हीच ॥ ३८ ॥ ही छंदोमय वेदवाणी ( छंद हेच ज्याची मूर्ति असा जो वेद ती ) अमृतमयच आहे. ती मोक्षस्वरूप असून मोक्ष देणारी आहे. हिला प्रभूनें सहस्रपदवी म्हणजे अनंतमार्गी, अनेक मार्गांनीं मोक्षदात्री स्वरूपानें प्रगट केली आहे. मूळ ॐकार त्यापासूनच उर व कंठ यांच्या संगतीनें ' क ' कारादि २५ स्पर्श, १६ स्वर, ' श, ष, स, ह ' हे ४ ऊष्म आणि ' य, र, ल, व ' हे ४ अंतस्थ वर्ण, उत्पन्न होऊन ॐ

विस्तार झाला. हीच ती वेदवाणी ॥ ३९ ॥ अनेक भाषांमध्यें हिचा विस्तार झाला आहे. या वाणींत अनेक छंद आहेत. पहिल्या गायत्री छंदाहून दुसऱ्या उष्णिक छंदांत चार अक्षरें अधिक याप्रमाणें उत्तरोत्तर अधिक अक्षरें असणारे छंद झाले. असो. ही वाणी-अनंत आहे, अपार आहे, सर्वव्यापी आहे. सृष्टीच्या उत्पत्तिप्रसंगीं ही वाणी प्रकट होते व सृष्टिसंहार झाला कीं लीन होते ॥ ४० ॥

वेदांत गायत्री, उष्णिक्, अनुष्टुप्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप जगती, अत्यष्टि, अतिजगती, विराट् असे अनेक छंद आहेत ॥ ४१ ॥ वेद काय विहित करतात, कसलें स्वरूप प्रकट करतात, काय सांगून त्याचाच विकल्प करतात हें अनुक्रमें कर्मकांड, भक्तिकांड व ज्ञानकांड यांत सांगितलें आहे; परंतु वेदवाणी परोक्ष असल्यामुळें वेदाचें मनोगत परमार्थतः काय आहे व असलें पाहिजे, हें उद्धवा ! माझ्यावांचून इतराला मुळींच कळत नाहीं ॥ ४२ ॥ उद्धवा ! वेद काय सांगतो, हें समजून घेण्याची तुझी प्रबल इच्छा आहे, म्हणून तुला सांगतों कीं, परमेश्वर यज्ञरूप आहे असें समजून कर्मकांडातील विधि निष्कामतः पाळावे; यज्ञांत सांगितलेल्या देवता मीच आहे असें समजून उपासनाकांडांत विहित केलेली उपासना निष्कामतः करावी आणि आकाशादि पांचभौतिक सृष्टि सांगून पुनः तिचा निरास करणारें जें आत्मस्वरूपी ज्ञानकांड तें अधिकारचतुष्टयसंपन्न पुरुषानें श्रवणमननादिकांनीं आपलेंसें करावें. हा सर्व वेदार्थ मत्परच आहे. माझें अधिष्ठान करून वेदश्रुति मजपासून भिन्नसा आभास होणाऱ्या मायेचा समजुतीसाठीं अनुवाद करून तिचा निरास करते आणि मग प्रसन्न होते, शांत होते. हाच वेदाचा खरा अर्थ होय. ब्रह्म व आत्मा एक आहे, हेंच सर्व वेदांचें सार आहे ॥ ४३ ॥

**एकविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २२ वा

उद्धव म्हणाला–विश्वापते प्रभुराया ! या सृष्टीची घटना करणारीं मूळ द्रव्यें, तत्त्वें ऋषींनीं किती सांगितलीं ? तीं किती आहेत ? त्वां अठ्ठावीस तत्त्वें आहेत असें प्रतिपादन केलें आहे, असें ऐकतों ॥ १ ॥ परंतु कोणी ऋषि २६, कोणी २५, कोणी ७, कोणी ९, कोणी ६, कोणी ४, कोणी, ११, कोणी १७, कोणी १६ व कोणी १३ तत्त्वें आहेत असें सांगतात. म्हणून जो हेतु ध्यानांत ठेवून निरनिराळ्या ऋषींनीं निरनिराळी तत्त्वसंख्या सांगितली, तो हेतु, तें रहस्य कृपा करून आम्हांला सांग. प्रभो ! तूं कालातीत –नित्य चिरंजीव आहेस ॥ २-३ ॥

श्रीभगवान् म्हणाले, ज्ञानी ( ब्राह्मण ) पंडित जें कांहीं सांगतात त्याला तसे आधार आहेतच. उद्धवा ! माझी माया गृहीत केली म्हणजे वाटेल तें बोललेलें असो, तें युक्तीनें सिद्ध करतां येतें. मायेच्या राज्यांत कांहीं अशक्य नाहीं. कोणतेंही भाषण अयोग्य नसतें ॥ ४ ॥

'तूं म्हणतोस तें खोटें व मी म्हणतों तेंच खरें' असें प्रत्येक वादी म्हणतो म्हणून वाद होतो. अंतःकरणांत उद्भवणाऱ्या परमेश्वराच्या ज्या सत्त्वादि शक्ति प्रचंड बलवती असतात, त्याच हट्टानें स्वमत स्थापन करण्याचा हेतु होता ॥ ५ ॥ अर्थात् या शक्ति प्रक्षुब्ध झाल्यामुळें उत्पन्न होणारा भेद, त्या शक्तींचें शमन व दमन झालें म्हणजे नष्ट होतो आणि नंतर लागलीच तज्जन्य वादही थांबतो ॥ ६ ॥

हे नरपुंगवा उद्धवा ! हीं सर्व कार्यकारणात्मक तत्त्वें एकमेकांत प्रविष्ट होत असल्यामुळें, बोलणाराच्या इच्छेनुसार कार्यत्व अथवा कारणत्व ठरवितां येतें ॥ ७ ॥ सकारणरूपी अथवा कार्यरूपी एकाच तत्त्वामध्यें इतर कार्यरूप अथवा कारणरूप तत्त्वें सर्वदा व सर्वत्र प्रविष्ट झालेलीं दिसतात. म्हणजे कारणतत्त्वांत कार्यतत्त्व आणि कार्य-तत्त्वांत कारणतत्त्व प्रविष्ट होतें ॥ ८ ॥ म्हणून वक्ता आपल्या बोलण्याच्या उद्देशानुसार वस्तूचें कार्यत्व अथवा कारणत्व ठरवितो आणि तें सयुक्तिक असतें म्हणून आम्ही त्याचा स्वीकारही करतों ॥ ९ ॥

जिचें कारण व स्वरूप सांगता येत नाहीं, अशी अविद्या जीवाच्या ठिकाणीं असते म्हणून त्याला स्वतःच आत्मज्ञान होत नाहीं. दुसरा कोणी तरी ज्ञानविज्ञानी गुरु त्याला ज्ञान देतों. म्हणून प्रकृतीसह प्रकृतिजन्य २४ तत्त्वें, १ जीव व १ गुरु अथवा परमेश्वर मिळून २६ तत्त्वें होतात ॥ १० ॥

परंतु या ठिकाणीं जीव आणि शिव यांच्या स्वरूपांत रेसभर सुद्धां फरक नाहीं; म्हणून जीव व शिव निराळे ही कल्पना अर्थशून्य होते. तेव्हां जीवशिव एक झाले,

म्हणून २५ तत्त्वेंच होतात. शिवाय ज्ञान हा प्रकृतीचा गुण आहे, आत्म्याचा नव्हे, हेंही म्हणणें योग्य अर्थात् सयुक्तिक आहे ॥ ११ ॥ प्रकृति म्हणजे गुणसाम्य. सृष्टि, स्थिति, लय करणारे सत्त्व, रज, तम हे गुण प्रकृतीचे होत; आत्म्याचे मुळींच नव्हेत ॥ १२ ॥

सत्त्व म्हणजे ज्ञान, रजः म्हणजे कर्म आणि तमः म्हणजे अज्ञान, असा तिन्ही प्रकृतिगुणांचा अर्थ आहे. हे गुण कालरूपी ईश्वराच्या प्रेरणेनें क्षुब्ध होतात. प्रकृतीचा व्यक्त स्वभाव (स्वरूप) म्हणजे सूत्र, महत्तत्त्व होय. पुरुष, प्रकृति, महत्तत्त्व, अंहकार आणि आकाशादि पंचमहाभूतें मिळून नऊ तत्त्वें होतात. कर्णनेत्रादि पांच ज्ञानेंद्रियें आणि हस्तपादादि पांच कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रिय व कर्मेंद्रिय असणारें मन मिळून अकरा तत्त्वें होतात. शब्दादि पांच विषय हीं तत्त्वें होत. गमनादि पांच हीं कर्मफळें म्हणून निराळीं तत्त्वें नव्हेत ॥ १३–१६ ॥ कार्यरूपी व कारणरूपी प्रकृति विश्वोत्पत्तीच्या आधीं, आपल्या सत्त्व, रज व तम या विकारोत्पादक गुणांनीं उत्पत्तीला योग्य असें स्वरूप धारण करते, म्हणजे विश्वाचें ती उपादान कारण होते. पुरुष ईक्षण करणारा म्हणून निमित्तकारण होतो ॥ १७ ॥ पुरुषाच्या ईक्षणानें शक्तिवंत झालेले प्रक्षुब्ध महत्तत्वादि धातु एकत्र होऊन प्रकृतीच्या आश्रयानें एक ब्रह्मांड उत्पन्न करतात ॥ १८ ॥

सातच तत्त्वें प्रतिपादणारे तत्त्वज्ञ फक्त ५ महाभूतें, जीव आणि सर्वाधार आत्मा मिळून सात तत्त्वें मानतात आणि त्यांपासून शरीर, इंद्रियें व प्राण हीं उत्पन्न झालीं असें म्हणतात ॥ १९ ॥ सहा तत्त्वें मानणारे फक्त ५ महाभूतें व परमपुरुष–ईश्वर–अशीं ६ तत्त्वें मानतात आणि आपणच निर्माण केलेल्या भूतांस उपादानें करून ईश्वर हें विश्व उत्पादितो व त्यांत प्रविष्ट होतो, असें म्हणतात. चारच तत्त्वें मानणारे – तेज, जल व पृथ्वी अशीं आत्म्यापासून उत्पन्न झालेलीं तीन तत्त्वें व आत्मा मिळून चार तत्त्वें होत, असें म्हणतात; आणि चार तत्त्वांपासून हें विश्व म्हणजे हीं अवयव असणारीं कार्यें झालीं, असें त्यांचें मत आहे ॥ २०,२१ ॥ सतरा तत्त्वें मूळ असें म्हणणारे ५ महाभूतें, ५ तन्मात्रा व ५ इंद्रियें या १५ तत्त्वांचा आणि मन – जीव – व आत्मा मिळून दोन तत्त्वांचा संग्रह करतात ॥ २२ ॥ तत्त्वसंख्या सोळा आहे असें म्हणणारे विद्वान् – आत्म्यांतच मनाची – जीवाची परिगणना करून भूतादि १५ तत्त्वें घेतात आणि तत्त्वें १६ असें म्हणतात. तेराच तत्त्वें मानणारे ५ भूतें, ५ इंद्रियें, १ मन, १ जीव व १ आत्मा यांस १३ संख्येंत संगृहीत करतात ॥ २३ ॥

५ महाभूतें, ५ इंद्रियें व १ आत्मा मिळून ११ तत्त्वें मानणारे व आठ प्रकृति व नववा आत्मा मानणारेही कांहीं आहेत ॥ २४ ॥ याप्रमाणें अनेक विद्वान् ऋषींनीं अनेक प्रकारें मूळ तत्त्वांची भिन्नभिन्न संख्या सांगितली आहे. प्रत्येक मत सप्रमाण म्हणून न्याय्य आहे. खरेंच आहे, कोणता विद्वान् अप्रमाण मताची स्थापना करील ? तात्पर्य, सर्वच मतें विवक्षानुरूप नीटच होत ॥ २५ ॥

उद्धव प्रार्थनापूर्वक म्हणाला — कृष्णा ! आपआपल्या भिन्नभिन्न स्वरूपांनीं जरी पुरुष आणि प्रकृति विलक्षण असतात, तरी तीं उभयतां एकमेकांच्या आश्रयानें राहात असल्यामुळें त्यांच्यामध्यें भेद आहे असें दिसत नाहीं ॥ २६ ॥ प्रकृतीच्या आश्रयानें आत्मा राहतो आणि आत्म्याच्या आश्रयाला प्रकृति येते, असा अनुभव येत असल्यामुळें, हे कमलाक्षा ! माझ्या मनांत जो मोठा संशय उत्पन्न झाला आहे, तो संशय, हे सर्वज्ञ कृष्णा, युक्तिकुशल प्रवचनानें छिन्नविच्छिन्न करण्याला तूंच योग्य आहेस ॥ २७ ॥ जीवांस ज्ञान देणारा तूं, त्यांचें ज्ञान विनष्ट करण्याची शक्ति तुझीच होय. तुझ्या मायेचे विलास तूंच जाणतोस, इतरांस ते समजणें शक्यच नाहीं ॥ २८ ॥

श्रीकृष्ण म्हणाले, नरश्रेष्ठ उद्धवा ! पुरुषाचें स्वरूप आणि प्रकृतीचें स्वरूप यांत अत्यंत मोठा भेद आहे. प्रकृतीचे गुण मात्र संक्षुब्ध झाल्यामुळें ही सर्व सृष्टि विकासपूर्ण होऊन राहिली आहे ॥ २९ ॥ उद्धवा ! माझी माया गुणमयी आहे. तीच आपल्या गुणांनीं भेद उत्पन्न करते व जीवांच्या अंतःकरणांत अनेक प्रकारच्या भेदबुद्धि उत्पादिते. सृष्टीमध्यें तीन प्रकारचे विकार असतात. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक असे ते तीन विकार होत ॥ ३० ॥ नेत्रेंद्रिय, त्याला दिसणारें रूप आणि नेत्रगोलकांत राहणारा सूर्यांश ही त्रयी व तिची सिद्धि परस्परांवर अवलंबून असणार; पण आकाशांतील सूर्य जसा स्वयंसिद्ध असतो, त्याप्रमाणें वरील त्रयीचा सर्वकारण जो आत्मा तो यांच्यापासून भिन्न असून स्वयंसिद्ध आणि सर्वसाधक आहे. वरील नेत्रत्रयीप्रमाणेंच इतर इंद्रियांच्या व मनाच्या त्रयी आहेत. त्याचा अधिष्ठाता आत्मा होय ॥ ३१ ॥ गुणांमध्यें क्षोभ झाला म्हणजे प्रधानाच्या महत्तत्त्वापासून होणारा जो हा विकार, तो अहं — अहंकार — होय. तो सत्त्वादि तीन प्रकारचा आणि मोह व भेद या बुद्धींचा हेतु आहे ॥ ३२ ॥ परंतु आत्मा हा पूर्ण ज्ञानस्वरूप आहे. भेदाच्या बुद्धीमुळें मात्र 'तो आहे कीं नाहीं' याची आम्हांला पडलेली भ्रांति सार्थ होते. वस्तुतः ती व्यर्थच होय. तथापि स्वस्वरूपासून च्युत झालेल्या लोकांच्या बुद्धींतून हा वाद नाहींसा होणार नाहीं ॥ ३३ ॥

उद्धव म्हणाला — प्रभो ! तुला पराङ्मुख झालेले जीव आपआपल्या कर्मानुसार उत्तमाधम योनींत जन्ममरण पावतात हें कसें तें मला सांग. आत्मज्ञान नाहीं, त्या लोकांस हा जन्ममरणप्रश्न उकलणें अत्यंत कठिण आहे आणि या लोकीं प्रायशः सर्व लोक मायेनें फसले गेले आहेत ॥ ३४ ॥ ३५ ॥

श्रीभगवान् म्हणाले, विषयग्राहक पंचेंद्रियांसहित म्हणजे १० इंद्रियें व ५ प्राण यांसहित असणारा कर्मप्रधान — कर्मरूप मन — एक लोक ( देह ) होय. हा देह सोडून दुसऱ्या देहांत तें मन जातें आणि चमत्कार हा कीं, मनोविलक्षण आत्मा अहंकारयुक्त होतो व तो मनामागून दुसऱ्या देहांत जातो ! ॥ ३६ ॥ कर्ममय झालेलें मन, इंद्रियगम्य विषय प्रत्यक्ष पाहून आणि अतींद्रिय विषय श्रुतिद्वारा ऐकून सर्व विषयांचें चिंतन करतें. नंतर ते ते दृष्टश्रुत विषय विद्यमान असतां मन जागें असतें, आणि ते विषय नसले म्हणजे

मन क्षीणबल होतें. त्यामागून लवकरच स्मृतिही नष्ट होते ॥ ३७ ॥ विद्यमान विषयाच्या ( देहाच्या ) उत्कट अभिनिवेशानें व इतर कित्येक कारणांमुळें पूर्वदेहाचें स्मरण होत नाहीं, तीच अत्यंत विस्मृति म्हणजे जिवाचा मृत्यु होय; आणि सर्वथा आपलेंच स्वरूप म्हणून वर्तमान विषयाचा ( देहाचा ) स्वीकार करणें हा जीवाचा जन्म होय असें म्हणतात. स्वप्नें व मनोराज्यें हीं उदाहरणें या श्लोकद्वयांतील जन्ममृत्यूचें विधान स्पष्ट करतात ॥ ३८ ॥ ३९ ॥ नवीन स्वप्न किंवा नवीन मनोराज्य चाललेलें असलें म्हणजे पूर्वीचे स्वप्नमनोरथविषय मुळींच स्मरणबाह्य होतात. याप्रमाणें मनाच्या स्मरणविस्मरणांचा भावार्थ, अनादि जीव असा समजतो कीं, आपल्यास जन्ममरणें येतात. तात्पर्य, जीव अनादि, अजर अमर आहे ॥ ४० ॥ इंद्रियांस आश्रय देणाऱ्या मनोवस्थे-नुसार जडाजड पदार्थांमध्यें तीन अवस्था प्रकट होतात. ‘ आंत बाहेर ’ हा भेद मनच करतें. स्वप्नस्थ पुरुष आपणच मिथ्यारूपी होऊन आपणास निरनिराळया तऱ्हेनें पाहतो, तसें हें इंद्रियसाह्य वेगारें मन स्मरणास्मरणामुळें हें विश्व व आपला देह यांस तीन प्रकारें ( जन्म आहे, स्थिति आहे, मृत्यु आहे असें ) पाहतें ॥ ४१ ॥ उद्धवा ! सर्वभक्षक काळाच्या प्रचंड सामर्थ्यानें सर्व जडाजड वस्तु प्रतिक्षणीं जन्ममरणाच्या अवस्थेंत जात असतात; पण त्या अवस्था अतिसूक्ष्म म्हणून दिसत नाहींत ॥ ४२ ॥

उदाहरणार्थ, दिव्याची ज्योत, नदीच्या प्रवाहांतील पाणी किंवा वृक्षफळें यांचें वय, त्यांची स्थिति, मृत्यु हीं जशीं क्षणोक्षणीं बदलतात, त्याप्रमाणेंच सर्व जडाजडांचीं जन्म, वय, स्थिति, मृत्यु हीं प्रतिक्षणीं बदलत असतात ॥ ४३ ॥ दिव्याच्या ज्योतींतील तैल परमाणु प्रतिक्षणीं बदलतात, प्रवाहांतील पाणी प्रतिक्षणीं बदलतें; तरी तोच हा दिवा, तोच हा नदीप्रवाह, असें अज्ञानी लोक बोलतात. त्याचप्रमाणें पुरुषाच्या शरीरांतील घटक प्रत्येक क्षणीं बदलत असतांही तोच हा पुरुष असें अज्ञानी माणसाचे बोल असतात. ते बोल अर्थशून्य म्हणून असत्य होत. त्यांची बुद्धि अगर ज्ञानही असत्य होय ॥ ४४ ॥

स्वकर्माच्या बीजानें तोच पुरुष येथें जन्मतो व मरतो, असें म्हणूंच नका. कारण, तो स्वरूपतः अज व अमर आहे. तो जन्मतो व मरतो ही भाषा भ्रांतिजन्य आहे. लांकूड पेटलें म्हणून अग्नि जन्मत नाहीं किंवा विझलें म्हणून मरतही नाहीं. विस्तव पेटला, विझला ही भाषाच खोटी ॥ ४५ ॥ मातेच्या उदरांत रेतोरूपानें असणें, गर्भावस्था, जन्म, बाल्य, कौमार्य, तारुण्य, पोक्तता, वृद्धत्व व मृत्यु ह्या नऊ अवस्था, शरीराच्या मात्रा आहेत, जीवाच्या नव्हेत ॥ ४६ ॥

पूर्वीं सांगितलेल्या ज्या देहाच्या वरिष्ठ-कनिष्ठ अशा नऊ अवस्था त्या मनानें उत्पन्न केलेल्या आहेत; परंतु गुणांवर आसक्त असणारे जीव, त्या अवस्था आत्म्याच्या असें समजतात. क्वचित् एखादा शहाणा तसें समजत नाहीं. अर्थात् त्या आपल्या नव्हत असें ती समजतो ॥ ४७ ॥ आपल्या वडिलांच्या देहाला मृत्यु आला, आपल्या पुत्राच्या देहाचा जन्म झाला, यावरूनही आपल्या देहाच्या जन्ममरणाचें अनुमान होतें. वस्तु

उत्पन्नविनष्ट होतात; पण त्यांचा ज्ञाता एकच अद्वितीय व नित्य असतो ॥ ४८ ॥ तरुबीज तरूला जन्म देतें व फल शेवटीं त्याला मारतें; हें जाणणारा विद्वान् जसा तरूहून निराळा, त्याप्रमाणें देहाचें जन्ममरण पाहणारा देहाहून विलक्षण म्हणजे देहधर्म नसणारा असतो. तात्पर्य, जीवात्मा नित्य, सर्वज्ञाता म्हणून जन्ममरणादि अवस्थावंत नसतो ॥ ४९ ॥ प्रकृति व पुरुष यांमधील वैलक्षण्याचें ज्ञान विवेकाच्या अभावामुळें न होऊन प्रकृतिसंगतीनें, 'आपण प्रकृतिच' असा जीवाला भ्रम होतो व तो संसारांत पडतो ॥ ५० ॥ गुणसंगति असेल तसा त्याला संसारांतील जन्म येतो. सत्त्वगुण प्रबल असला तर तो ऋषिकुलांत किंवा देवयोनींत, रजोगुण प्रबल असेल तर राक्षसयोनींत किंवा मानवयोनींत आणि तमाचाच प्रभाव जास्त असेल तर तिर्यक् म्हणजे झाडें वगैरेंच्या अथवा पशुपक्ष्यांच्या योनींत जन्मतो ॥ ५१ ॥

इतर नृत्यगायन करतात, त्याचीच नक्कल दुसरा उठवितो, त्याप्रमाणें अनुकरण करणारा हा जीव त्या इतर वस्तूंचे बुद्धिगुण घेतो आणि त्याची इच्छा नसली तरी त्या गुणांच्या जोरानें तो इतरांप्रमाणें वागूं लागतो ॥ ५२ ॥ नदीचा प्रवाह चालत असतां आपण नावेंत बसलों म्हणजे नदीकांठचीं झाडें चालतातसें वाटतें आणि मानेबरोबर डोळे गरगर फिरविले म्हणजे सर्व पृथ्वी हालत आहे असा भ्रम होतो. तद्वत् गुणसंगतीनें भ्रमिष्ट झालेल्या अज व अमर जीवाला आपण जन्मतों—मरतों अशी भ्रांति होते ॥ ५३ ॥ उद्धवा ! मनोरथ जसे खोटे, स्वप्नांतील अनुभव जसा खोटा, त्याप्रमाणेंच आत्म्याला संसार भासविणारा अनुभव खोटा आहे ॥ ५४ ॥ वस्तुतः विषयांचे पदार्थ नसतात, तरी जीवाचा संसार नष्ट होत नाहीं. याचें कारण जीव विषयाचें ध्यानच अखंड करतो. स्वप्नांत जसे खरेच पदार्थ नसतांही मनाच्या कर्तृत्वानें त्या त्या विषयांचा आभास खरा भासतो, त्याप्रमाणें अवास्तविक विषय खरे भासल्यामुळें संसार खरा वाटतो. वस्तुतः विषय नाहींत म्हणून मनोनिर्मित संसारही नाहीं ॥ ५ ॥ म्हणून उद्धवा ! अवास्तवाचाच स्वीकार करण्यास सवकलेल्या इंद्रियांचें साहाय्य घेऊन संसाराचा उपभोग घेऊं नको. संसारामध्यें नित्य जिवंत असणारा भेदभाव, आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें मात्र प्रकट होतो. म्हणून श्रुति, गुरु यांच्या साहाय्यानें आत्मज्ञान करून घे ! ॥ ५६ ॥

उद्धवा ! मोक्षेच्छु पुरुषाचा कोणी दुष्टांनीं तिरस्कार केला, त्याचा अपमान केला, त्याला फसविलें, त्याचा मत्सर केला, त्याला मारलें किंवा बांधून टाकलें, त्याची वृत्ति काढून घेतली अथवा त्याच्या शरिरावर थुंकलें, मुतलें, सारांश त्याला अनेक प्रकारें जरी गांजलें, तरी अशा संकटप्रसंगीं सुद्धां मोक्षेच्छूनें स्वतः मोक्षसाधनांनीं आपला उद्धार करावा ॥ ५७ ॥ ५८ ॥ उद्धव म्हणाला, 'श्रेष्ठ उपदेशका हें तुझें म्हणणें मला नीट समजून सांग. दुष्टछल मला तर देवा असह्यच वाटतो ॥ ५९ ॥ कृष्णा ! तुझ्या निःसीम एकनिष्ठ भक्तांशिवाय कोणीही विद्वान् असो, त्याला आपल्या शरिराचा हा असला छल सहन होणें अशक्यच आहे ॥ ६० ॥

**बाविसावा अध्याय समाप्त**

# अध्याय २३ वा

—*—

व्यासपुत्र शुकाचार्य म्हणाले:—भक्तांचा अग्रणी उद्धव त्यानें याप्रमाणें कळकळीची विनंती केली असतां ती ऐकून यदुपति श्रीकृष्ण, दास-भक्त जो उद्धव त्याचें सकौतुक अभिनंदन करिता झाला आणि त्याच्या विनंतीचा स्वीकार करून त्यास सविस्तर उपदेश करता झाला ॥१॥

श्रीभगवान् म्हणाले—उद्धवा ! दुर्जनांच्या दुष्ट वाक्यांनीं खळबळलेलें मन शांत करील असा हुकमी साधु प्रायः या भूलोकीं फारसा आढळत नाहीं ॥२॥ दुष्टांचे मर्मच्छेदी वाक्प्रहार जितका ताप देतात, तितका ताप नेमानें मारलेले लोखंडी बाणसुद्धां देत नाहींत ॥३॥

उद्धवा ! या संबंधांत एक मोठा पवित्र, पुण्यवंत व सहनसामर्थ्य देणारा इतिहास सांगत असतात, तो मी तुला सांगतों. चित्त स्थिर करून ऐक ॥ ४ ॥

दुर्जनांनीं दुष्ट भाषण करून ताडलेला, पण आपल्याच पूर्वकर्माचा हा परिणाम आहे असें समजणारा कोणी एक धीर संन्यासी पुढील गीत गाता झाला ॥५॥

अवंती राष्ट्रांत एक धनाढ्य ब्राह्मण राहत होता. तो हावरा, लोभी व शीघ्रकोपी असे. त्यानें व्यापार वगैरे करून पुष्कळ संपत्ति मिळविली व कंजूष वृत्तीनें तिचें रक्षण केलें ॥३॥ त्या कृपणानें आपल्या भाऊबंदांची किंवा अतिथिअभ्यागतांची नुसती शब्दानें सुद्धां विचारपूस केली नाहीं. मग पैसे खर्चण्याची गोष्ट दूरच ! अर्थात् त्याच्या घरांत माणसांचा शुकशुकाटच असे. शिवाय, त्यानें स्ववासनाही वेळप्रसंगीं पूर्ण केल्या नाहींत, म्हणून त्याचें शरीर किंवा मन कधीं पुष्ट झालेंच नाहीं ॥७॥ असल्या दुष्ट कृपणाचीं मुलें, भाऊबंद, बायको, चाकरनोकर सदैव दुःखी असत. त्यामुळें त्याचें प्रिय असें कोणीच केलें नाहीं ॥८॥

याप्रमाणें धर्मकर्म न केल्यामुळें तो कृपण स्वर्गापासून, तसाच प्रापंचिक वासना पूर्ण न केल्यामुळें प्रपंचापासून भ्रष्ट होत्साता मृत्युलोकाच्या व स्वर्गलोकाच्या देवतांस अप्रिय झाला. त्या देवता त्यावर अति क्रुद्ध झाल्या ॥९॥ अर्थात अपमानानें क्रुद्ध झालेल्या त्या देवतांच्या शापानें त्या कृपणाचें पूर्वपुण्य संपलें आणि कष्ट, मेहनत करून मिळविलेलें त्याचें सर्व द्रव्य नष्ट झालें ॥१०॥

त्याचें कांहीं द्रव्य भाऊबंदांनीं लांबविलें, कांहीं चोरांनीं लुटलें, कांहीं दैवानें नेलें, कांहीं काळानें, कांहीं लोकांनीं आणि बाकीचें राजसेवकांनीं नेलें ॥ ११ ॥

धर्मसाधन न करणारा व प्रपंचही न थाटविणारा जो कृपण असतो, त्याचा द्रव्य नाश झाला असतां त्याचे आप्त व स्नेही त्याला टाकतात. असें झालें म्हणजे त्याला

विलक्षण काळजी उत्पन्न होते व तो विचार करावयास लागतो ॥ १२ ॥ दीर्घकाल विचारांत निमग्न झालेला हा दरिद्री संताप करून घेतो, खिन्न होतो, दुःखानें त्याला स्पष्ट बोलवतही नाहीं. त्याला कोणीच विचारीत नाहीं. अशी निर्वाणीची दीन अवस्था प्राप्त झाली म्हणजे मग त्यास मोठें वैराग्य येतें ॥ १३ ॥ तो म्हणतो, " काय कष्टदायक माझी स्थिति ही ? देवा ! मी मोठे श्रम करून द्रव्य संपादिलें पण धर्मसाधन केलें नाहीं ! वासनाही तृप्त केल्या नाहींत ! हरहर ! द्रव्य रक्षण करण्यासाठीं मात्र व्यर्थ व्यर्थ मी आपल्या देहाला व मनाला शीण दिला ! " ॥ १४ ॥

कृपणानें मिळविलेली व रक्षण केलेली संपत्ति केव्हांही सुखदायक होत नसते. द्रव्य मिळविण्याकरितां व तें जसेंच्या तसें राखण्याकरितां त्याच्या शरीराला मात्र सपाटून त्रास होत असतो आणि शेवटीं मेल्यानंतरहि त्याला नरकाची प्राप्ति असते. तात्पर्य, जिवंतपणीं दुःख आणि मेल्यावरही दुःखच ! त्याला सुख कोठेंच नसतें ॥ १५ ॥ बत्तीस लक्षणी सुंदरीच्या चेहऱ्यावर एखादा पांढऱ्या कोडाचा टिपका असला कीं तिचें सगळें सौंदर्य जसें मातीमोल होतें, तसें कीर्तिवंतांची कीर्ति कितीही शुद्ध असो, गुणवंतांचे गुण कितीही स्तुत्य असोत, त्यांस लोभाची नुसती झळ लागली कीं ते जळून खाक होतात ॥ १६ ॥

द्रव्य मिळविण्याच्या कामीं श्रम लागतात, तें वाढविण्याच्या कामीं व्याजबट्टा करतांना त्रास होतो, तें सुरक्षित राहावें म्हणून सारखी चिंता करावी लागते आणि त्याचा व्यय झाला, किंवा कांहीं कारणांनीं नाश झाला, तात्पर्य, द्रव्य नष्ट झालें, तर तो मनुष्य वेडा होतो ! ॥ १७ ॥ चोऱ्या, घातपात, खोटें बोलणें, दंभ, काम, क्रोध, आश्चर्यानें वेडेपणा, उन्मत्तपणा, तूं मी हा भेद , वैर, बेभरंवसा, मत्सर, परदाराभिलाष, जुगार, मद्यप्राशन हे पंधरा अनर्थ एका म्हणजे द्रव्याच्या पायीं उत्पन्न होतात. म्हणून ज्याला स्वकल्याण साधावयाचें आहे त्यानें द्रव्यापासून होईल तितकें लांब राहावें ॥ १८ ॥ १९ ॥ ह्या द्रव्यामुळें बंधु, बायको, आईबाप, स्नेही दुरावतात आणि शेवटीं खांद्याशीं खांदा भिडवून ज्यांशीं सहकार्यें केलीं ते, ह्या द्रव्यामुळेंच शत्रु होतात ॥ २० ॥

हे द्रव्यलोभी एका पैशासाठीं रागावतात, क्रुद्ध होतात आणि दरिद्याच्या वाऱ्यालाही उभे राहत नाहींत. इतकेंच नव्हे तर मत्सरानें त्यांचें हृदय पेटतें आणि त्यांत त्यांचें मित्रप्रेम जळून त्यांची राख होते ॥ २१ ॥ फार काय ? देवांसही दुर्लभ असा मनुष्यजन्म आणि त्यांतहि ब्राह्मणाचा जन्म प्राप्त झाला असतांही त्याचा धिःकार करून जे द्रव्यलोभी आपला खरा स्वार्थ बुडवितात, त्यांस पुढें अमंगल योनींत जन्म घ्यावा लागतो व पराकाष्ठेचें दुःख होतें ॥ २२ ॥ मरणशील असूनही स्वर्गाचें व मोक्षाचें द्वार उघडण्यास समर्थ असणारा हा मानवी देह प्राप्त झाला असतां कोणता विचारी पुरुष—नित्य दुःखादि अनर्थ उत्पन्न करणाऱ्या—धनादि विषयांवर आसक्ति ठेवील बरें ? ॥ २३ ॥

देव, ऋषि, पितर, भूतें, गोत्रज, बंधु यांचे द्रव्यभाग न देतां व आपणही कांहीं न खातां व न पितां मरणारा लोभी पुरुष शेवटीं अधोगतीलाच जातो ॥ २४ ॥

"ज्या द्रव्यादि साधनांनीं चतुर लोक पुरुषार्थ साधतात, तें द्रव्य, जीवित व तें बल मी निष्फल व दुष्फल द्रव्यसंचय करण्यांत मात्र व्यर्थ खर्चिलें. मी आतां वृद्ध झालों, द्रव्यहीन झालों, शक्तिहीन झालों, आतां मला काय साध्य होणार ? हरहर ! ॥ २५ ॥ धनार्जनासाठीं विद्वान् सुद्धां वारंवार धडपड करीत असतात, ती का ? खरोखर कांहीं तरी कोणाची मोहिनीच असली पाहिजे, कीं जी मनुष्यांस मूर्ख करते ॥ २६ ॥ सर्वभक्षक मृत्यु आपला जबडा पसरून प्रत्यक्ष आपल्यापुढें उभा असतां धनाचा, धनोत्पत्तीचा, वासना पूर्ण करणाऱ्या विषयांचा, व जन्ममृत्यूंत लोटणाऱ्या कर्मांचा, स्वीकार करण्यांत लाभ कोणता ! हीं काय मृत्यूला टाळूं शकतील ? ॥ २७ ॥ त्या दीनवत्सल प्रभूनें मला या अवस्थेला आणून पोहोंचविलें, व माझ्या चित्तांत वैराग्य उत्पन्न केलें, त्या देवदेवेश्वरानें खरोखर माझ्यावर मोठाच अनुग्रह केला आहे ॥ २८ ॥ आतां सावध राहून उरलेल्या आयुष्यात मी खडतर तपश्चर्याच करीन. मात्र तपश्चर्यापूर्वक चित्तशुद्धि संपादून उत्तमोत्तम स्वार्थ जो मोक्ष तो मिळविण्याची माझी ज्ञानसंपत्ति जय्यत हवी ॥ २९ ॥ या कामीं देव हो ! तुमचें अनुमोदन माझ्या हेतूंस साहाय्य असो ! एका घटकेंतच खट्वांगराजानें मोक्ष मिळविला ना ? देवाची कृपा झाली म्हणजे काय कमी असणार ?" ॥ ३० ॥

भगवान् श्रीकृष्ण म्हणाला, उद्धवा ! याप्रमाणें दृढ संकल्प करून त्या द्विजोत्तमानें अंतःकरणांतील अहंकारादिकांच्या गांठी ज्ञानानें सोडविल्या. तो शांत, निःसंग आणि निर्विशेष झाला. तात्पर्य तो संन्यासी मुनि झाला ॥ ३१ ॥ आणि देह, प्राण, इंद्रियें, मन वगैरे सर्वांस स्वाधीन ठेवून तो पृथ्वीवर यथेच्छ संचार करूं लागला. भिक्षार्थ मात्र तो शहरांत अथवा गावांत जाई आणि कोणाच्या लक्षांत न भरेल अशा वृत्तीनें भिक्षा मागे ॥ ३२ ॥ परंतु त्या वृद्ध सन्याशाचा अवंतींतील दुष्ट लोकांनीं अनेक प्रकारें छळ केला ॥ ३३ ॥ कोणी त्याचा त्रिदंड, कोणी कमंडलू, कोणी रुद्राक्षमाळा, कोणी त्याचीं फाटकीं नेसण्यापांघरण्याचीं वस्त्रें व वल्कलें लुबाडलीं आणि कोणी देऊन पुनः जबरीनें हिसकावून घेतलीं ! ॥ ३४ ॥ तो नदीतीरीं भिक्षान्न खात असतां कोणी पश्यांनीं त्याच्या डोक्यावर लघुशंका केली ! व कोणी त्याच्या अंगावर थुंकले ! ॥ ३५ ॥ त्यानें बोलावें म्हणून कोणी त्याला मारूं लागले. 'हा चोर आहे' असें म्हणून कोणी त्याची निर्भर्त्सना केली ॥ ३६ ॥ कोणी त्याला दोऱ्यानीं डांबलें. कोणी 'हा भोंदु सोदा आहे अशा त्याला शिव्या दिल्या. 'या कफल्लकाला घरांतून घालवा; हा हट्टी, चोर, झोंड; निर्लज, बेमुर्वहतखोर, कपटी बकासारखा बिन बोलतां कार्य साधणारा आहे, अशी कोणी त्याची निर्भत्सना केली. कोणी दात विचकले. कोणी घाण सुद्धां टाकली ! ॥ ३७-३८-३९ ॥

कोणी त्याला माकडासारखें बांधून पिंजऱ्यांतही कोंडला; परंतु हा सर्व छळ आपल्या कपाळींच लिहिला आहे, तो भोगलाच पाहिजे, असा विचार करून निमूटपणें

तीं सर्व दुःखे त्यानें भोगलीं. सारांश, त्याचें व्रत भग्न करण्यासाठीं अधम लोकांनीं त्याचा असह्य छळ केला; परंतु त्यानें मोठ्या सात्त्विक धैर्यानें आपली धर्मवृत्ति कायम ठेवली आणि ही सुंदर गाथा त्यानें गायिली. या गाथेला भिक्षुगीता असें म्हणतात ॥४०॥ ॥ ४१, ४२ ॥

भिक्षु म्हणाला– मला सुखदुःख होतें याचें कारण हे लोक नव्हेत, देव नव्हेत. माझें शरीर, हे ग्रह, माझीं कर्में किंवा काळ नव्हे. जीवाला सुखदुःखात्मक संसारांत येरझाऱ्या करण्यास लावणारें जीवाचें सूत्र मनाच्या ताब्यांत असतें. दुःखात्मक नाटकांतील प्रवेशांचा सूत्रधार मन हेंच होय. श्रेष्ठ लोकहि हेंच म्हणतात ॥ ४६ ॥ अति बलवंत असें हें मन सत्त्वादि वृत्त्यात्मक होतें. तो तो वृत्त्यात्मक जीव विशेष सात्त्विकादि कर्में करतो आणि कर्माप्रमाणें उत्तम अधम, योनींत जन्मतो ॥ ४४ ॥ सदिच्छा करणाऱ्या मनासहवर्तमान असणाराही अकर्ता, ज्ञानमय. जीवसखा आत्मा साक्षीरूपानें असतो. परंतु संसारप्रवर्तक मन आपणच आहों किंवा तें मन आपलेंच आहे, असें स्वीकारणारा हा जीव सात्त्विादि गुणांवर आसक्त होऊन विषयसेवनांत दंग होतो ॥४५॥

दान, स्वधर्माचरण, यम, नियम, श्रुतिप्रणीत कर्मनिष्ठा आणि चांगलीं व्रतें हे सर्व उपाय-हीं साधनें–मनालाच वश करणारीं आहेत. मनोविजय संपादणें हेंच उत्तम फल आहे. सारांश, मनोविजय संपादणें हा उत्तमोत्तम योग होय ॥४६॥ ज्ञानपूर्वक उपायांनीं ज्याला मनोनिग्रह साध्य झाला, ज्याचें मन शांत झालें त्याला दानादि कांहीं करावयास नको; परंतु ज्याचें मन शांत न होतां अधोगतीला जातें, त्याला नुसतीं दानादि काय उपयोगीं पडणार ? ॥ ४७ ॥

तात्पर्य, मन स्वाधीन ठेवा. तें हातांत आलें म्हणजे इंद्रियें व त्यांचे देव हातांत आलेच समजावें. मन बलवंतांचा राजा आहे. तें मन ज्यानें स्वाधीन करून घेतलें, तो जीवही बलिष्ठ देवांचा देव होतो ॥ ४८ ॥ या अजिंक्य, न सोसवणाऱ्या वेगाच्या व मर्में तोडणाऱ्या शत्रूला म्हणजे मनाला न जिंकतां दुसऱ्याच मर्त्याबरोबर अज्ञ लोक भांडतात आणि शत्रूंस मित्र करतात त्यांस शुद्ध मूर्ख असें म्हणावें ॥ ४९ ॥ ह्या मनःकल्पित देहालाच ' देह मी, देह माझा ' असें म्हणून कवटाळणारे लोक विवेकशून्यच होत. ' हा मी, हा दुसरा ' असा भेद बाळगून भ्रमिष्ट झालेले हे लोकच अज्ञानकृत अनंत संसारसागरांत गटंगळ्या खातात व अनंतकाल दुःखांत पडतात ॥ ५० ॥

दुसरे लोकच माझ्या सुखदुःखाचे कर्ते, हा पक्ष मीं घेतला तर येथें आत्म्याचा विचार कशाला ? सुखदुःखाचा हेतु लोकांना आणि लोक म्हणजे देह आणि देह व सुखदुःखें तर भूमीचीं कार्यें, तेव्हां आत्म्याचा संबंध काय येथें ? तो आत्मा तर सर्वत्र एकच आहे. तो सुखदुःखांचा कर्ताही नाहीं व भोक्ताही नाहीं. बरें, समजा, तो आहे, तर एखाद्याच्या जिभेचा चावा दांतांनीं घेतलाच तर त्या वेळीं मनुष्य

कोणावर संतापेल ? तसेंच आत्म्याच्या जडभूत एका देहानें दुसऱ्या जडाला इजा केली, तर त्या जडाला समजणारच नाहीं. मग सर्व जड शरिरांत असणाऱ्या एक आत्म्यानें रागवावयाचें कोणावर, कसें आणि कां ? ॥ ५१ ॥

दुःखाचे कारण देव ( इंद्रियें अथवा त्यांचे स्वामी ) समजू. मग एक विकार्य देव दुसऱ्या विकार्य देवाच्या दुःखाचा कारक होईल. आत्म्याचा येथें काय संबंध ? आपल्या देहांतील एका अवयवानें दुसऱ्या अवयवास दुखविलें तर पुरुष संतापेल कोणावर ? अर्थात् संतापणें व्यर्थ आहे; पण जाणत्यालाच हें समजतें ॥ ५२ ॥ बरें आत्मा स्वभावतःच सुखदुःखांचा कर्ता समजूं या मग दुसऱ्यावर रागावणें व्यर्थ नव्हे काय ? वस्तुतः आत्मव्यतिरिक्त दुसरी वस्तूच नाहीं; असलीच तर ती मिथ्या ! तसेंच, परमार्थतः सुखही नाहीं, दुःखही नाहीं, सुखदुःखांचें निमित्त नाहीं. दुसरी वस्तूही नाहीं ! हा खरा भाग होय. ॥ ५३ ॥ तसेंच, ग्रह सुखादिकारक घेतले तरी जन्म असणाऱ्या देहाला त्रास देतील; अजन्मा अशा आत्म्याला ते काय करणार ? शिवाय, ग्रह परस्परांस पीडा करतात असेंही म्हणतात. तेव्हां जो ग्रह नव्हे, किंवा देह नव्हे असा अद्वितीय आत्मा तो, दुसरा आत्माच नाहीं तर रागावेल कोणावर ? ॥ ५४ ॥ जर्म जरी विकारकारी म्हटलें तरी तें जें जड व अजड आहे त्याला बाधेल. आत्मा जडाड नाहीं, तेव्हां त्याला त्याचें काय ? देह सुद्धां शुद्ध जड आहे, जडाजड नाहीं आंणि आत्मा तर शुद्ध चिद्रूप आहे, म्हणून तोही जडाजड नव्हे. तेव्हां चिद्रूप अद्वितीय आत्मा रागावणार कोणावर ? कर्माचें मूळचें जडाजड तेंच सत् नाहीं, म्हणून कर्मही वस्तुतः नाहींच ॥ ५५ ॥ काळ घेतला तरी तो आत्मस्वरूपानेंच व्यापलेला. तेव्हां कालाचा अंतर्भाव करणाऱ्या आत्म्याला काल कसा अपकारक होणार ? अग्नीला ताप येणें किंवा शीताला थंडी होणें अशक्य. तसेंच कालानें आत्म्याला अपकार करणें अशक्य. शिवाय, परमात्मस्वरूपांत द्वंद्वाला ठावच नाहीं तर आत्मा रागावेल कोणावर ? ॥ ५६ ॥

सारांश, जन, देवता, आत्मा, ग्रह, कर्म, काल ( यांतच सर्व जडांचा अंतर्भाव होतो ) या सहांपैकीं कोणीही आत्म्याच्या ठिकाणीं सुखदुःखादि विकार उत्पन्न करण्याला समर्थ नाहीं. म्हणजे केव्हांही, कोठेंही, कसेंही, प्रकृतीला आत्म्याच्या ठिकाणीं द्वंद्वानुभवाचा स्पर्श सुद्धां उत्पन्न करण्याचें सामर्थ्य नाहीं. संसाराला प्रकाशित करणारा म्हणजे जिवंत ठेवणारा जो अज्ञानी अहंकार, त्याला वस्तुतः नसलेलें सुखदुःखादि भासेल; पण तें शुद्ध अज्ञान आहे. तेव्हां ज्ञानी पुरुषाला अविद्यमान भूतांची किंवा अस्तित्वांतच नसणाऱ्या भूतनिमित्त सुखादिकांची भीति बाळगण्याचें कारणच नाहीं ॥ ५७ ॥ याप्रमाणें पूर्व महर्षींनीं जो अढळ सिद्धांत स्थापन केला आहे त्याचें उत्तम ज्ञानविज्ञान मी करून घेतों आणि श्रीपरमेश्वराच्या एकनिष्ठभक्तिरूपी अनन्य साधनानें

हा जो अज्ञानमय, दुःखमय भवसागर तो तरून जातो म्हणजे यथार्थ ज्ञानविज्ञानानें भवसागराचा भास नाहींसा करतो ॥ ५८ ॥

श्रीभगवान् म्हणाले, बा उद्धवा ! याप्रमाणें निर्धन झालेल्या त्या ब्राह्मणाला वासनाशून्य करणारें वैराग्य प्राप्त झालें त्याची चींता सरली, तो पृथ्वीपर्यटन करूं लागला. त्या संचारांत दुष्ट लोकांनीं त्याचा पुष्कळ छळ केला; परंतु स्वधर्मापासून रेसभरही भ्रष्ट न होतां, त्यानें ही पूर्वोक्त गाथा गायिली ॥५९ ॥

उद्धवा, पुरुषाच्या जीवाला सुखदुःखादि देणारा त्याच्या मनाशिवाय दुसरा कोणी नसतो· आपले स्नेही, शत्रु वगैरे मिळून होणारा समाज म्हणजे संसार, हा अज्ञानानें विक्षिप्त झालेल्या मनाचा प्राण घेणारा खेळ होय ॥ ६० ॥ म्हणून उद्धवा, सर्व बुद्धि व श्रद्धा माझ्या ठिकाणी ठेऊन उत्पन्न होणाऱ्या एकनिष्ठ ज्ञानानें मनाला आवरून धर, स्वाधीन करून घे. माझ्यावर, श्रद्धा माझ्या ठिकाणीं भक्ति आणि विवेकपूर्वक मनविग्रह हाच ब्रह्मज्ञानविज्ञान संपादन करूं इच्छिणाऱ्या मुमुक्षूला तारक योगसंग्रह होय ॥ ६१ ॥ ही भिक्षूनें गायिलेली गाथा व ब्रह्मनिष्ठा जो समाहित मनानें धारण करील, ऐकवील व ऐकेल, त्याला द्वंद्वें–द्वैतें–कोणताही त्रास न देतां योग्य प्रसंगीं मोक्षोपकारकही होतील ॥ ६२ ॥

तेविसावा अध्याय समाप्त

—

# अध्याय २४ वा

श्रीभगवान् म्हणाले, उद्धवा, पूर्वऋषींनीं निश्चित केलेलें जें सांख्यशास्त्र तें तुला सांगतों. तें सांख्य समग्र समजून उमजलें म्हणजे द्वैत उत्पन्न करणारी जीवभ्रांति नष्टच होते ॥१॥ ज्या काळीं युगास आरंभ झाला नव्हता, त्या काळीं ज्ञानाचें व ज्ञेयाचें ( ज्ञात होणाऱ्या पदार्थाचें ) स्वरूप एक आणि विकल्पशून्य असे. युगांतील पहिलें जें कृतयुग त्यांतील लोक विवेकनिपुण असतात, म्हणून त्या वेळीं विकल्प म्हणजे आपपर भेद नसतो ॥२॥ तें ब्रह्म निरुपाधिक, भेदशून्य, सद्रूप व सर्वगामी असतांही मायेनें त्याला दोन प्रकारांनीं दृश्य स्वरूपांत आणलें, आणि मनाला व वाणीला वर्णितां येतील असे केलें ॥३॥ त्यांतील पहिला प्रकार म्हणजे प्रकृति होय. हिला दोन स्वरूपें असतात. मायेनें केलेला दुसरा प्रकार म्हणजे ज्ञान. या ज्ञानाला 'पुरुष' ही संज्ञा आहे ॥४॥ पुरुषाचें ( जीवाचें ) अनुमत घेऊन मी प्रक्षुब्ध केलेल्या प्रकृतीपासून सत्त्वादि तीन गुण उत्पन्न झाले ॥५॥ त्या गुणांपासून सूत्र होऊन त्याचा व महत्तत्त्वाचा संयोग झाला. नंतर त्या संयोगापासून अहंकार झाला ॥ ६ ॥ हा अहंकार सात्त्विक, राजस व तामस असा तीन प्रकारचा होतो. तो स्वरूपतः चित् व अचित् यांच्या मिश्रणाचें कार्य असून, तो शब्दस्पर्शादि पंच तन्मात्रा, ज्ञानकर्मांचीं इंद्रियें आणि मन यांचा जनक आहे ॥ ७ ॥ तमोगुणघटित तन्मात्रांपासून पृथ्वी–आकाश–वायुप्रभृति पंचमहाभूतें, तैजसापासून कर्ण, स्पर्श, नेत्रप्रभृति पांच ज्ञानाचीं व हस्तपादादि पांच कर्मांचीं इंद्रियें, वैकारिकापासून दहाही इंद्रियांच्या देवता व मनोदेवता झाल्या ॥ ८ ॥ मीं ( परमेश्वरानें ) प्रेरणा केली म्हणून महत् आदि सर्व भाव एकत्रित झाले. त्यांत क्रियाशक्ति उत्पन्न झाली. या सर्वांच्या क्रियेनें एक अंडें म्हणजे ब्रह्मांड उत्पन्न झालें. हें ब्रह्मांड माझें उत्तम निवासस्थान आहे ॥ ९ ॥ त्या जलांतच वास्तव्य करणाऱ्या ब्रह्मांडांत माझें सगुण स्वरूप मीं प्रकट केलें; त्या माझ्या सगुण शरिराच्या नाभीमधून 'विश्व' या नांवाचें कमल व त्या कमलांच्या स्वयंभू ब्रह्मदेव यांची उत्पत्ति झाली ॥ १० ॥ ब्रह्मदेव रजोगुणी आहे. त्यानें तप केलें, तेव्हां माझ्या प्रसादामुळें विश्वाचा आत्मा असणाऱ्या त्या ब्रह्मदेवानें स्वर्लोक, भुवर्लोक आणि भूलोक अशीं तीन भुवनें उत्पन्न केलीं ॥ ११ ॥

स्वर्गलोकांत देव राहतात, भुवर्लोकांत भूतें राहतात व भूलोक मानवादि मर्त्य जीवांनीं व्यापला आहे. या तीन लोकांच्याही पलीकडे असणाऱ्या अतिभुवनांत सिद्ध राहतात ॥ १२ ॥ भूलोकाच्या अधोभागीं जीं सप्त पाताळें आहेत त्यांत असुर व नागलोकप्रभृति राहतात. याप्रमाणें हे लोक व त्यांचीं स्थानें, प्रभु ब्रह्मदेवानें निर्माण केलीं. सत्त्वादि तीन गुणांपासून होणाऱ्या सर्व गति म्हणजे फळें भूप्रभृति तीन लोकांतच मिळतात,

परंतु योगादिकांचीं निर्मळ फळें महः, जन, तप सत्य या चार लोकांत मिळतात. माझे भक्तांस मात्र वैकुंठ लोक मिळतो ॥ १३,१४ ॥ मीच कालरूपी परमेश्वर हें १४ भुवनांचें विश्व उत्पन्न करून त्या त्या विशिष्ट भुवनाची प्राप्ति त्या त्या विशिष्ट कर्मानें व्हावी असें ठरवितों. याप्रमाणें गुणांचा प्रवाह असणाऱ्या या संसारांत जीव केव्हां वर, केव्हां खालीं जातात. आणि सर्व लहान मोठे पदार्थ प्रकृतिपुरुषांच्या अंशानीं मात्र निर्माण होतात ॥ १५,१६ ॥

या विश्वाच्या कार्यांत जें आदि व अंतीं असतें तें मध्यें असतें व तेंच सत्य असतें. पदार्थांच्या उत्पत्तीपासून नाशापर्यंत जे विकार, रूपांतरें होतात त्यांनींच व्यवहार चालतो. सुवर्णाचे व मृत्तिकेचे विकारच व्यवहारोपयोगी असतात ॥ १७ ॥ प्रकृतीचें उपादान करून जें महत्तत्त्वादि निमित्त कारण तें अपर म्हणजे अहंकाररूपी कार्य प्रकृतीपासून उत्पन्न करतें व जें कार्याच्या पूर्वी व नंतर असतें त्याला व्यवहारांत सत्य म्हणतात ॥ १८ ॥ त्या सत्याचें ( १ ) प्रकृति हें उपादान कारण आणि ( २ ) परम पुरुष हा त्याचा आधार आहे. ( ३ ) काल हा गुणांचा प्रकाशक आहे. प्रकृति, पुरुष व काल हें त्रय ब्रह्मरूपी मीच आहें ॥ १९ ॥

जोंपर्यंत मी ईक्षण करतों, विचार करतों, तोंपर्यंत मात्र कार्यकारणरूपी जगड्व्याळ संसार अखंड असतो. देही जीवांच्या उपभोगाप्रीत्यर्थ हा संसार मी स्थितीचा शेवट करीपर्यंत चालत राहतो ॥ २० ॥ जीव जगतांचे जन्म–स्थिति–लय चालविणारा विराट मीच व्यापलेला आहे. प्रलयकाल आला म्हणजे सर्व १४ भुवनांसकट तो पंचत्वरूप विभागाला योग्य होतो, तात्पर्य नष्ट होतो ॥ २१ ॥ प्रलयकालीं जीवाचें शरीर अन्नामध्यें. अन्न धान्यबीजामध्यें बीजें पृथ्वीमध्यें व पृथ्वी गंधामध्यें याप्रमाणें प्रत्येक वस्तु उपादानकारणांत जाऊन राहते ॥ २२ ॥ तसेंच गंध जलांत, जलें रसांत, रस तेजांत, तेज रूपांत, रूप वायूंत, वायु स्पर्शांत, स्पर्श आकाशांत, आकाश शब्दांत आणि इंद्रियें कारणांत लीन होतात ॥ २३,२४ ॥

उद्धवा ! तसेंच इंद्रियांचा – प्रवर्तक देवतांचा – सर्वकार्यसमर्थ असणारें जें मन, त्या मनामध्यें लय होतो. शब्द-तन्मात्रा अहंकारांमध्यें व प्रभावशाली अहंकार महत्तत्त्वामध्यें लय पावतो. तसेंच गुणोत्कृष्ट महत्तत्व सूक्ष्मस्वरूपामध्यें, ते गुण अव्यक्त जी मूलप्रकृति तिच्यामध्यें, मूलप्रकृति अव्यय जो काल त्यामध्यें आणि तो काल सगुण ब्रह्मांत आणि शबल ब्रह्म अजन्म जो आत्मा, त्या ' मी 'मध्यें लीन होतें; आणि सर्वांच्या जन्ममृत्यूचें अधिष्ठान असणारा निर्गुण आत्मा अखंड स्वस्वरूपांत असतो ॥ २५–२७ ॥ विचारपूर्वक चिंतन करणाऱ्या सुविचारी मनांत भेदाची भ्रांति उत्पन्न होतच नाहीं व झालीच तर आकाशांत सूर्योदय झाला असतां जसा अंधार टिकत नाहीं तशी ती टिकत नाहीं ॥ २८ ॥ त्याप्रमाणें प्रपंचामधील अभ्युदयाची व परमार्थांतील निःश्रेयसाची दृष्टि ठेवून मीं अनुलोभ-प्रतिलोम पद्धतीनें तुला सकल संशयांचा उच्छेद करणारें हें साग्र सांख्यदर्शन स्पष्ट सांगितलें ॥ २९ ॥

## चोविसावा अध्याय समाप्त

# अध्याय २५ वा

—*—

श्रीभगवान् म्हणाले, नरपुंगवा उद्धवा ! गुणांचा संकर न झाला असतां, सात्त्विक, राजसी, तामसी पुरुष कोणकोणत्या गुणांनीं होतात, तें सांगतों ऐक ॥ १ ॥ मनाची शांति, इंद्रियनियमन, सहनशीलता, विवेक, तपाचरण, सत्यभक्ति, दयाळुपणा, स्मरणशक्ति, संतुष्टता, औदार्य, निःस्पृहता, आस्तिक्यबुद्धि, सभ्यता, क्षमा, धैर्य, आत्मस्तुतीचा कंटाळा, आत्मसंतोष हे सात्त्विक पुरुषाचे गुण होत ॥ २ ॥ वासना, सकामकर्म, उन्मत्तपणा, असमाधान, मानीपणा, सकामभक्ति, भेदबुद्धि, विषयसुखाची हौस, मनाची उल्लसिता, कीर्तीची आवड, साहसप्रियता, युद्धप्रीति, विनोदीपणा, बळाच्याच जोरावर, उद्योगीपणा हे राजसी पुरुषाचे गुण होत ॥ ३ ॥ क्रोध, लोभ, असत्यता, क्रूरता, माजरेपणा, दंभ, श्रमीपणाची आवड, लेलहप्रियता, शोक, मोह, असंतोष, दैन्य, झोंप, हावरेपणा, भेकडपणा, आळशीपणा हे तामसी पुरुषाचे गुण होत ॥ ४ ॥ हे अनुक्रमें सात्त्विकादिकांचे गुण बहुतेक सांगितले. आतां गुणांचें मिश्रण कसें होतें, तो प्रकार ऐक ॥ ५ ॥

उद्धवा ! ‘ हा मी ’ हा अभिमान आणि ‘ हें माझें ’ ही बुद्धि या गुणात्मक उभयतांच्या साहाय्यानें मन, इंद्रियें आणि पंचमहाभूतें यांच्या द्वारें सर्व लौकिक व्यवहार चालतो ॥ ६ ॥ धर्म म्हणा, द्रव्यादिकाची इच्छा म्हणा, किंवा भोगाची हांव म्हणा, या विषयांत जो गढून जातो, त्याची ती ती निष्ठा ही गुणांचें मिश्रणकार्यच असते. फलही तसेंच. धर्मनिष्ठेचें फल सात्त्विक श्रद्धा, कामनिष्ठेचें फल राजसी विषयप्रेम आणि अर्थाचें फल द्रव्यप्राप्ति. द्रव्य हा पदार्थ तमोगुणात्मकच ॥ ७ ॥ एकाच विषयाच्या निष्ठेंतही गुणभेद होतो. काम्य धर्मनिष्ठा राजसी, गृहस्थाश्रमावरील निष्ठा तामसी आणि नित्यकर्मनिष्ठा सात्त्विक असते. गृहस्थाश्रमांतच असा त्रिगुणात्मक सन्निपात होतो ! ॥ ८ ॥ शमदमादि गुण प्रबल असले म्हणजे तो तो पुरुष सात्त्विक होय असें जाणावें; कामादि जोरांत असले म्हणजे राजसी असें समजावें आणि क्रोधप्रभृति तमोगुण जास्त असले म्हणजे तामसी आहे असें खुशाल अनुमान करावें ॥ ९ ॥ वेदप्रणीत स्वकर्म करून जो पुरुष अथवा जी स्त्री माझी निष्काम उपासना करतात तीं तीं मनुष्यें सात्त्विक होत असें जाणावें ॥ १० ॥ विषयभोगाची इच्छा ठेवून वेदोक्त कर्मांनीं जो माझी नित्य उपासना करतो, तो मनुष्य राजसी प्रकृतीचा; व जारण, मारण, हिंसा करण्याची इच्छा धरून माझी उपासना करणारा तो तामसी होय असें जाणावें ॥ ११ ॥

सत्त्वादि गुण जीवाचेच आहेत. आत्म्याशीं — परमेश्वराशीं त्यांचा संबंध नाहीं. ह्या गुणांचा जन्म जीवाच्या मनोभूमिकेंत होतो. या मनोनिर्मित गुणांनीं सत्त्वादि रज्जूंनीं

विषयासक्त जीव बांधले जातात ॥ १२ ॥ तेजस्वी, निर्मळ आणि मंगलकारी सत्त्वगुण पुरुष हृदयांत प्रबल झाल्यामुळें रजोगुण व तमोगुण जेव्हां लय पावतात, तेव्हां तो पुरुष सुखानेंच धर्म-ज्ञानप्रभृति कल्याणकारी वृत्तींनीं युक्त होतो. धर्म, ज्ञान, समाधान ह्या वृत्ति असतात, तेव्हां सत्त्वगुण जोरावर असतो ॥ १३ ॥ विषयांचा अभिलाष, द्वैतबुद्धि आणि आत्माभिमान उत्पन्न करणाऱ्या रजोगुणाची सत्त्व—तमांवर सरशी झाली म्हणजे दुःख देणारें कर्म, प्रसिद्धि आणि संपत्ति यांची संगति पदरीं पडते ॥ १४ ॥ मोह उत्पन्न करणारा, ज्ञान नष्ट करणारा आणि आळस वाढविणारा तमोगुण इतरांहून प्रबल होतो, तेव्हां शोक, मोह निद्रा, क्रौर्य, पोकळ मनोराज्यें यांच्या स्वाऱ्या हजर होतात ॥ १५ ॥ आणि जेव्हां चित्त प्रसन्न असतें, इंद्रियें शांत असतात, शरीर भीतिशून्य असतें आणि मन सर्व वासनारहित निःसंग असतें, तेव्हां माझें स्थान प्राप्त करून देणारा सत्त्वगुण जोरानें विलसत आहे असें समजावें ॥ १६ ॥ कर्माच्या कटकटीमुळें जेव्हां चित्त विकार पावून विक्षिप्त होतें, ज्ञानेंद्रियें असंतुष्ट होतात व कर्मेंद्रियें अस्थिर होऊन मन भ्रमिष्ट होतें; असा प्रकार जेथें असतो, तेथें रजोगुणाचा पगडा बसला आहे असें समज ॥ १७ ॥

जेव्हां चित्त मूढ होऊन ज्ञानग्रहणाला असमर्थ होतें, मनाचे व्यापार स्तब्ध होतात, अज्ञान आणि खेद प्रकट होतात, तेव्हां तमोगुण विलसत आहे असें समजावें ॥ १८ ॥ सत्त्वगुण वृद्धिंगत झाला म्हणजे देवांचें ( दैवी गुणांचें ) बल वृद्धिंगत होतें आणि रजोगुण वाढला म्हणजे असुरांचें ( असुरी गुणांचें ) व तमोगुण वाढूं लागला म्हणजे राक्षसांचें ( राक्षसी गुणांचें ) सामर्थ्य वाढण्याचा प्रकार होतो ॥ १९ ॥ सत्त्वानें जागृतावस्था प्राप्त होते. रजोगुणांनें स्वप्नावस्था प्राप्त होते आणि तमोगुणानें गाढ निद्रावस्था जीवाला प्राप्त होते. तुरीय म्हणून चौथी अवस्था आहे, ती स्वरूपानें वरील तिन्ही अवस्थांत विद्यमान असते ॥ ५० ॥ सत्त्वगुणात्मक वेदोक्त कर्म करणारे ब्राह्मण श्रेष्ठ लोकीं जातात, तामसी स्वभावाचे कर्म करणारे पाषाणादि नीच लोकीं जातात आणि राजसी वृत्तीचे कर्मानुष्ठानी भूलोकीं जन्म घेतात ॥ २१ ॥ तसेंच सात्त्विक वृत्तींत देहत्याग करणारे प्राणी स्वर्गाप्रत जातात, रजोवृत्तींत मरणारें मनुष्यलोकांत जातात, तमोवृत्तींत मरणारे नरकलोकीं जातात आणि निर्गुण वृत्तींत देह ठेवणारे आत्मज्ञ आत्मलोकीं नित्य असतात ॥ २२ ॥

वर्णाश्रमविहित कर्म ईश्वराला अर्पिलें अथवा निष्काम बुद्धीनें केलें, तर तें सात्त्विक कर्म होय; पण सकामतः कर्म केलें तर तें राजसी आणि परोपकारी बुद्धीनें केलें, तर तेंच कर्म तामसी होतें ॥ २३ ॥ केवल म्हणजे निरुपाधिक ज्ञान सात्त्विक होय, सोपाधिक ज्ञान राजसी होय, अप्रबुद्धाचें ज्ञान तामसी होय आणि परमात्मज्ञान निर्गुण होय ॥ २४ ॥

तसेंच अरण्यवास सात्त्विक होय. गांवांत—शहरांत राहणें राजसी होय. जुगाराच्या अड्ड्यांत राहणें तामसी आणि परमात्मस्थानीं वास्तव्य तें निर्गुण होय ॥ २५ ॥ ह्याच-

प्रमाणें निःसंग कर्मकर्ता सात्त्विक होय. कामाच्या अभिमानानें कर्म करणारा राजस होय. धोरण नसलेला कर्ता तामसी होय आणि माझा एकनिष्ठ भक्त निर्गुणस्वरूप होय ॥ २६ ॥ तसेंच आत्मस्वरूपावरील श्रद्धा सात्त्विक होय. कर्म व तत्फल यांवरील श्रद्धा राजसी होय, अधर्मावरील श्रद्धा तामसी होय आणि एकनिष्ठ ईशभक्तीवरील श्रद्धा निर्गुण होय ॥ २७ ॥ याचप्रमाणें आरोग्यकारक, स्वच्छ व सहज प्राप्त होणारा आहार सात्त्विक होय, जिव्हेचे चोचले पुरविणारा आहार राजस होय, मागाहून दुःख देणारा आणि जातीचा अमंगळ असा आहार तामसी होय ॥ २८ ॥

आत्मस्वरूपजन्य सुख सात्त्विक होय, विषयजन्य सुख राजस होय, मोह व दैन्य यांपासून होणारें सुख तामसी होय, आणि भक्तीच्या योगानें होणारें सुख निर्गुण होय ॥ २९ ॥ पदार्थ, देश, काल, फळ, ज्ञान, कर्म, कर्ता, श्रद्धा, जीवावस्था, देवादि स्वरूपनिष्ठा ह्यांपैकीं प्रत्येकाचे सत्त्वादि गुणांनीं तीन तीन प्रकार होतात ॥ ३० ॥ उद्धवा ! ज्ञाता व ज्ञेय यांच्या अधिष्ठानामुळें उत्पन्न होणारे सर्व दृष्ट, श्रुत व मनोनिर्मित भाव, गुणात्मक आहेत ॥ ३१ ॥ ह्या सर्व संसृति, सर्व अवस्था, गुण व कर्में यांच्यामुळें अस्तित्वांत येतात व जगतात. उध्दवा ! हे चित्तापासूनच जन्म पावलेले गुण ज्या विवेकी पुरुषानें जिंकले आणि शुद्ध भक्तियोग जो मत्पर झाला तो मद्रूप, आत्मरूप होऊन मुक्त होतो. म्हणून उत्तम प्रकारचें ज्ञान व उत्तम अनुभव देणारा नरदेह प्राप्त झाला असतां शहाण्या माणसानें गुणांचें जाळें तोडून माझ्या भजनीं अखंड एकनिष्ठ असावें ॥ ३२ ॥ ३३ ॥ सदैव दक्ष असून इंद्रियदमन करणाऱ्या विवेकी पुरुषानें निरहंकार व निर्मम होऊन माझें भजन करावें; नंतर सत्त्वगुणच वाढवून इतर गुणांचा निरास मुनि होऊन करावा ॥ ३४ ॥ शेवटीं, आत्मस्वरूपाशीं युक्त होऊन आत्मज्ञानानें बुद्धीसह सर्व इंद्रियगणांचा उपशम करावा. तात्पर्य, गुणनाश करावा. याप्रमाणें निर्गुण झालेला जीव आपल्या सर्व जीवोपाधि टाकून देतो आणि मद्रूपाप्रत येतो ॥ ३५ ॥ कारण जीवत्व आणि गुणीपणा या दोन उपाधींनीं मुक्त झालेला जीव माझ्या ब्रह्मस्वरूपानें पूर्णत्व पावतो ॥ ३६ ॥

## पंचविसावा अध्याय समाप्त

———

# अध्याय २६ वा

श्रीभगवान् म्हणतात, बा उद्धवा ! मुक्ति देण्याला समर्थ असा हा नरदेह प्राप्त झाला असतां जो माझी भागवतधर्मोक्त एकनिष्ठ भक्ति करतो, त्या धन्य पुरुषाला त्याच्या अंतर्यामांत वसणारें माझें परमानंदस्वरूप प्राप्त होतें ॥ १ ॥ ज्ञानाच्या एकनिष्ठ अभ्यासानें त्याची त्रिगुणात्मक जीवोपाधि सुटते आणि दृश्यमात्र म्हणून मिथ्या असणाऱ्या त्रिगुणात्मक विश्वांत वागतांनाही तो मिथ्या गुणावर लुब्ध होत नाहीं. तो निःसंग राहतो. शिश्नोदरापलीकडे ज्यांस कांहीं साध्य नाहीं अशा नास्तिकांजवळ तो क्षणभर सुद्धां बसत नाहीं. आंधळ्याचा नेता आंधळाच असला म्हणजे तो जसा खाड्यांत पडतो, त्याप्रमाणें नास्तिकाच्या मार्गानें जाणारा जीव अंधतम लोकाप्रत जातो ॥ २-३ ॥

सुप्रसिध्द ऐल नामक चक्रवर्ति राजा उर्वशीच्या विरहानें मूढ झाला, पण पुढें शुद्धीवर येतांच विषयविरक्त होऊन त्यानें एक सुंदर गाथा गायिली ॥ ४ ॥

उर्वशी आपल्यास टाकून चालली, असें पाहून वेडा झालेला तो दिगंबर राजा 'हे प्रिये ! नको जाऊं' असें म्हणत व्याकुळ होत्साता नागवा उघडा तिच्या मागें धावत चालला ॥ ५ ॥ त्यानें अनेक वर्षें विषयोपभोग घेतला होता तरी त्याचें समाधान झालें नव्हतें. त्या उर्वशीचें वेड लागलेल्या त्या राजाला विषयसेवनांत कितीं वर्षे गेलीं याचें भानसुद्धां राहिलें नाहीं ! ॥ ६ ॥

तो ऐल राजा जेव्हां शुद्धीवर आला, तेव्हां म्हणूं लागला—उर्वशीनें माझ्या गळ्यांत हात टाकतांक्षणीं काममदानें मी इतका उन्मत्त झालों आणि माझा मोह इतका इतका वाढला कीं, माझ्या आयुष्याचा केवढा थोरला भाग नष्ट झाला याचें मला भान सुद्धां राहिलें नाहीं ॥ ७ ॥ त्या सुंदरीच्या मोहांत मग्न झालेल्या मला, रात्र केव्हां आली व दिवस केव्हां उजाडला याचें भानच राहिलें नव्हतें. अरेरे ! अशा या बेभान स्थितींत माझीं किती तरी वर्षें व्यर्थ गेलीं ! ॥ ८ ॥ मीं महामंडलेश्वर ! राजाचे मुकुट माझ्या पायीं लोळतात ! असा सार्वभौम राजा असतांहि यःकश्चित् बायकांचा क्रीडामृगच झालों होतो ! कोण जबरदस्त आत्म्याचा संमोह हा ? या मोहांचाच हा परिणाम ! ॥ ९ ॥ ऐश्वर्यसंपन्न सर्वप्रभु मी, परंतु मला कस्पटाप्रमाणें मानणाऱ्या त्या उर्वशीच्या मागे वेडा होऊन मी रडत रडत गेलों, मला वस्त्राचीही शुद्धि राहिली नव्हती ! ॥ १० ॥

लाथा खाणाऱ्या गर्धभाप्रमाणें बायकोच्या मागें धावणाऱ्या मला प्रभुत्व, तेज, ऐश्वर्य कोठून असणार ? माझें प्रभुत्वादि सर्व मातीमोल झालें ॥ ११ ॥ पुरुषाचें मन स्त्रियांनीं हरण केलें कीं तो वेडा होतो. आणि असें झालें म्हणजे त्याची प्रज्ञा, त्याचें तप, त्याचें वैराग्य, त्याचा वेदाभ्यास, त्याचा संन्यास, किंवा त्याचें मूकव्रत केवढेंही मोठें असो,

त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं ॥ १२ ॥ मीं चक्रवर्ति, ऐश्वर्यवान् असा असतांही, अबला स्त्रियांनीं ग्राम्यपशूंप्रमाणें मला स्ववश केलें ! असा जो मी मूर्ख त्या मला–मूर्खाला धिःकार असो ! मीं हितानहित जाणलें नाहीं, आणि स्वतःला मात्र मोठा शहाणा समजलों. माझ्या पांडित्याला धिःकार असो ! ॥ १३ ॥ अग्नीला आहुति कितीही दिल्या तरी अग्नीचें समाधान होत नाहीं त्याचप्रमाणें हजारों वर्षें उर्वशीचें अधरामृत मी प्यालों, तथापि माझ्या स्वयंभू कामाची शांति म्हणून झाली नाहीं ॥ १४ ॥ या वेश्येनें अपहृत करून बद्ध केलेलें माझें मन सोडविण्याला आतां एका आत्मारामाशिवाय दुसरा कोण समर्थ आहे ? तोच अधोक्षज भगवान् माझ्या मनाला विपयदास्यांतून सोडवील ॥ १५ ॥ देवी उर्वशीनें मला उत्तम उपदेश केला; परंतु व्यर्थ ! इंद्रियवश अशा मनांतील माझा मोह नष्ट झाला नाहीं ! ॥ १६ ॥

खरें म्हटलें तर ती देवी मुळींच अपराधी नव्हे. कारण दोरीलाच साप मानून व्याकुल झालेल्या अज्ञानी पुरुषाचा अपराध दोरी स्वतः कांहीं करीत नाहीं. मीच स्वतः इंद्रियांचा दास झालों म्हणून खरा गुन्हेगार होय ॥ १७ ॥ कोठें ही दुर्गंधीचें माहेरघर असणारी मळीण काया ? आणि कोठें सुगंधी व सुकुमार पुष्प ? कांहीं तरी संबंध ?, सौमनस्यादि गुणांचा मलिन कायेवर आरोप जीव करतात, त्याचें कारण त्यांची अविद्या. गुण नसतांनाहि त्यांची स्थापना करणें हेंच अज्ञान ! ॥ १८ ॥ तसेंच हा जो देह आहे तो खरा आपला, का आईबापांचा, का पत्नीचा, का अग्नीचा, का पशुपक्ष्यादिकांचा, का आपल्या आतेष्टांचा, हें कांहींच निश्चयानें सांगतां येत नाहीं ! ॥ १९ ॥ असल्या ह्या अपवित्र शरिराला मनुष्य सुरम्य मानतो व वेड्या आषकपणानें लुब्ध होतो हें केवढें आश्चर्यकर आहे ! ॥ २० ॥

त्वचा, मांस, रक्त, स्नायु, मेद, मज्जा व हाडकें या सात अमंगल पदार्थांनीं सिद्ध झालेल्या देहांत रमणारा पुरुष आणि मूत्रादिकांत आनंदानें लोळणारा किडा यांत काय अंतर आहे ? ॥ २१ ॥ यासाठीं स्त्री काय, स्त्रैण काय, यांची संगति मुळींच सोडावी. कारण भोग्याची ओळख इंद्रियांकरवीं झाली कीं मनच बिथरतें. दुसऱ्या कशानेंही नाहीं ॥ २२ ॥

विषय पाहिला नाहीं अथवा ऐकला नाहीं, तर मनांत विकार उत्पन्न होणेंच अशक्य असतें. यासाठीं इंद्रियें विवेकानें घट्ट बांधावीं म्हणजे मन शांत राहतें ॥ २३ ॥ स्त्रिया व स्त्रीलंपट पुरुष यांच्याशीं संबंध केव्हांही पडूं देऊंच नये. गोठमोठे मी मी म्हणणारे विद्वान् सुद्धां कामक्रोधादिकांच्या जाळ्यांत अडकतात, मग माझ्यासारख्या अज्ञान्याची कथा काय ? तात्पर्य, विषयसंग नको ॥ २४ ॥

श्रीभगवान् म्हणतात, याप्रमाणें सुंदर गीत गाऊन त्या चक्रवर्ति ऐल राजानें उर्वशीचा लोक टाकून दिला आणि आपला जो आत्मा तोच मी परमात्मा आहें, असें जाणता झाला. अर्थात् त्याचा अज्ञानजन्य शोकमोह नष्ट झाला आणि तो निःसंग

होऊन मुक्त झाला ॥ २५ ॥ याकरितां बुद्धिवंतानें नेहमीं सत्संगति धरावी. मनाला स्वभावतः प्राप्त होणारी विषयासक्ति असते, तिचा आपल्या सदुपदेशानें नाश करण्याला संतच काय ते समर्थ असतात ॥ २६ ॥ ते संत निःस्पृह, भगवत्पर, विनम्र, समदृष्टि, ममता व अहंकार नसलेले, सुखदुःखाविषयीं उदासीन आणि पक्के विरक्त असतात ॥ २७ ॥ उद्धवा ! अशा पुण्यशीलाची नुसती संगति सुद्धां उपकारक असते. संतमंडळींत माझ्याच कथा अवतीर्ण होतात आणि त्या श्रोत्यांचें सर्व पातक नाहींसें करतात ॥ २८ ॥

ह्या माझ्या वंद्य कथा आदरानें ऐकणें, गाणें, त्यांस मान डोलाविणें, मत्पर असून श्रद्धा ठेवणें, हें जे कोणी करतात त्यांसच माझी पराभक्ति प्राप्त होते ॥ २९ ॥ माझ्या सगुण आणि निर्गुण स्वरूपावर ज्यानें ज्ञानयुक्त भक्ति संपादिली, त्याला आणखी कांहीं संपादण्याचें उरतच नाहीं ॥ ३० ॥ अग्नि जसा आश्रितांच्या शीतभयादिकांचा नाश करतो त्याप्रमाणें साधुसेवा ही सर्व भयांचा निरास करते ॥ ३१ ॥

पाण्यांत बुडणाऱ्यांस बळकट नावेचा आश्रय तारक होतो. तद्वत् ब्रह्मज्ञ, शांत संतांचा आश्रय—भवसागरांतील उत्तमाधम योनींत जन्ममरणांचें दुःख अनुभवणाऱ्या जीवांना—तारक होतो ॥ ३२ ॥ भुकेल्या प्राण्यांस अन्न, दीनांसाठीं आणि मेलेल्यास धर्म हेंच जीवन असतें, तसें संसारभीतांचें संत हेंच तारक-साधन आहे ॥ ३३ ॥ सूर्य एक प्रकारचेंच ज्ञान देण्याला उपकारक होतो. पण संत अनेक प्रकारचीं ज्ञानसाधनें निर्माण करून शिष्याला ज्ञानविज्ञानसंपन्न करतात. तस्मात् इष्ट मित्र, प्रत्यक्ष आत्मा व परमात्मा हे सर्व संत होत ॥ ३४ ॥ त्याप्रमाणें सर्व विषयवासना निर्मुक्त झालेला वीतसेनेचा पुत्र पुरूरवा निःसंग झाला, आत्माराम, आत्मक्रीड झाला आणि पृथ्वीवर यथेष्ट भ्रमण करिता झाला ॥ ३५ ॥

**सव्विसावा अध्याय समाप्त**



# अध्याय २७ वा

उद्धव विनयपूर्वक म्हणाला, हे परमेश्वरा ! तुझें आराधन करणें हें जें कर्म आहे, त्याचा योग–आराधनविधि कसा तो मला समग्र सांग. यादवश्रेष्ठा ! तुझें आराधन तुझे भक्त कां व कसें करतात, तें मला ऐकूं दे ॥ १ ॥ नारद, श्रीव्यास, अंगिरसाचा पुत्र श्रीबृहस्पति आचार्य हे मुनि बारंवार सांगत आले आहेत कीं, तुझी पूजा यथासांग करणें हें मोक्ष मिळविण्याचें उत्तम साधन जीवास उपलब्ध झालें आहे ॥२॥ भृगुप्रमुख सर्व पुत्रांस ब्रह्मदेवानें जें सांगितलें, शंकरांनीं पार्वतीदेवीस जो उपदेश केला, तें सर्व तूं स्वतःच स्वमुखानें प्रथम प्रकट केलें आहेस ॥३॥ हेंच तुझें पूजा–विधान ब्राह्मणादि तिन्ही वर्णांस, स्त्रियांस व शूद्रांस मान्य असून पुनः मोक्ष देणाऱ्या साधनांत उत्तम आहे ॥ ४ ॥ म्हणून हे कमलनेत्र देवाधिदेवा, हे कर्माचें जाळें तोडून टाकणारें तुझें पूजाविधान मला सांग. मी तुझा निःसीम भक्त व अनुयायी आहें ॥ ५ ॥

श्रीभगवान म्हणतात, उद्धवा ! हें पूजा-विधान अनंत असून अपार आहे. तथापि क्रमाक्रमानें पण संक्षिप्तरूपानें तें मी तुला सांगतों. हा संक्षेप माझ्या पूजाविधानाचें यथार्थ सारसर्वस्व होय ॥ ६ ॥ उद्धवा ! माझी पूजा तीन प्रकारांनीं करतां येते. वैदिक, तांत्रिक व उभयमिश्रित, असे ते प्रकार होत. यांपैकीं जो इष्ट व शक्य वाटेल तो [illegible] ते प्रकार स्वीकारून माझें पूजन यथासांग करावें ॥ ७ ॥ पुरुषाची मुंज होऊन तो द्विज झाला म्हणजे त्यानें भक्तिश्रद्धापूर्वक माझें पूजन कसें करावें, तें आतां सांगतों ऐक ॥ ८ ॥

मी जो प्रत्येक जीवाचा उद्धार करणारा गुरु, त्या माझी स्थापना मूर्तीमध्यें अथवा इतर कोणत्याही पवित्र स्थळीं ( म्हणजे स्थंडिल, अग्नि, सूर्य, जल, हृदय, ब्राह्मणादि यांत ) करून माझी पूजा भक्तिपूर्वक व वित्तशाठ्य वगैरे न करतां यथामिलित द्रव्यांनीं करावी ॥ ९ ॥ दांत वगैरे घासून व स्नान करून देह शुद्ध करावा. माती, भस्म इत्यादि घेऊन अंग स्वच्छ करतांना जे वेदानें व तंत्रशास्त्रानें मंत्र विहित केले आहेत, ते म्हणावे ॥ १० ॥ याप्रमाणें स्नान केल्यानंतर वेदविहित संध्या, ब्रह्मयज्ञ इत्यादि जीं नित्य कर्में तीं करावीं आणि कर्मांचा बंध तोडणारी जी माझी पवित्र पूजा ती वेदविहित सत्संकल्पपूर्वक करावी ॥ ११ ॥ माझी प्रतिमा ( मूर्ति ) आठ प्रकारांनीं सिद्ध करतां येते. सुवर्णादि, दगड, माती, लांकूड, चित्राचा कागद, वाळू, रत्न व अंतःकरणांतील मन यांपैकीं कोणत्याही द्रव्याची मूर्ति असली तरी चालते ॥ १२ ॥

उद्धवा, जीवाचा उद्धार करणारें देवालय म्हणजे प्रतिमा होय. हीं प्रतिमा चल अथवा अचल असते. अचल मूर्तीचें आवाहन व विसर्जन करूं नये ॥ १३ ॥ चल

मूर्तीला आवाहन-विसर्जन करणें न करणें भक्ताच्या मर्जीवर आहे. यज्ञकुंडीं आवाहन-विसर्जन हे मंत्रोक्त विधि अवश्य करावे. मातीची मूर्ति किंवा चंदनादिकांनीं चितारलेली चित्रमूर्ति ह्यांखेरीज इतर पाषाणादिकांच्या मूर्तीस स्नान घालावें. मातीच्या मूर्तीला व काढलेल्या चित्राला फक्त मार्जन करावें ॥ १४ ॥ गंधपुष्पादि यथाप्राप्त मंगल द्रव्यांनीं पूजकानें निष्कपट होऊन माझें प्रतिमादि रूपांनीं पूजन करावें. तसेंच अंतःकरणपूर्वक मानसपूजा करावी ॥ १५ ॥

उद्धवा ! स्नान, अलंकार हे उपचार मूर्तीच्या ( माझ्या ) रूपांत मात्र मला फार आवडतात. यज्ञकुंडांत माझें सांगोपाग पूजन समंत्रक मात्र असावें. अग्नीच्या रूपांत मला घृतपूर्वक आहुति द्याव्या. हे मला प्रिय आहे. ॥१६॥ मत्स्वरूप सूर्याला अर्घ्यप्रदान व उपस्थान आणि जलांत तर्पण हें पूजन मला आवडते. माझ्या भक्तानें मला पाणी जरी अर्पिलें तरी तें मला अति प्रिय वाटतें ॥१७॥ पण अभक्तानें मोठे मोलवान् पदार्थ मला दिले तरी ते असमाधानकारक होतात. आतां नुसत्या भक्तार्पित जलावरही संतुष्ट होणाऱ्या माझी माझ्या श्रद्धाळू भक्तानें गंधादि षोडशोपचारें पूजा केली तर मला संतोष होतो, हें सांगणें नकोच. ॥१८॥ अंतर्बाह्य शुद्ध होऊन, पूजासामग्री मिळवून, दर्भासन घालून पूजकानें पूर्वेकडे अथवा उत्तरेकडे तोंड करून पूजेस बसावें. मूर्तिच असेल तर तिच्या सन्मुख आसनस्थ व्हावें ॥१९॥

उद्धवा, सहा प्रकारचे न्यास करून मूल मंत्रानें संस्कृत केलेल्या माझ्या मूर्तीला निर्मळ करावी, व प्रोक्षणीपात्रें, कलशादि पात्रें यथाशास्त्र सिद्ध करावीं. ॥ २० ॥ कलशांतील जलानें पूजास्थान, पूजासाहित्य व आपला देह ह्यांस पूजकानें प्रोक्षावें. पाद्यपात्र, अर्घ्यपात्र व आचमनपात्र हीं शास्त्रोक्त द्रव्यांनीं सिद्ध असावीं ॥ २१ ॥ हीं तीन पात्रें पूजकानें अनुक्रमें हृदय, शीर्ष, शिखा या मंत्रांनीं व सर्व पूजासाहित्य गायत्रीमंत्रानें संस्कारावें ॥ २२ ॥ नंतर वायु व अग्नि यांनीं शुद्ध केलेल्या शरीराच्या आंत म्हणजे पूजकाच्या हृदयांत जी अतिशुद्ध, सूक्ष्म व योगी सिद्धानीं ध्यानांत धरलेली माझी जीवकला नादाच्याही पलीकडे आहे, तिचें ध्यान करावें ॥ २३ ॥ ध्यानामुळें पूजकाच्या शरिराला व्यापणाऱ्या जीवकलेला तन्मय पूजकानें आमंत्रून तिची मानसपूजा करावी आणि मग तिची मूर्तीत न्यासांसह स्थापना करून ती सांगोपांग पूजावी ॥ २४ ॥

उद्धवा, धर्मादि नऊ मंत्रानीं माझें आसन, सिद्ध करून मला पाद्य, आचमन, अर्घ्यप्रभृति उपचार करावे. आसन, पाद्य, आचमनप्रभृति उपचारांनीं आर्य गृहस्थ अतिथींचा सत्कार करतो ॥ २५ ॥ असो. याप्रमाणें मजकरितां सिद्ध केलेल्या त्या आसनावर आठ पाकळ्यांचें कमल काढावें, त्याला कर्णिका, केसर यांनीं उज्वल करावें. नंतर ह्या जगांत उत्कर्ष व्हावा व परलोकीं आत्यंतिक सुख मिळावें एतदर्थ माझी वेदोक्त व

तंत्रोक्त मंत्रांनीं पूजा करावी ॥२६॥ सुदर्शन, पांचजन्य, गदा, खड्ग, तीर, धनुष्य, नांगर व मुसळ या माझ्या आठ आयुधांची पूजा व कौस्तुक, वनमाला, श्रीवत्स या भूषणांचीही पूजा मग करावी ॥२७॥

नंद, सुनंद प्रचंड, चंड, महाबल, बल, कुमुद आणि कुमुदेक्षण हे आठ माझे पार्षद—अनुयायी होत. यांची व दुर्गा, विनायक, व्यास, विष्वक्सेन, गुरु व देव यांची व गरुडाची त्यांच्या त्यांच्या स्थानीं स्थापना करून यथासांग पूजा करावी ॥ २८ ॥ ॥ २९ ॥ म्हणजे शक्य असेल तर नित्यशः चंदन, वाळा, कापूर, केशर, अगुरु या सुवासिक द्रव्यांनीं सुगंधित जलानें प्रथमतः मला व माझ्या आयुधादिकांस स्नान घालावें ॥ ३० ॥ आपस्तंब शाखेतील 'सुवर्णधर्मानुवाक' किंवा पुरुषसूक्त व 'इंद्रं नरो' इत्यादि सामगायनाचा मंत्र म्हणून मला स्नान घालावें ॥ ३१ ॥ नेसण्या-पांघरण्याचीं वस्त्रें, जानवें, अलंकार, मुद्रा, माळा, गंध, उटी मला देऊन यथायोग्य पद्धतीनें भक्तानें माझें पूजन करावें ॥ ३२ ॥

तसेंच पाद्य, आचमन, गंध, फुलें, अक्षता, धूप, दीप, नैवेद्य इत्यादि षोडशोपचारात्मक पूजा मला अर्पावी ॥ ३३ ॥ नैवेद्यांत यथाशक्ति गूळ, क्षीर, तूप, करंज्या, पुऱ्या, मोदक, सांजोऱ्या, दहीं व रुचकर व्यंजक पदार्थ असावे ॥ ३४ ॥ सुवासिक तेलांचें मर्दन, आरशाचें दर्शन, दंतधावन, अभिषेक, भक्ष्यभोज्यसमर्पण, गीत—नर्तन, हे सर्व उपचार नित्य—निदान पर्वणीच्या दिवशीं तरी—करावे ॥ ३५ ॥ उद्धवा, आतां अग्निपूजेचा विधि सांगतों. मेखला, गर्ता, वेदी हें सर्व शास्त्रोक्त संपादून सिद्ध केलेल्या यज्ञकुंडांत अग्निस्थापना करावी आणि तो पेटल्यावर हातानें उदक शिंपडून एकत्र करावा ॥ ३६ ॥ नंतर दर्भ पसरून प्रोक्षावे. मग आज्यस्थाली, व्याहृतिपूर्वक समिधा यांनीं अन्वाधान यथाविधि करावें. होमद्रव्यें एकत्र करून प्रोक्षावीं आणि मग अग्निस्वरूपांत "तप्त सुवर्णाप्रमाणें उज्वल, चारी हातांत शंख, चक्र, गदा व कमळ या आयुधांनीं सुशोभित, पीतांबरधारी व शांत" असें माझें ध्यान करावें ॥ ३७, ३८ ॥

दैदीप्यमान मुकुट, पोची, कडदोरा, कडीतोडे या सुवर्णालंकारांनीं व श्रीवत्स, कौस्तुभ, वनमाला यांनीं भूषित असें मत्स्वरूपाचें ध्यान करावें ॥ ३९ ॥ याप्रमाणें ध्यान करून ( व करीत असतां ) शहाण्या साधकानें अष्टांगांची पूजा करून घृतानें भिजलेल्या शुष्क समिधा अग्नींत प्रक्षेपाव्या; आज्यभागाच्या दोन व आघाराच्या दोन अशा चार आहुति देऊन घृतपूर्ण होमद्रव्य अग्नींत होमावें. या वेळीं 'ॐ नमो वासुदेवाय' हा मूलमंत्र म्हणावा. पुरुषसूक्ताच्या १६ ऋचांनीं सोळा अवदानें मागें उल्लिखिलेल्या 'धर्मादिकांस' समंत्रक द्यावीं आणि शेवटीं 'स्विष्टकृत' मंत्रपूर्वक आहुति द्यावी ॥ ४० ॥ ४१ ॥

नंतर गंधपुष्पादिकांनीं अग्निपूजा झाल्यानंतर अग्निदेवतारूप जो मी त्या मला नमस्कार करावा. पुढें पार्षदांस बली द्यावे. पूजा चालली असतां व नंतर श्रीनारायणाचे

स्वरूपाकडे ध्यान ठेवून 'ॐ नमो वासुदेवाय' या मूलमंत्राचा जप करीत असावें ॥ ४२ ॥ मग आचमन देण्याचा विधि करून शेषनैवेद्य विष्वक्सेनाला निवेदावा. नंतर विडा वगैरे सुवासिक मुखशुद्धि देवाला अर्पून मंत्रपुष्पांजलीचा विधि करावा ॥ ४३ ॥ मग गायन, नर्तनादि करावें. माझ्या लीला आचराव्या, हरिकथा सांगाव्या व ऐकाव्या. हें झाल्यावर घटकाभर निश्चित मनानें ध्यानस्थ बसावें ॥ ४४ ॥ पुराणांतील किंवा प्रचलित असणारीं प्राकृत स्तोत्रें वगैरे मोठ्यांदा गर्जून म्हणावीं. नंतर स्तुति करावी आणि परमेश्वरमूर्तीचे दोन्ही चरण आपल्या दोन्ही हातांत अवलंबून आपलें मस्तक मूर्तीच्या पायांवर ठेवावें. साष्टांग दंडवत ( नमस्कार ) करावा; आणि ' दयाघना ! भवसागरांत बावरणाऱ्या मृत्यूला भिऊन मी तुला शरण आलों आहें, प्रसन्न हो, माझें संतारण कर !' अशी प्रार्थना मनोभावानें करावी. याप्रमाणें यथोक्त पूजा आटोपल्यावर पूजकानें मीं दिलेला निर्माल्य मोठ्या भक्तिपूर्वक आदरानें आपल्या मस्तकावर ठेवावा. नंतर मूर्तीतील देवाचें विसर्जन करावयाचें असेलच तर ती देवज्योति मुख्य चिज्ज्योतींत विसर्जावी ॥ ४५–४७ ॥

मूर्ति असो, अग्नि असो, जेथें जशी श्रद्धा असेल, तेथें तसें माझें पूजन करावें. अधिष्ठानांत उच्चनीच भेद नाहीं. कारण मी सर्वात्मा आहें. माझें वास्तव्य सर्वत्र सर्वकाळीं असतें. पूजकाच्या हृदयांतही मी असतों ॥ ४८ ॥

याप्रमाणें वेदोक्त व तंत्रोक्त पूजा यथासांग केली असतां इहपरलोकींचे सर्व मनोरथ पूर्ण होतात ॥ ४९ ॥ माझ्या मूर्तीची स्थापना उत्तम व टिकाऊ मंदिरांत करावी. फुलांसाठीं बागा कराव्या आणि नित्याचे व पर्वणीचे पूजादि समारंभ अखंडकालपर्यंत टिकण्यासाठीं जमिनी, गांवें, नगरें, पेठा, वगैरे इनाम द्यावीं. अशा दात्या मद्भक्ताला माझें ऐश्वर्य मिळतें ॥ ५० ॥ ५१ ॥

मूर्ति स्थापणाराला सार्वभौम राज्य, मंदिर बांधणाराला त्रैलोक्याचें राज्य आणि पूजकाला ब्रह्मदेवाचा लोक, असें फल मिळतें. मूर्तिस्थापकच मंदिर बांधणारा व पूजक असेल तर त्याला ' सरूपता मुक्ति ' मिळते ॥ ५२ ॥ निष्काम भक्तालाच ( कांहीं न मागणाऱ्या भक्तालाच ) उपरिनिर्दिष्ट शास्त्रोक्त निष्काम पूजेनें मात्र खरा श्रेष्ठ भक्तियोग साध्य होतो व तो मत्स्वरूप म्हणजे परमात्मरूप होतो ॥ ५३ ॥ पण जो देवब्राह्मणाला आपण किंवा इतरांनीं दिलेली वृत्ति काढून घेतो, तो किडा होऊन लाखों वर्षें रौरव नरकांत खितपत पडतो ॥ ५४ ॥ उद्धवा ! कर्मकर्त्याला जें फल तेंच सर्व प्रकारच्या म्हणजे प्रेरक–अनुमोदकप्रभृति साहाय्यकर्त्यांस मिळतें. जितकें साहाय्य अधिक, तेवढें परलोकीं फलही अधिकच असतें ॥ ५५ ॥

## सत्ताविसावा अध्याय समाप्त

---

# अध्याय २८ वा

प्रकृति अथवा पुरुष एक आहे, म्हणून सर्व दृश्य विश्व एकस्वरूपीच आहे, असें ज्ञान असणाऱ्यानें दुसऱ्याच्या स्वभावाची म्हणजे स्वभावजन्य गुणाची अथवा गुणजन्य कर्माची स्तुति वा निंदा करणें अज्ञानात्मक आहे ॥ १ ॥ कारण, दुसऱ्याच्या गुणकर्मांची निंदास्तुति करणें म्हणजे जें वस्तुतः मुळींच नाहीं, त्याचा 'सत्य' म्हणून अभिमान धरणें होय. अशा प्रकारचा अभिमान धरण्याच्या योगें ज्ञान्याच्या स्वार्थाचा म्हणजे ज्ञाननिष्ठेचा, अर्थात् मोक्षाचा नाशच होतो ! ॥ २ ॥ पाहा कीं, नेत्रकर्णादि इंद्रियगण कर्मशून्य होऊन लीन झाल्यावर देहांतील जीव चेतनाशून्यच होतो व तो स्वप्नसृष्टींत शिरून मनोमात्रनिर्मित वस्तु पाहतो म्हणजे मायानिर्मित्त पाहतो व पुढें गाढ निद्रेंत तरी शिरतो अथवा मृत्युवश होतो. म्हणून आहे तेंही पाहण्याला असमर्थ होतो. तसाच नसत्या गुणकर्मांची निंदास्तुति करणारा जें मुळींच नाहीं तें पाहतो आणि जें आत्मतत्त्व एकच आहे, तें पाहत नाहीं. तात्पर्य, तो अज्ञानवश होतो, स्वार्थभ्रष्ट होतो ॥ ३ ॥ परमार्थतः जें द्वैत मुळींच नाहीं, त्या शून्य स्वरूपांत चांगलें काय असणार अथवा वाईट तरी काय असणार ? किंवा कितीसें शुभ वा अशुभ असणार ? वाणीनेंच सशब्द झालेलें वा मनानें कल्पिलेलें सर्व अनृत म्हणजे असत्य असतें ॥ ४ ॥

हे आभास जरी प्रतिबिंब, प्रतिध्वनि अथवा मृगजलासारखे मिथ्या असतात, तरी ते सुखदुःखादि कार्यें करण्यास समर्थ असतात. याचप्रमाणें जीवाला जो शरीरीपणा वगैरे येतो, तो मिथ्या आहे, तरी जावत्काल शरीरादि मिथ्या उपाधि आहेत तावत्काल जीवाचा देह भयकंपादि उत्पन्न करतोच ॥ ५ ॥

हें सर्व अंतर्बाह्य दृश्य विश्व आत्माच आपण होतो. ह्या विश्वाचा स्रष्टा तोच, पालक तोच, व संहारकर्ता तोच आहे. तो आपणच आपल्यास विश्वरूपानें उत्पन्न करतो, पालन करतो आणि संहार करतो. तात्पर्य, विश्वाचें उपादान कारणही तोच होय ॥ ६ ॥ त्या ह्या आत्म्याहून अर्थात् त्यानेंच उत्पन्न केलेल्या, आपणच स्वतः असलेल्या विश्वाहून (आत्म्याहून) दुसऱ्या पदार्थांचें निरूपणच करितां येत नाहीं. दुसऱ्या कशाचीही व्यवस्थित रीतीनें स्वरूपता सांगतां येणें शक्य नाहीं. आणि निरूपण केलेंच तर तें निरूपण म्हणजे आत्म्यावर भासणारी भौतिक, दैविक अथवा आध्यात्मिक निर्मूळ (निष्कारण) भ्रांति होय. हें त्रिविध विश्व गुणमय मात्र आहे. जीवाला भासणाऱ्या गुणांच्या पलीकडे कांहीं नाहीं. आणि हें त्रिगुणात्मक विश्व तीन प्रकारचें दिसतें, तें मायेमुळें होय ॥ ७ ॥ उद्धवा ! हें जें मी तुला ज्ञानविज्ञानाचें यथार्थ निरूपण केलें त्यांत निपुण असलेला परमार्थज्ञानी 'सर्वच मिथ्या' असें समजतो. तो कशाची निंदा करीत नाहीं व स्तुतिही करीत

नाहीं. सूर्य जसा आवडनिवड न करितां सर्वांस प्रकाशितो, त्याप्रमाणें ज्ञानी सर्वदा सम-भावानें वागतो ॥ ८ ॥ म्हणून प्रत्यक्ष, अनुमान, शब्द व अनुभव, या सर्व प्रमाणांच्या साहाय्यानें हें सर्व दृश्य जन्ममरणात्मक आहे, असत् म्हणजे मिथ्या आहे, असें समजून घेऊन साधकानें निःसंग होऊन राहावें, कोठेंही आसक्ति न ठेवतां जगांत वागावें ॥ ९ ॥

उद्धव म्हणाला, देवा ! आत्म्याला संसार असणें शक्य नाहीं, तसाच जड देहालाही संसार असणें शक्य नाहीं. कारण, आत्मा द्रष्टा व स्वयंप्रकाश असतो व देह दृश्य व अनात्मक म्हणजे जडरूप असतो. निःसंग आत्म्याला व अज्ञानी जडाला सुख-दुःख होणें शक्यच नाहीं आणि संसार व तज्जन्य सुखदुःख तर आहेसें दिसतें. हा काय चमत्कार ? ॥१०॥ वस्तुतः आत्मा स्वरूपतः अक्षर म्हणजे निर्विकार, निर्गुण, स्वच्छ, स्वप्रकाश आणि आवरण नसणारा म्हणजे उघडा, अग्नीप्रमाणें आहे. तेव्हां त्याला संसार कसा प्राप्त व्हावा ? आणि देह तर लांकडाप्रमाणे जड आहे, त्याला सुखदुःखाचें भान कसें व्हावें ? अर्थात् आत्मा व देह जर संसारी असणें शक्यच नाहीं, तर संसार कोणाला ? ॥११॥

श्रीभगवान म्हणतात, उद्धवा ! हा संसार अज्ञानी पुरुषाला असतो. जोंपर्यंत देह-इंद्रियें व प्राण यांच्याशीं आत्मा संबद्ध आहे, असें अज्ञानी पुरुषाला वाटतें, तोंपर्यं वस्तुतः असत् असणारा असा हा संसार, त्या अज्ञानी पुरुषाला, सुखदुःख देणारा जन्ममरण आणण्याला कारणीभूत होणारा आहे, अशी भ्रांति असते ॥१२॥ बाबा ! नसणारे पदार्थच स्वप्नस्थ पुरुषाला दिसून सुखदुःखाला कारण होतात, त्याप्रमाणें विषयांचें अहोरात्र चिंतन करणाऱ्या अज्ञानी पुरुषाला नसणाराही संसार आहे असें वाटतें; म्हणजे सुखदुःख देणारे पदार्थ वस्तुतः नसूनही केवळ अज्ञानामुळें ते असत् पदार्थच अज्ञान्याच्या सुखदुःखाला कारण होतात. तात्पर्य, त्याचा संसार संपत नाहीं ॥१३॥

जागृतावस्थेंत नसणाऱ्या स्वप्नस्थ पुरुषाला स्वप्नांत दिसणाऱ्या पदार्थांपासून अनेक सुखदुःखादि होतात हें प्रसिद्ध आहे पण तेंच स्वप्न व तींच स्वप्नगत सुखदुःखें जाग्या माणसाला मोह उत्पन्न करीत नाहींत. याचप्रमाणें नसणारा संसार अज्ञान्याला सुखदुःख देतो व ज्ञानी पुरुष सुखदुःखविरहित असतो ॥१४॥ शोक, हर्ष, भय, क्रोध, लोभ, मोह, स्पृहा ( मत्सर ) प्रभृति सर्व व जन्म आणि मृत्यु हे अहंकाराशीं संबद्ध असतात. ते अहंकाराचे धर्म होत, आत्म्याचे नव्हत ॥१५॥ देहादिकांनीं आवृत होऊन देह, इंद्रियें, प्राण व मन यांच्या ठिकाणींच अहंत्वाचा अभिमान ठेवणारा आत्मा जीवदशेला प्राप्त होतो आणि सत्त्वादि गुण व गुणानुसारी कर्म यांची तो मूर्ति होतो. या जीवदशेला प्राप्त झालेल्या आत्म्यालाच ‘ सूत्रात्मा ’ ‘ महान आत्मा ’ इत्यादि अनेक नांवें उपाधिअनुसार मिळतात आणि हाच ‘ जीव ’ कालाधीन होत्साता सर्व प्रकारच्या

संसारांत भ्रमण करीत राहतो ।।१६।। याप्रमाणें वस्तुतः निर्मूळ असणारें पण मन, वाणी, प्राण, शरीरप्रभृति स्वरूपांनीं प्रकट होणारें अहंकारकृत जीवकर्म असतें. हा भ्रांतिकृत चमत्काराचा संबंधरूपी वृक्ष, तीक्ष्ण ज्ञानशस्त्रानें व दृढ उपासनेनें सर्वच्या सर्व कापून काढून ज्ञानी भक्त असणारा विरक्त निःस्पृह वृत्तीनें याच जगांत पूर्वीसारखा बावरतो; मात्र तो बद्ध होत नाहीं. ।।१७।। कारण विवेकतः त्याला आपलें स्वरूप वेदाध्ययनानें, तपश्चर्येनें व प्रत्यक्ष–अनुमान–इतिहास इत्यादि प्रमाणांनीं कळलेलें असतें. तो निःसंदेहतः जाणतो कीं, या दृश्य विश्वाच्या आधीं व विश्वाचा अंत झाल्यावर जें प्रकाशात्मक व कारणात्मक विश्वस्वरूप असतें, तेंच मात्र स्वरूप मध्यें म्हणजे व्यवहार-काळीं परमार्थतः असतें ।।१८।। उदाहरणार्थ, सोन्याचे अलंकार करण्यापूर्वी व अलंकार मोडल्यावर जसें केवळ सोनें मात्र असतें, तसेंच अलंकाराच्या अवस्थेमध्येंही सोनेंच असतें. याचप्रमाणें विश्वाच्या उत्पत्तीपूर्वी व विश्वाचा अंत झाल्यावर जें विश्वप्रकाशक व विश्वकारण ब्रह्म असतें, तेंच ब्रह्म विश्वाच्या व्यवहारकाळीं अनेक नामें धारण करणारें पण स्वरूपतः ब्रह्म असणारें तत्त्व विद्यमान असतें ।।१९।।

उद्धवा ! वेदांतशास्त्रांत जी समन्वय-व्यतिरेक पद्धति आहे, त्या पद्धतीनें पाहिलें असतां जें तुर्य म्हणजे शुद्धब्रह्म–जीवाच्या तिन्ही जागृत्यादि अवस्थांचा अनुभव घेणाऱ्या मनाला, या तीन अवस्था उत्पन्न करणाऱ्या सत्त्वादि तीन गुणांना आणि अध्यात्म, अधिभूत व अधिदैव जगाला प्रकाशित करतें–तें शुद्धब्रह्म मात्र सत्य आहे ।।२०।। जें उत्पन्न होण्या-पूर्वी नसतें व नष्ट झाल्यावरही नसतें. वर्तमानकाळीं मात्र असतें तें केवळ नामरूप मात्र असतें, वस्तुतः नसतें. खरेंच आहे. ज्याची उत्पत्ति दुसऱ्याकडून होते व ज्याचें अस्तित्व व प्रकाश्यत्व दुसऱ्यावर अवलंबून असते, तें वस्तुतः अन्यरूप म्हणजे कारणरूपच असतें ।।२१।। वस्तुतः नसूनही ज्याची प्रतीति येते, तो हा सर्व कार्यसमूह रजोगुणानें उत्पन्न झाला आहे. ब्रह्म मात्र स्वयंसिद्ध, स्वयंभुव, सर्वप्रकाशक आहे. म्हणून जीवांचीं विषय घेणारीं नेत्र–हस्तादि इंद्रियें, सर्व ग्राह्य तन्मात्रा, संकल्पविनिश्चयात्मक अंतःकरण आणि सर्व विकार ( कार्यें ) या चित्रविचित्र रूपांनीं ब्रह्मच अवभासतें ।।२२।। याप्रमाणें ब्रह्माचा व दृश्यांचा भेद स्पष्ट करणाऱ्या प्रत्यक्षादि प्रमाणांनीं व अनात्म वस्तूंचा समूळ निरास करणाऱ्या खंडनानें आत्मसंबंधी सर्व संशय उखणून काढावे आणि सर्व इंद्रियांचा व विषयवासनांचा त्याग करून आत्मानंदांतच राहावें ।।२३।। आपलें शरीर पार्थिव—पंचभूतांचा संघात म्हणून आत्मा नव्हे; त्याचप्रमाणें करणें म्हणून इंद्रियें व त्यांच्या देवता आत्मा नव्हत. भू, जल, तेज, समीर व ख, हीं पंचमहाभूतें म्हणून आत्मा नव्हत. प्राण, मन, बुद्धि, चित्त व अहंकार अन्नाच्या समागमानें वाढणारीं व अपगमनानें क्षीण होणारीं म्हणून आत्मा नव्हत, आणि प्रकृतींत गुणसाम्य असतें म्हणून तीही आत्मा नव्हे ।।२४।। आत्मस्वरूपाच्या ज्ञानविज्ञानानें जो स्वलंकृत झाला, त्याचीं गुणात्मक इंद्रियें स्थिर झालीं म्हणून त्याला कांहीं लाभ होत नाहीं, वा विक्षिप्त झालीं तरी त्याची हानि होत

नाहीं. खरेंच आहे. ढग आले गेले म्हणून सूर्याच्या तेजांत कमीअधिकपणा होतो काय ? नाहीं ॥२५॥

येणारे जाणारे ऋतूंच्या शीतोष्णादिकांनीं व महाभूतांच्या नित्य गुणांनीं आकाश केव्हांही विकृत होत नाहीं, त्याप्रमाणेंच अहंवृत्तीहून अत्यंत श्रेष्ठ असणाऱ्या ब्रह्माला संसारोत्पादक स्थिर व चंचल सत्त्वादि गुणांचा यत्किंचितूही स्पर्श होत नाहीं, तें ब्रह्म सर्वदा अविकृतच राहतें ॥२६॥ तथापि, जावत्काल परमेश्वराच्या एकनिष्ठ भक्तीनें मनाचें मालिन्य व विषयासक्ति निरस्त होत आहे तोंपर्यंत, म्हणजे मन निर्मळ व विषयविरक्त झालें नाहीं तोंपर्यंत, मायोत्पादित विषयांचा संग टाकून देणें हा उत्तम मार्ग होय ॥२७॥ रोगाची योग्य परीक्षा न झाल्यामुळें जीवांस असलेला रोग वाढत जाऊन त्यांस पुनः पुनः त्रास देतो, त्याप्रमाणें मनाचा मळ सर्वांशीं धुऊन न गेल्यामुळें तें कर्मासक्त मन विषयसंग सोडीत नाहीं. सारांश, अर्धवट योग्याला तें मन फारच त्रास देतें ॥२८॥ देव, मनुष्यें व महाभूतें यांनीं निर्माण केलेल्या विघ्नांमुळें ज्यांचा योगाभ्यास अपूर्णच राहिला, ते योगी पुढील जन्मीं पूर्वीचा योगाभ्यासच दृढ करतात; ते फलोत्पादक कर्माच्या भानगडींत पडत नाहींत ॥२९॥ कोणत्या तरी पूर्वजन्मार्जित प्रारब्धसंस्कारानें प्रेरित होऊन जन्मभर जीव कर्म करतो आणि त्या त्या-कर्मानें विकृत होतो. ही सामान्य प्राण्याची कहाणी झाली; परंतु विद्वान् मनुष्याचा प्रकार निराळा होतो. तो या दृश्य जगांत राहिलेला असतो, तरी तो आशाशून्य असल्यामुळें व स्वानंदाचा अनुभव घेत असल्यामुळें, त्याला कर्मविपाकाची बाधा होत नाहीं ॥३०॥ अन्नग्रहण, मलोत्सर्गादि अथवा श्रवणदर्शनादि कर्में करणाऱ्या म्हणजे सर्व प्रकारचीं कर्में करणाऱ्या स्वतःच्या देहाचीही त्याला खबर नसते ॥३१॥

शिवाय, जरी त्याला रूप, शब्द, इत्यादि मिथ्या विषय प्रत्यक्ष दिसतात, अनुभवास येतात, तथापि ते अनेक व अनेक प्रकारचे असतात म्हणून ते असत्च ठरतात, हें शुद्ध अनुमान तो करतो. अर्थात् आत्मवस्तुव्यतिरिक्त सर्व अवास्तविक, मिथ्या आहे, असा त्या विद्वानाचा निश्चय होतो. स्वप्नांतून उठून जागृत झालेल्या पुरुषाचे स्वप्नांतील हत्ती, घोडे जसे स्वभावतःच नाहींसे होतात, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाचे अज्ञानावस्थेंतील सर्व विषय आत्मज्ञानानें नाहींसेच होतात ॥३२॥ उद्धवा ! यद्यपि प्रकृतिजन्य अज्ञानामुळें आत्म्यावर ‘ तो शरीरी आहे, इंद्रियवान् आहे ’ असे आरोप पूर्वीपासून जीव करतात, तथापि गुरुमुखानें झालेल्या श्रौतज्ञानचिंतनानें तें अज्ञान नाहींसेंच होतें. कारण, नित्य व निर्विकार असणारा आत्मा कोठून नवीन मिळवावयाचा नसतो, अथवा टाकून देण्यासारखा नसतो. त्याच्यावरील आरोप तेवढे नाहींसे होतात ॥३३॥ पाहा कीं, सूर्योदय अंधकार मात्र नाहींसा करून पदार्थ प्रकट करतो. तो कांहीं घटपटादि पदार्थ उत्पन्न करीत नाहीं. ते असतातच. त्याचप्रमाणें आत्मज्ञान हें जीवबुद्धीचें अज्ञान मात्र नाहींसें

करतें. अज्ञान नष्ट झालें कीं, स्वयंप्रकाश आत्मस्वरूप प्रकट होतें. अज्ञान येतें, जातें; आत्मरूप नित्य आहे ॥ ३४ ॥ हा आत्मा स्वयंप्रकाश, अजन्मा, अज्ञेय, निर्विकार, प्रत्यक्ष अनुभवरूप, एक, अद्वितीय, वाणीस अगोचर, पण वाणी व प्राण यांचा प्रवर्तक आहे ॥ ३५ ॥ तिन्ही प्रकारचे भेद मुळींच नसणाऱ्या आत्म्यांत भेद पाहणें ही मूढ मनाची भ्रांति होय. पण या भ्रांतीला सुद्धां आश्रय देणारा जो एकजिनसी आत्मा तो असल्याशिवाय अस्तित्वच नसतें ॥ ३६ ॥ प्रत्यक्षावर श्रद्धा ठेवणारे द्वैताभिमानी म्हणतात कीं, हें नामरूपद्वारा प्रकट होणारें पांचभौतिक विश्व सत्यच आहे. वेदांतांतील वाक्यें निबळ अर्थवादात्मक, नुसती कर्मस्तुति करणारीं आहेत; पण हें त्यांचें म्हणणें अवास्तविक आहे ॥३७॥

उद्धवा ! ज्याचा ज्ञानयोगाचा अभ्यास पूर्ण झाला नाहीं, त्या योगाभ्यास करणाऱ्या साधकाचें शरीर जेव्हां रोगादिकांनीं क्षीण होतें, तेव्हां त्यानें पुढील उपाय योजावा, असें शास्त्र म्हणतें ॥ ३८ ॥ कित्येक विघ्नें योगधारणेनें, कित्येक धारणायुक्त वायुस्तंभनानें, कांहीं विघ्नें तपानें, मंत्रांनीं व औषधींनीं साधकानें नाहींशीं करावीं ॥ ३९ ॥ माझें ध्यान, माझें नामसंकीर्तन इत्यादि उपायांनीं योगेश्वर जो मी त्या माझी व सिद्धांची सेवा करून हीं अकल्याणकारी विघ्नें नाहींशीं करावीं ॥ ४० ॥ आतां कित्येक ज्ञानी भर तारुण्यामध्येंच आपलें शरीर निरोगी आणि चिरकाल टिकणारें करून मग कित्येक सिद्धींचें संपादन करतात खरें; परंतु ॥ ४१ ॥ उद्धवा ! जो साधक कुशल आहे, त्यानें ह्या देहाला मात्र सुदृढ करणाऱ्या योगमार्गाचा आश्रय करूंच नये. कारण, ह्या योगाला मोक्षनामक पुरुषार्थ साध्य करून देण्याचें सामर्थ्यच नाहीं. पाहा कीं, वृक्षाला दरवर्षी फळें येतात आणि नष्ट होतात, त्याप्रमाणें हा देह नश्वरच आहे ॥ ४२ ॥ बाबा ! नित्य योगाभ्यास करणाऱ्याचा देह कदाचित् पुष्कळ कालपर्यंत सुदृढ राहतो, म्हणून ज्ञानयोगाचा अनादर करून शरीर सुदृढ ठेवणें अथवा तें सुदृढ राहील अशी श्रद्धा ठेवणें, हें साधकाचें कर्तव्य नव्हे ॥ ४३ ॥ असो. एकनिष्ठेनें मला शरण येऊन आतांच सांगितल्याप्रमाणें जो ज्ञानयोगाचा अभ्यास करतो अशा मद्भक्तिपूर्ण ज्ञानयोग्याला विघ्नें बाधा करूंच शकत नाहींत. कारण विषयासंबंधें विरक्त होऊन आत्मानंदाचा अनुभव घेणारा तो योगी असल्या विघ्नांच्या पलीकडेच गेलेला असतो ॥ ४४ ॥

अठ्ठाविसावा अध्याय समाप्त

———

# अध्याय २९ वा

उद्धव म्हणाला :– अच्युता ! ही जी योगप्रक्रिया सांगितलीस ती मनोदास असणाऱ्या पुरुषाला साधणें भारी कठीण आहे, असें मला वाटतें. म्हणून कोणत्याही पुरुषाला सहज साधेल असा त्वत्प्राप्तीचा उपाय मलाही सहज समजेल असा सांग ॥ १ ॥ पुंडरीकाक्षा ! अनेक योगी मनाचा आत्म्याशीं योग करण्यासाठीं मनोनिग्रह करण्याचा प्रयत्न करतात; परंतु बहुधा ते निष्फल होतात. कारण, मनाला शांति देणारा मनोनिग्रह करणें फारच श्रमाचें काम आहे. हे श्रम न झाल्यामुळें हे क्लेशभागी योगी खिन्नच होतात ॥ २ ॥ म्हणून हे कमलाक्षा ! शक्याशक्यतेचा विवेकपूर्वक विचार करणारे तुझे हंसरूपी भक्त तुझ्या शुद्धानंद स्रवणाऱ्या पादकमलाचा आश्रय करतात. हा आश्रय त्यांना निरायासानें, सुखानें साध्य होतो; परंतु योगकर्मांच्या अभिमानानें उद्धत झालेले मानी लोक तुझ्या पादकमलाचा आश्रय करीतच नाहींत. कारण ते तुझ्याच मायेनें विहत म्हणजे जिंकलेले असतात ॥ ३ ॥ हे विश्वहितकरा अच्युता ! तुला अनन्यभावानें भजणाऱ्या तुझ्या दासांचाही दास तूं होतोस व त्यांस कृतार्थ करतोस यांत काय नवल आहे ? देवा ! ब्रह्मदेवादि महासंपन्न देवदेवतांचीं मुकुटमंडित शिरें तुझ्या पायीं रुळत असतांही त्वां रामावतारीं वानरांसारख्या क्षुद्र प्राण्यांचेंही सख्य पत्करून त्यांची सेवा केलीस ॥ ४ ॥

सर्व जीवांचें व जडांचें नियंत्रण करणारा, भक्तांस अत्यंत प्रिय असणारा आणि सर्व पुरुषार्थांची प्राप्ति करून देणारा जो तूं त्या तुझा—देवा ! तुझ्या उपकारांनीं बद्ध झालेला कोणता बरें भक्त त्याग करील ? देवा ! कोणताही तुझा जाणता भक्त केवळ सांसारिक विषयप्राप्ति व्हावी, आणि तुझें विस्मरण व्हावें म्हणून तुझी भक्ति करीत नाहीं. कारण त्याला ठाऊक असतें कीं, तुझी अनन्य भक्ति करणाऱ्या भक्तांचे सर्व आत्मिक पुरुषार्थ साध्य होतातच ॥ ५ ॥ देवा ! ब्रह्मदेवाचें दोन दोन कोटि परार्ध आयुष्य असणाऱ्या तुझ्या ज्ञानी भक्तांस, तुझ्या अनुग्रहानें नित्य वाढणारा आनंद उपभोगणाऱ्या व त्या उभयतांचें स्मरण असणाऱ्या तुझ्या भक्तांस, तुझ्या अनंत उपकारांच्या कर्जातून कधींच मुक्त होतां येत नाहीं. देवा ! तुझे उपकार किती म्हणून स्मरावे ? गुरूच्या स्वरूपानें उभा राहून आमच्या ज्या बाह्यविषयक वासना त्यांचा तूं नाश करतोस. आणि आमच्या अंतःकरणांत नित्य जागृत राहून कामक्रोधादि षड्रिपूंचा नाश करतोस, आणि देवा ! गुरुरूपानें व चैत्यरूपानें आमचें आत्मरूप आम्हांस प्रत्यक्ष स्पष्ट करतोस. देवा ! असे तुझे अनंत उपकार आहेत. त्यांची फेड आम्ही काय करणार ? सर्वस्व तुला अर्पितों हीच त्यांची फेड ! ! ॥ ६ ॥

**श्रीशुक म्हणाले, परम प्रेमळ दास उद्धव याची विनंति ऐकून आपल्या सत्त्वादिगुण-**

मंडित मायेच्या साहाय्यानें ब्रह्मा, विष्णु व रुद्र या तीन रूपांनीं जगाची उत्पत्ति, स्थिति व लय असे खेळ खेळणारा तो देवदेवेश्वर श्रीकृष्ण प्रेमयुक्त गोड हास्य करून बोलूं लागला ॥ ७ ॥

श्रीभगवान् म्हणाले, उत्तम प्रश्न विचारलास. उद्धवा ! आतां तुला मत्प्रिय असणारे धर्म सांगतों; कीं, ज्यांचें पालन केलें असतां अजिंक्य मृत्यूवरही मर्त्य मनुष्याला जय मिळतो ॥ ८ ॥

सावधान चित्तानें माझें स्मरण ठेवून, माझ्या मात्र ठिकाणीं मन आणि चित्त यांचें आधान करून आणि माझ्या भागवतधर्मामध्यें आपलें मन सर्वथा रंगवून काढणाऱ्या माझ्या भक्तानें भागवतधर्मविहित सर्व कर्तव्यें माझ्याप्रीत्यर्थ मात्र करावीं ॥ ९ ॥ माझ्या साधु भक्तांनीं जे प्रदेश आपल्या वास्तव्यानें पवित्र केले असतील ते पुण्यप्रदेश पाहावे, तेथें यात्रा कराव्या. तसेंच, देवादिकांमध्यें जे भक्त झाले त्यांचींच कर्में आपण करावीं ॥ १० ॥ एकट्यानेंच अथवा अनेकांनीं एकत्र जमून गायन–नर्तनप्रभृतींसह सर्व योग्य महाराजोपचारांनीं प्रतिपर्वणीला, यात्राप्रसंगीं, जन्मोत्सवाचे वेळीं माझ्याप्रीत्यर्थ यथाशक्ति महापूजा करावी ॥ ११ ॥

स्फटिकासारखें स्वच्छ चित्त असलेल्या माझ्या भक्तानें सर्व भूतांच्या आंतबाहेर मींच स्पष्टरूपानें ओतप्रोत भरलेला आहें व व्यक्तींच्या अंतरंगामध्यें मीच आत्मस्वरूपानें स्पष्ट वास्तव्य करतों आहें असें पाहावें. आकाश जसें निःसंग तसा मी निःसंग आहें. हें मात्र विसरूं नये ॥ १२ ॥

उद्धवा ! या प्रकारें मद्भक्तानें ज्ञानदृष्टीचा अवलंब केला म्हणजे सर्व भूतें मत्स्वरूपांत आहेत असें तो मानूं लागतो व सर्वांचा सारखा सत्कार करतो ॥१३॥ ब्राह्मण व अंत्यज, साव व चोर, गुणी व गुणशून्य, दयाळु व दुष्ट या सर्वांचे ठिकाणीं जो समदृष्टि ठेवणारा तोच ब्रह्मवेत्ता, ज्ञानी उत्तम भक्त होय ॥१४॥ प्रत्येक मानवी जीवांत माझ्या स्वरूपाची भावना कायमची ठेवतां येऊं लागली म्हणजे लवकरच माझ्या भक्ताचे स्पर्धा, मत्सर, तिरस्कारबुद्धि हे विकार नष्टच होतात ॥१५॥ आपले स्वकीय थट्टा करतात तिकडे व आपल्या स्वतःच्या दृष्टीची लाज असते तिच्याकडे लक्ष न देतां श्वान, चांडाल, गाय, खर = गाढव, कोणीही दिसो, त्याला भूमीवर साष्टांग नमस्कार घालावा ॥१६॥

याप्रमाणें सर्वत्र ईश्वर आहे ही भावना जोंवर उत्पन्न होत नाहीं, तोंवर वाङ्मनशरीरद्वारा वरील उपासना अखंड चालवावी ॥१७॥ सर्वत्र आत्मा भरलेला आहे, अशी मनोभावना दृढ झाली म्हणजे माझ्या भक्ताच्या दृष्टीलाही परमेश्वर दिसतो. तो सर्वथा निःसंशय झाला म्हणजे तो कर्मांच्या पलीकडे गेला असें समजावें ॥१८॥ मनांत, बोलण्यांत व कृतींत सर्वत्र परमेश्वरी रूपाची भावना करणें हेंच मोक्षसाधनांत अग्र।

उत्तम साधन होय, असा माझा निश्चयात्मक सिद्धांत आहे ॥१९॥ उद्धवा ! निर्गुण-स्वरूपी जो मी त्या माझ्या व्यवस्थित निश्चयानें हा निष्काम धर्म स्थापन केला आहे, म्हणून उपक्रम-नाशप्रभृति इवलासा सुद्धां दोष यांत नाहीं ॥२०॥ भक्तोत्तमा उद्धवा ! भयप्रभृति कोणतेंही अर्थशून्य कर्म असो, तें जर मला निष्काम बुद्धीनें अर्पण केलें तर तोही उत्तम धर्म होतो ॥२१॥ ह्या असत्य म्हणजे मायामय आणि मर्त्य देहांतच ह्या लोकीं सत्यरूप व अमृतरूप जें ब्रह्म त्याची प्राप्ति करून घेणें हीच बुद्धिवंतांच्या बुद्धीची म्हणजे विवेकाची व चतुर पुरुषाच्या चातुर्याची खरी कामगिरी आहे ॥२२॥

उद्धवा ! देवांस अगम्य असणारें जें ब्रह्मज्ञान, त्याचा संक्षेपतः व विस्तरशः स्पष्ट व निःसंदिग्ध युक्तींनीं अनेक प्रकारें व अनेक दृष्टांतीं मी तुला उपदेश केला आहे. हें ब्रह्मज्ञान झालें म्हणजे जीवाच्या सर्व शंका नष्ट होऊन तो मुक्त होतो ॥२३–२४॥ तुझ्या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें देऊन तुला हें जें ब्रह्मज्ञानाचें कांड उलगडून सांगितलें, त्याचें जो अनुसंधान ठेवील त्याला श्रुतीनेंही जें गुलदस्तांत ठेवलें आहे, तें परब्रह्म प्राप्त होईल ॥२५॥ तसेंच माझ्या भक्तांमध्यें जो या मत्प्रणीत ज्ञानाचा पुष्कळसा व समर्पक रीतीनें प्रसार करील, त्या ब्रह्मज्ञानप्रसारकाला मीच आपलें आत्मस्वरूप देईन ॥२६॥

जो या परम मंगल व परम पवित्र भागवतधर्माचें नित्य पारायण करून माझें दैदीप्यमान ज्ञानरूप प्रकट करील, तो शुद्ध, निर्मळ, निष्पापच होतो यांत संशय नाहीं ॥ २७ ॥ तसेंच जो पुरुष श्रद्धापूर्ण अंतःकरणानें व एकाग्र मनानें नित्य या ज्ञानकथेचें श्रवण करील, तो या श्रवणानेंच माझी पराभक्ति करतो असें होऊन त्याचे सर्व कर्मबंध तुटून जातील ॥ २८ ॥

सख्या उद्धवा ! ही ज्ञानकथा तूं नीट ऐकून अंतःकरणांत सांठविली आहेस ना ? तुझ्या मनानेंच उत्पन्न केलेले शोकमोह नाहींसे झाले ना ? ॥ २९ ॥ ध्यानांत ठेव कीं, हें ज्ञानरहस्य भोंदू, नास्तिक, वंचक, अश्रवणेच्छू, अभक्त आणि दुष्ट शीलाचे लोक यांस सांगावयाचें नाहीं ॥ ३० ॥ हे दोष ज्यांच्यांत नसतील व जे वेदभक्त, प्रेमळ, सात्त्विक व पवित्र असतील त्यांस आणि भक्ति करणाऱ्या स्त्रियांस व शूद्रांस ही ज्ञानकथा अवश्य सांगावी ॥ ३१ ॥ मी उपदेशिलेलें ज्ञान समजलें व उमजलें म्हणजे कळून घेण्याचें असें कांहींही शिल्लक उरतच नाहीं. मधुर अमृतपानानंतर दुसऱ्या पेयाची इच्छा होणेंच नाहीं ॥ ३२ ॥ व्यावहारिक ज्ञान, कर्म, योग ( कर्मयोग ), व्यापार, राजकारण यांनीं जे जे अर्थ प्राप्त होतात, ते चारी पुरुषार्थ मद्रूपानें भक्तांस मिळतातच ॥ ३३ ॥

सर्व कर्में टाकून देऊन जो मर्त्य आपलें सर्व कांहीं जेव्हां मला अर्पण करितो, तेव्हां त्या मोक्षाची प्राप्ति सुलभ झालेल्या पुरुषाला मीच कल्याणप्रद स्थिति देऊन शेवटीं सायुज्य मुक्ति देतोंच देतों ॥ ३४ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले, याप्रमाणें आपल्यास मोक्षाचा योगमार्ग दाखविणाऱ्या पुण्यश्लोक श्रीकृष्णाचें भाषण ऐकल्यावर उद्धवानें हात जोडले, कृतज्ञतेनें त्याच्या डोळ्यांतून अश्रु गळूं लागले, त्याचा कंठ दाटला व त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर पडेना ! ॥ ३५ ॥ तथापि प्रेमानें क्षुब्ध झालेलें तें आपलें चित्त स्थिर करून आपण कृतकृत्य झालों असें मानणारा तो कृतज्ञ उद्धव, आपले दोन्ही हात व मस्तक कृष्णचरणकमलावर ठेवून बोलूं लागला ॥ ३६ ॥

उद्धव म्हणाला—आजपर्यंत ज्या मोहजन्य गाढ अज्ञानरूपी अंधकारानें माझा आश्रय केला होता, तो अज्ञानांधकार, हे ब्रह्मदेवजनका ! तुझ्या समागमानेंच आज नाहींसा झाला आहे. विभावसूच्या म्हणजे तेजस्वी अग्नीच्या आश्रयाला असणाऱ्याला थंडीचें वा अंधेराचें किंवा भीतीचें भय कशाला वाटेल ? अग्नीसमोर थंडी वगैरे सामर्थ्यशून्यच होतात ॥ ३७ ॥ देवा ! माझ्यावर दया करून तूं या दासाचा विज्ञानरूपी दीप आज पुनः प्रकाशित केलास. अशा रीतीनें दासावर उपकार करणाऱ्या तुझ्या पायांचा आश्रय सोडून कोणता कृतज्ञ दुसऱ्याच्या छायेखालीं राहण्याची इच्छा करील बरें ? ॥ ३८ ॥

सृष्टिव्यवहार अखंड चालावा म्हणून तूं आपल्या मायेकरवीं दाशार्हादि यादवकुलासंबंधानें जो दृढ मायापाश माझ्या मनांत पसरला होतास तो आज तुझ्या आत्मज्ञानच्या तीक्ष्ण तरवारीनें पार तुटून गेला ॥ ३९ ॥ योगेश्वर कृष्णा ! तुला शतशः प्रणाम असोत ! देवा ! मी तुला शरण आलों आहें. आतां कृपा करून एक गोष्ट कर; ती ही कीं, तुझ्या चरणपंकजाचे ठिकाणीं माझी प्रीतिपूर्वक भक्ति अखंड राहील, असा उपाय मला सांग ॥ ४० ॥

श्रीभगवान म्हणाले, उद्धवा ! तूं आतांच माझा जो बद्रिकाश्रम आहे तेथें जा; तेथें माझ्या पायापासून निघालेली अलकनंदा नांवाची गंगा आहे; त्या तीर्थांत स्नान कर, आणि आचमनपूर्वक संध्याकर्म करून शुद्ध हो ॥ ४१ ॥ या अलकनंदेचें दर्शन होतांक्षणीं तुझ्या अंतःकरणांत पापमल असलाच तर तो धुऊन साफ जाईल. तेथें वल्कलें मात्र परिधान कर, आणि रानांतील फळें व कंदमुळें मात्र खात जा ॥ ४२ ॥

शीतोष्णें, सुखदुःखें सहन कर, सात्विक ऐस, इंद्रियें स्वाधीन ठेव, शास्त्रीयज्ञानपूर्वक अपरोक्षसाक्षात्कार करून घे. त्यायोगें बुद्धीला स्थैर्य येऊन तुझी वृत्ति शांत, निर्विकारी होईल ॥ ४३ ॥ मीं जें जें तुला उपदेशिलें आहे, त्याचें विचारपूर्वक मनन, निदिध्यासन कर; वाणी, मन माझ्या ठिकाणीं स्थिर ठेव व माझ्या भागवतधर्मामध्येंच सदोदित रममाण हो. असें केलेंस म्हणजे या अभ्यासानें तुला त्रिगुणात्मक माया जिंकि।

येईल. तूं तिचें अतिक्रमण करशील आणि मत्स्वरूपाप्रत प्राप्त होशील. हा माझा तुला अमोघ आशीर्वाद आहे ॥ ४४ ॥

श्रीशुक म्हणाले, संसारविषयक बुद्धीचें हरण करणारा अशा हरीची आज्ञा ऐकल्यावर उद्धवानें त्याला प्रदक्षिणा घातल्या. पायांवर लोळण घेतली आणि आपल्यास कृष्णपरमात्म्याचा वियोग होणार या दुःखानें तो व्याकुल झाला. त्यानें अश्रुरूपानें श्रीकृष्णाचे चरण भिजवून टाकले ॥४५॥ पूज्य पुरुषोत्तमाच्या प्रेमळ व उद्धारक समागमानें उत्पन्न झालेला स्नेह संपणार, समागम तुटणार या दुःखानें व भीतीनें विव्हल झालेला उद्धव स्वतः जाण्यास असमर्थ होता, तरी आज्ञा म्हणून श्रीकृष्णपादुका मस्तकावर धारण करून मोठ्या कष्टानें तो श्रीकृष्णाचा निरोप घेऊन निघाला ! ॥ ४६ ॥

उद्धवानें अंतःकरणांत श्रीकृष्णमूर्ति अचल ठेवलीच होती. तो महाभागवत, जगद्धितकर कृष्णानें सांगितल्याप्रमाणें बद्रिकाश्रमीं गेला व तेथें त्यानें ज्ञानपूर्वक दृढ भक्तीचा अभ्यास केला आणि शेवटीं श्रीकृष्णाच्या धामाला गेला ॥ ४७ ॥

राजा ! हें जें आनंदानें तुडुंब भरलेलें आनंदरूप ज्ञानामृत, श्रीकृष्ण जो परमात्मा, ज्याचें चरणकमल मोठमोठे योगेश्वर आराधितात, त्या भक्तवत्सल श्रीकृष्णानें महाभागवत उद्धवनिमित्तानें सर्व भगवद्भक्तांस सांगितलें आहे. त्याचा श्रद्धेनें आस्वाद घेऊन त्यांतच रममाण होणारा कोणताही भागवत मुक्त होईल व त्याच्या सत्समागमांत असणारे लोकही मुक्त होतील ॥ ४८ ॥ राजा ! आपल्या भक्तांस येणारीं संसारांतील दुःखें व भीति यांचा उपद्रव नाहींसा व्हावा म्हणून वेदवेदांताचा निर्माता जो भगवान त्यानें वेदांचा प्राणच असणारें हें ज्ञानविज्ञानरूपी उपदेशामृत ( उद्धवाला पाजलेलें उपदेशरूपी अमृत ) वेदसमुद्रांतून भक्तांना पिण्यासाठीं काढलें आहे. आपल्या भृत्यरूपी देवांचीं सर्व दुःखें व भीति नष्ट करण्यासाठीं ज्याप्रमाणें त्यानें समुद्रमंथन करून त्यांतून अमृताचा कलश बाहेर काढला व देवांस अमृत पाजलें, तो आद्य पुरुष जो श्रीकृष्ण पुरुषोत्तम त्याला मी सर्व भावानें नमस्कार करितों ॥ ४९ ॥

**एकनाथ**— जो करी हरिचिंतन । त्याचे चित्ताचें हरि करी हरण ।
जो करी हरीचें स्मरण । त्याचा संसार पूर्ण हरि हरी ॥ ( ४५ )

**एकनाथ**—स्नेहें द्वेषें सकामासी । जे जे वेधले श्रीकृष्णासी ॥
ते ते पावले परमानंदासी । त्या श्रीकृष्णासी त्यजी कोण ? ॥ ( ४६ )

**एकनाथ**—जेथ श्रद्धामात्रें चित्तशुद्धी । स्मरणमात्रें निर्विकल्पबुद्धी ॥
नारायणनामें मोक्षसिद्धी । विशाल या विधीं बदरिकाश्रम ॥ ( ४७ )

**एकनाथ**—संसारभयें भासले । जे कृष्णासी शरण आले ॥
त्यांचें भवभय हरावया वहिलें । जेणें मथन केले वेद ॥
मथुनि उपनिषद्वार । काढिलें ज्ञानविज्ञानसार ॥
ज्यालागीं शिणले ज्ञाते नर । तयांसी पैल मेर ठाकेना ( ४९ )

**एकोणतिसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ३० वा

राजा परीक्षिति श्रीशुकाचार्यांस म्हणाला, महाराज ! महाभगवद्भक्त उद्धव वनांत निघून गेल्यावर लोकोद्धारक श्रीभगवान् जो कृष्ण त्यानें द्वारकेंत काय केलें आणि ब्राह्मणाच्या शापामुळें आपलें यादवकुल नष्ट होणार असें समजल्यावर त्या भगवान् श्रीकृष्णानें आपला सकलनयनमनोहर देह कोणत्या पद्धतीनें सोडला, तें कृपा करून सांगावें ॥ १, २ ॥ ज्या भगवंताचें देहस्वरूप पाहिलें असतां अबला ज्या गोपी अथवा भक्तोत्तम जे भगवत्पर मुमुक्षु त्यांस आपले डोळे तेथून (त्या स्वरूपापासून) परत फिरविण्याचें सामर्थ्यच राहात नसे, ज्या स्वरूपाची शोभा ऐकली म्हणजे तें शोभिवंत स्वरूप साधूंच्याच आत्मस्वरूपांत नित्य वास्तव्य करतें, ज्या स्वरूपाच्या ऐश्वर्याचें वर्णन करतांना प्रतिभासंपन्न कवींच्या वाणीला प्रेमाचें भरतें येतें व जें स्वरूप वर्णिल्यामुळें कवींची योग्यता लोकमान्य होते आणि भारती युद्धप्रसंगीं जगद्विजयी अर्जुनाच्या रथावर बसलेलें जें भगवत्स्वरूप पाहिल्यामुळें प्रेक्षकांस सरूपता मुक्ति मिळाली तें सुंदर, मोहक, शोभिवंत आणि मोक्षद शरीर श्रीकृष्णानें कसें त्यक्त केलें तें सांगावें ॥ ३ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले, हे राजा ! आकाशांत, पृथ्वीवर व अंतरिक्षांत मोठमोठे उत्पात होतात, असें पाहून श्रीकृष्णानें सुधर्मासभेंत जमलेल्या यदूंस उपदेश करण्याच्या निमित्तानें पुढील भाषण केलें ॥ ४ ॥

श्रीकृष्ण म्हणाला, "यादवहो ! आपल्या या द्वारका नगरींत होणारे हे घोर अनर्थ-सूचक उत्पात म्हणजे यमराजाची स्वारी लवकरच येणार हे सुचविणारीं आघाडीचीं निशाणें होत. म्हणून यापुढें या नगरींत आपण एक घटकाभर सुद्धां राहूं नये. ॥ ५ ॥ बायका, मुलें व वृद्ध अशा अशक्त मंडळींस शंखोद्धाराला आतांच पाठवा आणि आपण सर्वजण पश्चिमवाहिनी सरस्वतीतीरावर असलेल्या प्रभास क्षेत्रीं जाऊं ॥ ६ ॥ तेथें स्नानानें व तीर्थोपोषणानें शुद्ध होऊं आणि देवदेवतांची षोडशोपचारें पूजा करून स्वस्थचित्त होऊं ॥ ७ ॥ ब्राह्मणांकरवीं विघ्नविनाशक शांत्या करवून व प्रायश्चित्तें घेऊन शुद्ध झालेले आपण यादव पवित्र, विद्वान व तपस्वी ब्राह्मणांस श्रुतिस्मृत्युक्त सर्व प्रकारचीं दानें देऊन ब्राह्मणांचे आशीर्वाद घेऊं ॥ ८ ॥ मीं सांगितलेलें हें कर्म सर्व अरिष्टांची शांति करील व आपलें उत्तमोत्तम कल्याणही करील. देव, ब्राह्मण व गायी यांची पूजा केली असतां पूजा करणाऱ्या जीवाला येथें या लोकीं सुख मिळतें व त्याचा परलोकीं उत्तम प्रकारचा उत्कर्ष होतो" ॥ ९ ॥ याप्रमाणें कृष्णाचें झालेलें भाषण सर्व पोक्त यादवांनीं लक्षपूर्वक ऐकलें आणि 'उत्तम आहे, आपली आज्ञा वंद्य आहे' असें म्हटलें. नंतर ते सर्व यादव नावांत बसून समुद्राच्या ऐलतीराला आले व तेथें रथारूढ

होऊन प्रभासाला गेले ॥ १० ॥ नंतर त्या प्रभासक्षेत्रीं त्या यादवांनीं भगवान श्रीकृष्णानें सांगितल्याप्रमाणें व त्यांस जें काय अधिक सुचलें त्याप्रमाणें परममंगल फल देणारे असें तीर्थस्नान, उपवास, देवतापूजन, ग्रहशांति इत्यादि कर्मे परममंगलकार्यांसह करून ब्राह्मणांस दक्षिणा दिली आणि ब्राह्मणपूजादि सर्व कर्मे यथासांग संपादलें ॥ ११ ॥ याप्रमाणें सर्व कर्मे यथासांग केल्यानंतर त्याच क्षेत्रांत दुर्दैवानें यादवांस दुष्ट बुद्धि सुचली आणि त्यांनीं बुद्धीला भ्रष्ट करणारें असें एक जलाल पण गोड असें मैरेयक नांवाचें दुर्मिळ मद्य आणविलें आणि तें मद्य ते यादव यथेच्छ प्याले ॥ १२ ॥

श्रीकृष्णाच्या मोहमायेनें मूढ झालेल्या त्या यादवांस त्या मद्याचा अमल इतका चढला कीं ते बेफाम झाले, आणि बोलण्यावरून बोलणें वाढतां वाढतां त्यांच्यांत मोठें कडाक्याचें भांडण जुंपलें. हें आपसांतील भांडण इतकें वाढलें कीं त्याचें पर्यवसान प्राणघातक युद्धांत झालें ! ॥ १३ ॥ त्या प्रभासाजवळील समुद्राच्या मैदानावर या क्रोधसंतप्त आणि आततायी झालेल्या वीरांनीं धनुर्बाण, गदा, तरवार, भाले, तोमर इत्यादि अनेक अस्त्रांनीं युद्ध सुरू केलें ॥ १४ ॥ हालणाऱ्या ध्वजांनीं अलंकृत झालेल्या रथांवर, हत्तींवर, तसेंच गाढव, उंट, बैल, रेडे, दास, खेचरें यांवर आरूढ झालेल्या त्या मदोन्मत्त यादवांनीं एकमेकांसमोर येऊन युद्ध सुरू केलें. त्यांनी बाणांचा वर्षाव केला व दांतांनीं लढणाऱ्या वन्य हत्तींप्रमाणें ते परस्परांस मारूं लागले ॥ १५ ॥ ईर्षेला चढलेले प्रद्युम्न-सांब, अक्रूर-भोज, अनिरुद्ध-सात्यकी, सुभद्र-संग्रामजित, दारुण असे गद, सुमित्र-असुरथ यांच्यांमध्यें कडाक्याचीं द्वंद्वयुद्धें सुरू झालीं ॥ १६ ॥

तसेंच निशठ इत्यादि सहस्रजित्, शतजित, भानु यांचे अनुयायी मद्योन्मादानें व कृष्णमायेनें मूढ होऊन परस्परांशीं युद्ध करून एकमेकांस ठार करण्याला उद्युक्त झाले ॥ १७ ॥ दाशार्हप्रभृति नऊ यादव ज्ञाति, विसर्जनादि तत्तद्देशीय यादव आपला दीर्घकाळ चालत आलेला स्नेहसंबंध विसरून परस्परांबरोबर लढाई करूं लागले ॥ १८ ॥ सारांश, सर्व यादव इतके उन्मत्त व मूढ झाले कीं, पिता-पुत्र, बंधु-बंधु, आते-मामे-बंधु, आजा-नातु, चुलते-पुतणे, मामे-भाचे, मित्र व सुहृद यांच्यांमध्यें कडाक्याची लढाई जुंपली आणि शेवटीं त्या वेडे झालेल्या यादवांनीं आपसांत लढून आपल्या कुलाचा नाश केला ! ॥ १९ ॥ बाणांचे भाते रिकामे झाले, धनुष्यें भग्न झालीं, शस्त्रें संपलीं, तेव्हां त्या मूढ पुरुषांनीं समुद्रकांठीं वाढलेलें गवतच मुठींत घेऊन युद्ध करण्यास आरंभ केला ! ॥ २० ॥

ईश्वरकरणी अगाध म्हणतात, त्याप्रमाणें त्या लवाळ्यांचे वज्रासारखे कठीण लोहदंड झाले ! आणि पुनः प्राण घेणारी खणाखणी सुरु झाली ! कृष्ण मध्यें येऊन त्यांचें निवारण करूं लागला तेव्हां त्याच्यावरच त्यांनीं लोहदंड फिरवले ! ॥ २१ ॥ त्या उन्मत्त यादवांची मति इतकी भ्रष्ट झाली कीं, कृष्ण व बलराम हे दोघेही आपले शत्रु आहेत असें त्यांस वाटलें

आणि त्यांनीं त्या राम-कृष्ण बंधूंसच ठार करण्याचा निश्चय केला व ते आततायी [अविचारी] यादव रामकृष्णांवर धावून गेले ॥ २२ ॥ राजा ! असा प्रकार पाहतांच ते राम-कृष्णही संतापले आणि त्यांनीं एरकारूपी लोहदंड हातीं घेऊन त्या रणांगणावरच हजारों यादवांचा फडशा उडविला ! ॥ २३ ॥ याप्रमाणें ब्रह्मशापानें कलुषित झालेलें आणि कृष्णमायेनें बुद्धिशून्य बनलेलें जें यादवकुल त्याचा स्पर्धाजन्य संताप त्या कुलाचा क्षय करिता झाला ! सारांश, ज्याप्रमाणें वेळूंच्या परस्पर घर्षणानें उत्पन्न होणारा अग्नि सर्वच्या सर्व त्या वेळूच्या बेटाचें भस्म करतो, त्याप्रमाणें त्या यादवांनीं आपसांत लढून सर्व यादवकुलाचा नाश केला ॥ २४ ॥

अशाप्रकारें यदुकुलांतील सर्व कर्ते व उन्मत्त पुरुष नष्ट झाले, तेव्हां कृष्णास समाधान झालें. कारण, ह्या श्रीमदानें उन्मत्त झालेल्या यादवकुलाचा भार पृथ्वीमातेला असह्य झाला होता ॥ २५ ॥ असो, नंतर श्रीबलराम समुद्रतीरीं एका एकांतस्थानीं गेला आणि तेथें महापुरुषाचें ध्यान सुलभ करणारा योग अवलंबून म्हणजे आत्मस्वरूपामध्यें जीवात्मा लीन करणारा योग अवलंबून तो आपला हा मानवी देह टाकता झाला. अर्थात् त्यानें भूलोकही सोडला ॥ २६ ॥ रामाचें निधन झालें असें पाहून देवकीनंदन श्रीकृष्ण भगवान् तोही अंतकाळची जणो वाट पाहत भूतलावरील एका अश्वत्थ वृक्षाखालीं समाधि लावून बसला ॥ २७ ॥ त्यावेळीं त्या भगवान् श्रीकृष्णाचें तें दैदीप्यमान चतुर्भुज स्वरूप आपल्या स्वयंप्रकाश तेजानें पृथ्वीवरील सर्व अंधकार नाहींसाच करीत होतें आणि धूम नसणाऱ्या अग्नीप्रमाणें तें सर्व विश्वाला प्रकाशित करीत होतें ॥ २८ ॥

श्रीवत्सानें अलंकृत असें तें वक्षःस्थळ, जलपूर्ण नभासारखा तो श्यामसुंदर वर्ण, तावून काढलेल्या सुवर्णाप्रमाणें ती मनोहर अंगकांति, झगझगीत नेसलेल्या व पांघरलेल्या पीतांबराची ती जोडी, हीं सारीं कृष्णस्वरूपाला मांगल्य देत होतीं. तें कमलवदन सुहास्य करीत होतें, नीलवर्ण कुरळे केश भुरभुर उडून मस्तकाला शोभा देत होते, तें पुंडरीक कमलाप्रमाणें रमणीय नेत्रयुग्म प्रेक्षकचित्त हरण करीत होतें व कर्णांतील मकरकुंडलांच्या प्रभेनें सुंदर वदन अधिकच मनोरम दिसत होतें. तो कमरेचा सुंदर करगोटा, तें स्वच्छ यज्ञोपवीत, तो तेजस्वी मुकुट, तीं कुंडलें, तीं रुणझुणणारीं कडीं, तीं लखलखित पोंची, तो मोठा थोरला तुळशींचा हार, तें क्वणन करणारे नूपुर, तो तेजस्वी कौस्तुभ, यांनीं विराज-लेलें तें श्रीबालकृष्णाचें अभिनव सुंदर शरीर वनमाळांनीं जास्तच खुलून दिसत होतें. त्या वेळीं भगवंतानें आपला आरक्त वाम चरण उजव्या मांडीवर ठेवला होता व तो भगवान् त्या अश्वत्थ वृक्षास टेकून ध्यानस्थ बसला होता ॥ २९-३२ ॥ तो श्रीकृष्णाचा झगझगणारा पादतल मृगनेत्रच होय असा भास होऊन जरानामक व्याधानें आपला बाण त्यावर सोडला. हा बाण म्हणजे सांबाच्या उदरांतून निघालेल्या लोखंडाच्या अग्रानें सिद्ध झालेला बाण होता ॥ ३३ ॥ बाण सोडल्यानंतर तो जरा नावाचा व्याध जवळ गेला व

पाहूं लागला तों, आपण ज्यावर बाण टाकला तो हरिण नसून चतुर्भुज भगवान् श्रीकृष्ण आहे असें त्यास दिसून आलें ! अशा प्रकार पहातांच तो अनुचित कर्म करणारा अपराधी लुब्धक भ्याला आणि श्रीकृष्णाच्या पायांवर लोळण घेता झाला. तो म्हणाला, ' देवाधिदेवा ! न जाणतां माझ्या• हातून तें पातक घडलें. महाराज ! आपण प्रभु, पुण्यश्लोक आहां. कृपा करून माझ्या या अनुचित पापकर्माची मला क्षमा करा. भगवन् ! नुसतें आपलें स्मरण झालें तरी अज्ञानाचे व पापाचे काळेकुट्ट पर्वत रसातळाला जाऊन ते ते पुरुष शुद्धचित्त व आत्मज्ञानी होतात, असें श्रुतिस्मृति म्हणतात. अशा सर्ववंद्य पुरुषोत्तमाचा जीव घेण्याचें महापातक माझ्या हातून घडलें आहे ॥ ३४-३६ ॥ म्हणून हे भगवन् ! मृगहत्यादि पातकें करणाऱ्या मला आतांच्या आतां मारून टाका ' म्हणजे असलीं असदाचरणाचीं पापकृत्यें माझ्या हातून पुनः होणें बंदच होईल ॥ ३७ ॥

देवा ! तुझ्या मायेची अघटित घटना ब्रह्मदेवाला, त्याच्या मुलांना, रुद्रादि देवांना आणि वेदकर्त्या ऋषींनाही समजत नाहीं. मग आमच्यासारख्या मायेच्या कर्दमांत लोळणाऱ्या अज्ञानी बुद्धिनष्टांस आपलें अद्‌भुत मायाकार्य कसें समजेल किंवा उलगडतां येईल ? कदापिही नाहीं ' ॥३८॥

अशा प्रकारें पूर्ण पश्चात्तापयुक्त असें त्या लुब्धकाचें भाषण ऐकून श्रीभगवान त्या लुब्धकाला म्हणाला–'लुब्धका ! भिऊं नको, ऊठ, मला जें हवें होतें, तेंच तूं केलें आहेस. तूं पातकी नाहींस. माझ्या आज्ञेनें तुला नेण्याला आतां विमान येईल. तूं स्वस्थ मनानें स्वर्गाप्रत जा आणि पुण्यवंत सुखाचा अनुभव घे ' ॥३९॥ याप्रमाणें इच्छामात्र देह धारण करणाऱ्या भगवंताची आज्ञा होतांच त्या व्याधानें प्रदक्षिणापूर्वक कृष्णाचे चरण वंदिले आणि विमानांत बसून तो स्वर्गास गेला ॥४०॥

नंतर कृष्णाचा शोध करीत त्याचा सारथि दारुक त्या मार्गानें येऊं लागला असतां कृष्णाच्या वनमालेचा सुगंध घेऊन येणारा वायु त्यास स्पर्श करूं लागला. त्या सुगंधाचा आस्वाद घेत घेत त्या धोरणानें पावलें टाकीत ज्या स्थळीं भगवान बसले होते तेथें तो येऊन पोंचला ॥४१॥ आपला यजमान भगवान श्रीकृष्ण आपली सर्व लखलखीत तीक्ष्ण आयुधें घेऊन अश्वत्थाच्या मुळाशीं योगस्थितींत बसला आहे, असें पाहतांच त्याला रडें कोसळलें. त्यानें रथाखालीं उडी टाकली, तो जवळ आला आणि सद्‌गदित अंतःकरणानें त्यानें भगवंताच्या पायांवर लोळण घेतली ॥४२॥ दारुक म्हणाला. ' स्वामिन्, आपलें चरणकमल दिसेनासें झालें, तेव्हांपासून माझी ज्ञानदृष्टि नेली. सर्वत्र अज्ञानाचा अंधेर पसरला. कोठें जावें, काय करावें, हें मला कांहीं समजत नाहींसें झालें. चंद्रास्त झाल्यावर रात्रीच्या अंधकारांत जसें कांहीं सुचत नाहीं, तसें मला झालें आहे. माझ्या मनाची शांति नष्ट झाली !' ॥ ४३ ॥

दारुक याप्रमाणें बोलतो आहे, इतक्यांत श्रीकृष्णाचा तो गरुडांकित रथ, त्याचे घोडे, त्याचीं शस्त्रास्त्रें, हीं सर्व आकाशांत वर उडून गुप्त झालीं ! हा चमत्कार पाहतांच दारुक आश्चर्यानें थक्क झाला ! भगवान जनार्दन त्याला म्हणाला ॥४४, ४५॥ "दारुका, तूं आतांच्या आतां द्वारकेस जा, आणि तेथील यादवांस सांग कीं, येथील यादवांनीं आपसांत युद्ध करून ते सर्व मृत्युवश झाले. बलरामदादा स्वर्गाला गेला, आणि घायाळ झालेला मीही क्षणभरानें निजधामास जाणार आहे. आणखी असें सांग कीं, इतःपर द्वारकेंत कोणीही राहूं नये. कारण, मी गेल्यावर लगेच हा समुद्र द्वारकेला आपल्या पोटांत घेईल. म्हणून सर्वांनीं सकुटुंब, आमच्या मातापितरांनीं देखील इंद्रप्रस्थाला जावें. वाटेंत माझा स्नेही अर्जुन सर्वांचे पालनपोषण व संरक्षण यथास्थित करील ॥ ४६–४८॥ आणि दारुका ! मीं उपदेशिलेला जो धर्म, त्याचें तूं अनुष्ठान कर. म्हणजे तुला ज्ञान प्राप्त होईल आणि 'ही सर्व माया आहे, तिचें विजृंभण सर्वत्र आहे' असें ज्ञानयोगानें तुला समजलें म्हणजे तुझी तळमळ नाहींशी होईल. तूं मुक्त होशील." ॥४९॥ याप्रमाणें श्रीकृष्णानें केलेली आज्ञा दारुकानें शिरसा वंदन केली आणि कृष्णाला प्रदक्षिणा घालून व वारंवार नमन करून त्यानें देवाचे पाय आपल्या मस्तकावर धारण केले आणि शेवटीं मोठ्या दुःखानें व जड पावलांनीं तो श्रीकृष्णाचे आज्ञेप्रमाणे द्वारकेस गेला ॥ ५० ॥

**एकनाथ**—हृदयीं नित्य माझें ध्यान । मुखीं माझें नामकीर्तन ॥
श्रवणीं माझें कथाश्रवण । करी मदर्चन सर्वदा ॥
ध्यानीं मम मूर्तिदर्शन । चरणीं मदाल्या गमन ॥
रसनें मम तीर्थप्राशन । मत्प्रसादभोजन अत्यादरें ॥
साष्टांगें मजचि नमन । आल्हादें मद्भक्तां आलिंगन ॥
सप्रेम माझें सेवेवीण । रिता अर्धक्षण जाऊं नेदी ॥
ऐसी सेवा करितां पहाहो । सर्वभूतीं देखे मद्भावो ॥
हा सर्व धर्मामाजी रावो । तेथें अपावो कदा न रिघे ॥ (४९)

**एकनाथ**—अजन्मा तो जन्म मिरवी । विदेहाअंगीं देहपदवी ॥
स्वयें अक्षयी तो मरण दावी । अतिलाघवी श्रीकृष्ण ॥
भय नाहीं जन्म धरितां । भय नाहीं देहा वर्तता ॥
भय नाहीं देह त्यागितां । हें ब्रह्म परिपूर्णता हरि दावी ॥ (५०)

## तिसावा अध्याय समाप्त

———

# अध्याय ३१ वा

—*—

श्रीकृष्णाचें निर्याण झालें, तेव्हां तेथें ब्रह्मदेव, उमामहेश्वर, इंद्रप्रमुख देव, प्रजापतींसह सर्व मुनि, पितर, सिद्ध, गंधर्व, चारण, विद्याधर, नाग, यक्ष, राक्षस, किन्नर-अप्सरा, पक्षी ( ब्राह्मणादि ), तात्पर्य, चतुर्दशभुवनांतील थोर थोर देहधारी परम उत्सुकतेनें भगवंतांचें महानिर्याण पाहण्याच्या इच्छेनें श्रीकृष्णाचे गुणानुवाद गात येथें आले. त्या वेळीं त्यांच्या विमानांनीं सर्व नभोमंडळ व्यापलें होतें. त्यांनीं वारंवार श्रीकृष्णावर पुष्पवृष्टि केली आणि ते सर्वजण भगवंताचें जन्म व त्याच्या लीला भक्तीनें गाऊं लागले ॥ १–४ ॥ ब्रह्मदेवादि आपल्या विभूति ( अंशात्मक इंद्रादि देव ) विभु जो कृष्ण त्यानें पाहिल्या आणि मग आत्मा ब्रह्मांडीं नेऊन आपले कमलनेत्र त्यानें मिटले * ॥ ५ ॥ 'आग्नेय्या' नामक योगधोरणेनें योगी आपला देह दग्ध करितात, तसें न करितां भगवंतानें आपला देह, लोकांस आश्रय देऊन त्यांचें चित्त रमविणारा व आत्मधारणाध्यानानें सुंदर असून जीवांच्या धारणाध्यानाला विषय होणारा आपला देह जशाचा तसा न ठेवतां तो वैकुंठास गेला. देह तर अभासच ! तो अदृश्य झाला × ॥ ६ ॥ त्या वेळीं स्वर्गीं दुंदुभी वाजूं लागल्या. स्वर्गांतून पुष्पवृष्टि होऊं लागली. आणि त्याच वेळीं सत्य, धर्म, धैर्य, कीर्ति व लक्ष्मी हीं पृथ्वीचा त्याग करून श्रीकृष्णाच्या मागोमाग स्वर्गाला गेलीं ॥ ७ ॥

---

* भगवंतानें आपले नेत्र मिटले, ते कां याची उपपत्ति श्रीधरस्वामींनीं याप्रमाणें केली आहे—पूर्वीं श्रीकृष्णाची 'आम्ही जे लोकपाल आपले दास आहोंत, त्या आम्हां इंद्रचंद्रादि लोकपालांचें आमच्या भुवनांसह संरक्षण करा' अशी प्रार्थना ब्रह्मदेवप्रभृति देवांनीं केली होती. त्या देवांचें कार्य झालें, तेव्हां ते सर्व कृतज्ञ देव श्रीकृष्णाला आपआपल्य भुवणांत नेऊन तेथें त्याचा प्रेमपुरःसर सत्कार करावा ही इच्छा मनांत धरून आले होते; परंतु हे देव पुष्कळ. त्यांतील प्रत्येकाची इच्छा पूर्ण करणें कठिणच होतें आणि नुसतें ब्रह्मदेवाच्या किंवा शंकराच्या भुवणांत जावें, तर इतरांस वाईट वाटणार. तेव्हां कोणाला 'नाहीं' म्हणावयाचा प्रसंग येऊं नये म्हणून कृष्णानें समाधीचें सोंगाची बतावणी करण्याकरितां आपले डोळे मिटले, समाधीमुळें देव फसले व कृष्णाचें दाक्षिण्य म्हणजे शिष्टाचार सिद्ध झाला.

× 'कृष्णही स्वच्छंदमरणी असला पाहिजे' असा भ्रम होईल त्याचें निवारण या श्लोकांत केलें आहे. इच्छेस येईल तेव्हां मरण्याची सिद्धि ज्या योग्यांस प्राप्त झालेली असते, लोकांतरास जाण्याची इच्छा झालेले ते योगी योगबलानें अग्नि उत्पन्न करून आपला

भगवान् श्रीकृष्ण भूलोक सोडून वैकुंठाला कसा गेला हें ब्रह्मदेवासारख्या सर्वज्ञांसही न कळल्यामुळें सर्वांस अत्यंत विस्मय वाटला ॥ ८ ॥ खरेंच आहे, मेघमंडळांतून निघून आकाशांत स्वैरसंचार करणाऱ्या विजेचा गमनमार्ग अल्पज्ञ मर्त्यांस कोठें समजतो ? तसेंच कृष्णानें निर्माण कसें केलें हें मोठमोठ्या देवांसही समजलें नाहीं ॥ ९ ॥ ही परमेश्वरी विहाराची अपूर्व योगगति पाहून ब्रह्मा, रुद्र, इत्यादिकांस अत्यंत विस्मय झाला आणि ते देव श्रीकृष्णाच्या अपूर्व मायेचें स्तवन करीत स्वस्वलोकांस गेले ॥ १० ॥

राजा ! मर्त्यलोकीं श्रीकृष्णाच्या जन्ममरणात्मक लीला म्हणजे मायेचा एक अज्ञेय विलास आहे ! राजा ! रंगभूमीवर नट जसा अनेक सोंगें घेऊन येतो व जातो, तथापि याचें मूळ स्वरूप कायम असतें, त्याचीं सोंगें म्हणजे केवळ दृष्टिमूल तसेंच भगवंताचें लीलाप्रकरण दृष्टिमूल आहे. तो परमेश्वर आपणच हें सर्व ब्रह्मांड होतो, आणि त्यांत मग प्रवेश करतोसा, तेथें लीला करतोसा आणि शेवटीं तें विश्व मोडतोसा दिसतो. परंतु त्याच्या मूळ स्वरूपांत कसलाही फरक केव्हांही होत नाहीं. हेंच परमेश्वराचें नाट्य, हीच परमेश्वराची माया होय ॥ ११ ॥ राजा ! मर्त्य देहांत असतांही आपला गुरु जो सांदीपनि त्याच्या मेलेल्या पुत्राला ज्यानें यमपुरींतून परत आणलें, ब्रह्मास्त्रानें भाजून मृत झालेल्या तुला ज्या भक्तवत्सलानें जिवंत केलें, ज्यानें बाणासुरयुद्धांत यमाचाही यम असा जो शंकर त्याचाही पराभव केला आणि ज्यानें आपल्यास घायाळ करणाऱ्या लुब्धकाला देहासकट

---

वर्तमान देह जाळतात आणि अन्य लोकास जातात. भगवान् कृष्णानें तसें कांहीं केलें नाहीं. त्यानें आपला देह अग्निसात् केलाच नाहीं. म्हणजे तो आपल्या वैकुंठलोकाला सदेह गेला. आपला देह कायम ठेवण्याचा कृष्णहेतु असाः— आपला देह लोकाभिराम म्हणजे लोकांची—जीवांची व भुवनांची-सर्व बाजूंनीं रमणीय स्थिति ज्या देहांत असते तो हा विष्णूचा देह लोकांचा म्हणजे सर्व जगतांचा आश्रयस्थान असल्यामुळें, हा देह जळला तर सर्व जगताची राखरांगोळी होण्याचा प्रसंग ओढवणार ! अर्थात् हा प्रसंग येऊं नये म्हणून श्रीकृष्णानें आपला देह भस्मसात् केला नाहीं. शिवाय दुसरा हेतु असा कीं, कृष्णदेह हा भक्तांच्या धारणेचा व ध्यानाचा मंगल म्हणजे शोभिवंत विषय होय; भक्तांचें ध्येयच तो देह. असला योगिध्येय असणारा देह जळून गेला तर योग्याच्या ध्यानधारणेला विषयच राहणार नाहीं ! म्हणजे अर्थात् कृष्णभक्तांस सगुणस्वरूपसाक्षात्कार होणें हाच नित्य पुरुषार्थ असतो, हीच परम फलाची प्राप्ति नित्य असते, याकरितां देह नष्ट झाल्यास भक्त भक्तिशून्य होतील म्हणूनही श्रीकृष्णानें देह अग्निसात् केला नाहीं. आतां या निर्याणप्रसंगीं कृष्णाचें इच्छाशरीरच हातें असें समजलें तरी श्लोकपदानुरूपच अर्थ करावा. कारण लोकाभिराम वगैरे विशेषणें इच्छाशरीर दग्ध झालें असें समजल्यास व्यर्थ होतील. म्हणून इच्छाशरीरालाही दग्ध न करितां पण अंतर्हित करून कृष्ण निजधामास गेला असा अर्थ समजणें हेंच योग्य आहे.

स्वर्गास पाठविलें; त्याला आपल्या स्वदेहाचें संरक्षण करतां येत नव्हतें असें कसें व्हावें ? सर्वशक्तिमानच तो, आणि त्याची ही अपूर्व लीला ॥ १२ ॥ राजा ! यद्यपि तो सर्वशक्तिसंपन्न होता, यद्यपि तो एकटा एकच एक अनंत ब्रह्मांडांचा जन्म-स्थिति-संहार-करण्यास-समर्थ होता, ब्रह्मांडांचा जन्मादिकारक होता, तरी आपलें मर्त्य शरीर येथेंच ठेवावें अशी इच्छा त्याला झालीच नाहीं. ( १ ) कारण तो शापग्रस्त यादव होता, ( २ ) मर्त्य शरीराचा उपयोग कांही नसतो हें त्याला ठाऊक होतें आणि ( ३ ) आत्मनिष्ठ भक्तांस 'येथें मर्त्य शरिराचा मोह उत्पन्न होऊं नये' असें शिकवावयाचें होतें ॥ १३ ॥ असो; ही कृष्णनिर्याणाची पवित्र कथा जो सकाळीं उठून व शौचमुखमार्जन व स्नानसंध्यादि आटोपून प्रेमानें ऐकेल व भक्तिपूर्वक सांगेल, त्यालाही सर्वश्रेष्ठ वैकुंठपदाची प्राप्ति होईल ॥ १४ ॥

असो. इकडे कृष्णविरहानें विव्हल झालेला दारुक कृष्णाज्ञेप्रमाणें द्वारकेस गेला व तेथें त्यानें वसुदेव-उग्रसेनादि यादवांस प्रभासक्षेत्रीं सर्व यादव योद्ध्यांचें कसें निधन झालें तें सांगितलें. तें वर्तमान ऐकतांच तेथील अवशिष्ट सर्व यादवांचीं हृदयें विदीर्ण झालीं आणि शोकातिशयानें ते मूर्च्छित झाले. कांहीं वेळानें शुद्धीवर आल्यानंतर ते आरडतओरडत जेथें त्यांचे जातभाई मरून पडले होते तेथें गेले ॥ १५–१७ ॥ तेथें देवकी, रोहिणी, वसुदेव यांस कृष्ण व राम दिसतना तेव्हां त्या वृद्धांनीं धाय मोकलला. ते धाडकन जमिनीवर पडले. त्यांची स्मृति गेली आणि कृष्णविरहाचें दुःख असह्य होऊन त्यांनीं प्राणत्याग केला. यादव स्त्रियांनीं पतींचीं शरीरें हुडकून काढून त्यांच्यासह आपलीं शरिरें चितेवर ठेविलीं ॥ १८–१९ ॥ बळरामाच्या पत्न्यांनीं बळरामाच्या मृत शरिराला मिठी मारून अग्नींत प्रवेश केला; वसुदेवाच्या व प्रद्युम्नादि कृष्णपुत्रांच्या बायकांनींही तसेंच केलें. कृष्णशरीर तेथें नव्हतें, तरी कृष्णमय झालेल्या रुक्मिणीप्रभृति नायिकांनींही अग्नींत प्रवेश केला ! ॥ २० ॥

आपला प्रियमित्र श्रीकृष्ण सोडून गेल्यामुळें त्याच्या विरहानें खिन्न झालेल्या अर्जुनानें श्रीकृष्णाच्या उत्तमोत्तम उपदेशाचें ज्ञानपूर्वक मनन केलें; आणि आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. नंतर त्यानें वंशविच्छेद झालेल्या यादवांची उत्तरक्रिया यथासांग आणि यथाक्रम करविली ॥ २१–२२ ॥ श्रीहरीनें निर्याण केल्यानंतर लागलीच समुद्रानें भगवंताचें मंदिर तेवढें वगळून बाकीची सर्व द्वारका आपल्या पोटांत घेतली ! त्या मंदिरांत मधुसूदन श्रीकृष्णाचें वास्तव्य अहर्निश असतें, आणि त्या परम मंगल मंदिराचें स्मरणही अमंगलाचें हरण करीत राहणारा, म्हणून समुद्रानें तें मंदिर तेंवढें कायम ठेवलें ॥ २३ ॥ २४ ॥

मग अर्जुनानें जिवंत राहिलेली बाल, वृद्ध अशी अनाथ मंडळी बरोबर घेऊन तो इंद्रप्रस्थीं आला. त्यांची त्यानें तेथें स्थापना केली आणि तेथील आधिपत्य वज्रनाभ

यादवाला राज्याभिषेक करून दिलें ॥ २५ ॥ नंतर अर्जुन हस्तिनापुरीं आला व पांडवांचे जिवलग मित्र जे यादव त्यांच्या निधनाचें दुःखद वर्तमान, राजा ! तुझे आजे धर्मादि यांस त्यानें सांगितलें. अर्थात् ते या संसारास विटले आणि तुला राज्याभिषेक करून ते सर्व महाप्रयाणासाठीं उत्तर पंथानें गेले ॥ २६ ॥ राजा ! देवांचाही देव जो श्रीविष्णु त्याच्या जन्माचें व लीलांचें जो भक्तीनें संकीर्तन करतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो. राजा ! अन्य ग्रंथांत व भागवतांत गाइलेलीं भगवान् श्रीहरीचीं गोड, पवित्र, श्रेयस्कारी व पराक्रमी चरित्रें व बाललीला यांचें जो भक्तिपूर्ण रसाळ वाणीनें वर्णन करतो, त्याला परमहंस मुक्तांचेंही आश्रयस्थान जो श्रीकृष्ण त्याचे ठिकाणीं पराभक्ति उत्पन्न होते व तो मुक्त होतो ॥ २७–२८ ॥

**एकतिसावा अध्याय समाप्त**

## स्कंध अकरावा समाप्त